॥ श्री ॥

# आत्मसंशोधन नाटक

अर्थात

# ब्रह्मज्ञान प्रदीप.





लक्ष्मण य[illegible] आंबसकर.



प्रकाशक

विठ्ठल पुनोजी कुवळ-ज्योतिषी,

संपादक, 'समुद्र', मुंबई.



किंमत दीड रुपया.

ॐ

# आत्मसंशोधन नाटक

अर्थात्

# ब्रह्मज्ञान प्रदीप.



अंक १–५.

हें पुस्तक,

परब्रह्म स्फूर्तीनें

लक्ष्मण यशवंत पावसकर

नामक देहाकडून

लिहविलें. तें,

## विठ्ठल पुनाजी कुबल ज्योतिषी,

संपादक ‘समुद्र’ यांनीं

मुंबईंत–‘मुंबईवैभव’ स्टीम प्रेसमध्यें

छापून प्रसिद्ध केलें.

सन १९१०

किंमत १॥ रुपया.

ॐ

# अर्पण पत्रिका.

या अनंत ब्रह्मांडांतील जीवोत्पन्न असंख्य जगद्व्य-
वहार, अंतःकरणांत प्रथम अगणित कल्पना-
तरंग स्फुरद्रूप होऊन, नंतर तद्वारें घडत
असल्याप्रमाणें,ही ग्रंथलेखनाची स्फूर्ति

**या देहांत**

ज्याच्या निरंतर वास्तव्यानें स्फुरद्रूप झाली

त्याच

**सच्चिदानंद परब्रह्मपरमेश्वरास**

ही

तत्स्फूर्तिरूप कृति

**तत्स्वरूपानेंच**

समर्पण

असो.

# विषयानुक्रमणिका.

## अंक पहिला. ( १–३६ )



## अंक २ रा. ( ३७–५१ )



## अंक ३ रा. ( ५२–१२६ )

## अंक ४ था ( १२७-२२८ )



## अंक ५ वा. ( २२९-३५२ )

# प्रकाशकाची विज्ञप्ति.



दयाघन प्रभूची लीला खरोखर कल्पनातीत आहे! सृष्टींतील कोणत्याही एखाद्या गोष्टीचें दृष्टोत्पत्तीस येणारें मूळ, व ती गोष्ट हीं दोन्ही एकाचवेळीं पुढ्यांत घेऊन तत्संबंधी विचार केला असतां, या मूळ कारणापासून, हें कार्य घडेल असें स्वप्नींही नसतें. पण तें झालेलें दृष्टोत्पत्तीस येतांच, अंतःकरण सानंदाश्चर्य झाल्याविना रहात नाहीं.

आमच्या 'समुद्र' मासिकाची गोष्ट अगदीं तशीच झालेली दिसते. या आमच्या वाचकवर्गास विशेषतः फक्त ज्योतिष विद्येसंबंधीं उपयुक्त माहिती शक्य ती मेहनत घेऊन सोप्याप्रकारें शिकवावी, इतकाच आमचा मूळचा संकल्प. पण परमेश्वरी संकेत त्याच्याही पलीकडे फार विस्तृत असल्यामुळें, आमच्या वाचकवर्गास आपल्या स्वरूपाचें ज्ञान असणें अत्यावश्यक आहेसें वाटल्यावरून, त्यानें एकाच वेळीं दोन देहांत दोन प्रेरणा सोडून दिल्या! व त्यांच्यायोगें श्रीयुत पावसकर यांच्या अंतःकरणांत सदर आत्मज्ञानसंबंधीं चार शब्द लिहिण्याची व माझ्या अंतःकरणांत ते शब्द छापून काढण्याची प्रेरणा उत्पन्न झाली. इतकेंच नव्हे तर तत्प्रसादानें आज हा ग्रंथ छापूनही प्रसिद्ध झाला!

सदर पुस्तक इतर पुस्तकांप्रमाणें लौकिकी विद्येनें भरलेलें नसून, केवळ जन्माचें खरें सार्थक्य करणाऱ्या आत्मविद्येनें भरलेलें आहे, अशी आमची खात्री झाल्यावर, सदर विद्येचा लाभ आमच्या प्रिय-वाचकवर्गास अवश्यमेव व्हावा, व त्यांस इहपरलोकीं शांतिसुख प्राप्त व्हावें, अशी उत्कट सदिच्छा धरून, हें आमच्या शक्तीच्या बाहेरचें काम आह्मीं आमच्या स्वदेश बंधुभगिनींकारितां अंगिकारिलें आहे.

सदर पुस्तकाचीं पृष्ठें फार तर अदमासें दोनशें होतील, असें प्रथम वाटल्यावरून याची किंमत फक्त एक रुपया ठेविली होती,

परंतु होतां होतां सदर पुस्तकाची पृष्ठसंख्या जवळ जवळ चारशें झाली.! तरी सुद्धां, आह्मीं न डगमतां सदर विषयाच्या महत्वाकडे व आमच्या बंधुभगिनींच्या खऱ्या आत्मसाधनाकडे लक्ष पोंचवून आह्मीं तो दुप्पट खर्चही सोसण्याचें धाडस शिरावर घेतलें आहे.

वरील गोष्ट प्रत्येक वाचकानें लक्षांत आणल्यास, याकामीं आह्मांस साहाय्य करणें किती आवश्यक आहे, हें ज्याचें त्यास सहजच दिसून येणार आहे.

करितां, सर्व बंधुभगिनीस प्रेमपूर्वक इतकीच विनंति करितों कीं, या आमच्या सत्कृत्यास यथाशक्त्या हस्तें परहस्तें मदत करून, आमच्या 'समुद्र' मासिकास पुष्कळसे वर्गणीदार होतील असें करावें. ह्मणजे आह्मांस सहजींच अधिकाधीक उत्तेजन येऊन, अशा प्रकारचे उपयुक्त ग्रंथ आमच्या प्रिय आश्रयदात्यांस सालोसाल भेटीदाखल फुकट देण्याचा सुप्रसंग येत राहील.

सदर पुस्तक छापून घेण्याच्या कामीं आमचे परममित्र रा. रा. दत्तात्रय पुरुषोत्तम वर्तक यांनीं रात्रीचाही दिवस करून अप्रतिम मेहनतीनें आह्मांस निष्कामबुद्धीनें साहाय्य केलें, यावद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानितों.

**संपादक 'समुद्र'—मुंबई.**

# लेखकाचे दोन शब्द.



**आपुलिया बळें नाहीं बोलवत ॥**
**सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥**

तुकाराम.

साधुश्रेष्ठ श्रीतुकाराम महाराज, यांचें प्रत्येक प्रवचन, म्हणजे साक्षात् वेदवाक्यच होय. वरील सदुक्ति दिसण्यांत तर किती साधी भोळी दिसते, पण अंतर्दृष्टीनें विचार करितां, तिच्या अर्थांत इतकी कांहीं अजब मोहिनी भरलेली आहे कीं, मनुष्य कसलाही का अहंकारी व उन्मत्त असेना, वरील वाणीचें खरें हृद्गत, जर त्याच्या अंतःकरणांत बरोबर बिंबेल, तर त्याचा सर्व अहंकार क्षणांत नामशेष होऊन जाईल, व तो सर्वांचा दासानुदास बनेल ! इतका, वरील वचनाचा महिमा आहे !

प्रिय बंधुभागिनी हो ! ग्रंथ लेखनाचें काम फारच जबाबदारीचें आहे. आपले अपरिणत विचार, व भलतीं सलतीं मतें वाचकावर लादणें गैर होय. यानें लोकांचा दिशाभ्रम केल्याचें पातक लागतें. यासाठीं जे विचार लोकांपुढें मांडावयाचे, ते शुद्ध, परिणत, आणि सन्मार्गाकडे त्यांची प्रवृत्ति करितील, असेच असले पाहिजेत व तसा अधिकार ग्रंथकर्त्यांच्या आंगीं प्राप्त होण्यास त्याचें वाचन, मनन व बहुश्रुतपणा हे गुण, त्याच्या ठायीं सुसमृद्ध होऊन शिवाय, तज्जन्य स्वानुभव त्याच्या अंतःकरणांत सारखा खेळत राहिला पाहिजे. आणि असें असेल, तरच त्याच्या लेखणींतून उतरलेले शब्द, कांहीं तरी विचारणीय असतील. आणि असें नसल्यास, त्याच्या ग्रंथाचें वाचन, ह्मणजे वाचकांच्या काळाचा व्यर्थ दुरुपयोग होय !

अशी वस्तु–स्थिति असतां, माझ्यासारख्या सामान्य मनुष्यानें

ग्रंथ लेखनाचें काम हातीं घेणें, हें एक धाष्टर्यच होय. त्यांतूनही विशेष धाडसाची गोष्ट ही कीं, ज्याचें वर्णन व विवरण करण्याच्या कामीं मोठमोठ्या, विद्वान् व साधुसंत महंतांनींही हात टेंकले, त्यावेदांतशास्त्रासारख्या विषयावरील ग्रंथलेखनाचें काम हातीं घेणें म्हणजे, या बाबतींत ओ ना माच्या वर्गांत असणाऱ्या मजसारख्या विद्यार्थ्याला खरोखरच उपहासास्पद आहे.

तथापि, मी शिरोभागीं दिलेल्या श्रीतुकोबांच्या वाणीवर पूर्ण विश्वास टाकून, शक्त्यनुसार होईल तो प्रयत्न करावा अशा बुद्धीनें हा अल्पप्रयत्न केला आहे. यांत मर्मज्ञ वाचकांस कांहीं गुण आढळल्यास तो वरील महावाक्याप्रमाणें भगवद्वाणीचा प्रताप समजून, बाकी सर्व दोषांचा भार, हा देहधारी जीव, स्वशिरीं घेण्याचें प्रांजाळपणें कबूल करीत आहें !

मला या वेदांत विषयाची मुळापासून थोडीशी अभिरुचि असल्यामुळें त्या दयाघन प्रभूनें, कांहीं महानुभाव साधुसंतांचीं दर्शनें होण्याचे सुयोग घडवून आणिले व त्याच्याच अनुशासनाप्रमाणें ब्रह्मविद्येशिवाय इतर सर्व विद्या केवळ ऐहिक प्रतिष्ठेच्या व पोटभरू असून ही विद्या मात्र, साऱ्या कुलासह आपला उद्धार करणारी आहे, अशी मनाची प्रवृत्ति होऊन, त्याच्याच कृपेनें श्रीमद्भागवत, श्रीमद्भगवद्गीता, श्रीज्ञानेश्वरी, परमामृत, विवेकसिंधु, चांगदेवपांसष्टी, दासबोध, सहजबोध, अमृतानुभव, पंचदशी, ब्रह्मविद्याप्रबोधरत्न इत्यादि ग्रंथ पाहण्याची सुसंधि व सुसंगति घडून आली.

यांत परब्रह्म परमेश्वरापासून, तों अखिल सृष्ट्युत्पत्तीपर्यंतचें यथानुक्रमें चित्र उठविण्याचा प्रयत्न केलेला असून, पुनः त्या सृष्टीचा, मूळ परब्रह्मस्वरूपांत कसा लय होतो, हेंही प्रत्यक्षतःच दाखविण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला आहे.

शिवाय, वेदांत विषय हा वास्तविक सत्य व पूर्णशांतिजनक असतां, कित्येकांस तो अगदीं रुक्ष व निरस वाटत असतो, म्हणून या

नाटकांत ती रुक्षता काढून टाकण्याचा प्रयत्न करून, त्यांत शृंगार हास्य, करुणादि नवरस, शक्त्यनुसार उद्भविले आहेत. व त्यांच्याच द्वारें आपला मुख्य हेतु जो ज्ञानरससिंचन, तो वाचकांच्या सर्वांगांत भिनून ते ज्ञानरूप व्हावे, अशी या नाटकाची रचना केलेली आहे.यांत ब्रह्मविद्येंतील बहुतेक सर्व पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या, त्यांचीं लक्षणें, त्यांचें स्वरूप, त्यांचें स्पष्टीकरण व पंचीकरण. यांची सविस्तर माहिती सुबोध रीतीनें देण्याचा शक्य तो प्रयत्न केला आहे.

सदर्हू विषयावर कांहीं नाटकेंही झालेलीं आहेत, पण तीं बहुतेक पद्यात्मक असल्यामुळें, व त्यांत त्याहून ज्यास्त माहिती असण्याची आवश्यकता आहेशी वाटल्यावरून, हा प्रयत्न केला आहे.

या पुस्तकाच्या एकाग्र वाचनानें कांहीं तरी ब्रह्मज्ञानलाभ तर होईलच होईल, पण त्याशिवाय गृहिणीधर्म, पितृभक्ति, स्वराजनिष्ठा पतिव्रतामहात्म्य, संसारभ्रम, वैराग्य, ईश्वराचें अघटित घटनाचातुर्य, मनोविकार वैचित्र्य, त्या परस्परांचें सख्यासख्य व या देहावरील त्यांचें चित्ताकर्षक साम्राज्य, वगैरे वगैरे गोष्टी, मूळ विषयाचा रसभंग न करितां, प्रतिपादिल्या आहेत.

सदरहू नाटक लिहित असतां, श्री रा० रा० विश्वनाथ मदन व रा० रा० विठ्ठल पुनाजी कुबल ज्योतिषी यांनीं वरचेवर प्रोत्साहन देऊन, पुस्तकादिकांचें साहाय्य केलें, याबद्दल त्यांचे आभार आहेत.

लेखक०

ॐ

श्रीपरब्रह्म परमेश्वरायनमः

# आत्मसंशोधन नाटक
## अर्थात्
# ब्रह्मज्ञानप्रदीप.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**देखावा**—( परब्रह्म परमेश्वराप्रीत्यर्थ एक अत्यंत दिव्य प्रकाशमंडळ पांच मिनिटें निश्चळतेनें दाखविल्यावर, एक तेजोराशी सुंदर स्त्री आंतून एकाएकीं प्रवेश करिते. )

**आदिमाया**—अहाहा ! काय हें माझ्या मूळस्थानाचें विलक्षण तेज ! मी आतांच या क्षणापर्यंत त्याच तेजांत लीन होत्यें. या माझ्या यजमानाचें स्वरूप काय, ह्मणून जर मला कोणीं कदाकाळीं प्रश्न केला तर तें स्वरूप अमुक एका प्रकारचें आहे, ह्मणून मला कधींही सांगतां येणार नाहीं. कारण, त्यास अमुक एक प्रकारचें रूप, रंग, आकार, परिमाण किंवा काळ कांहीं नाहीं. ह्मणजे, या स्वरूपास अमुक कांहीं मुखें, नेत्र, किंवा हस्त आहेत, असें ह्मणतां येणार नाहीं. अथवा, एकाअर्थीं या अखिल विश्वांत जें जें ह्मणून काय आहे, तें तें प्रत्येक याचें मुख, हस्त, पाद, नेत्रच आहे.

बरें, हें स्वरूप अमुक एका काळीं उत्पन्न झालें आहे असेंही सांगतां येणें शक्य नाहीं. कारण, तें अमुक काळीं उत्पन्न झालें, हें सांगणारा त्या स्वरूपाच्याही पूर्वीं उत्पन्न झाला असला पाहिजे. परंतु याच्या-

पूर्वी उत्पन्न होणारा, हाच होय. ह्मणूनच यास **अनादि, अनंत, निराकार,** अशीं नांवें फारतर देतां येतील. परंतु वास्तविक हें स्वरूप नामरूपातीत आहे. असो.

बरें, पण आज अनंत काल पावेतों मी या परब्रह्म परमेश्वर स्वरूपीं तादात्म्यानें वास्तव्य करित असतां "तूं आजच या विश्वांत कशाला अवतीर्ण झालीस ?" असा मला कदाकाळीं कोणीं प्रश्न करील, तर त्यास उत्तर असें आहे:-

ज्याप्रमाणें एखादा झोंपलेला मनुष्य सहजरीत्या जागा होतो, त्याचप्रमाणें, आज या परमात्म्यास सहजगत्या, ह्मणजे कांहीं कारण नसतां, "**अहंब्रह्म**" अशी इच्छा उद्भवली. ही जी इच्छा, तीच ही मी. इच्छा ही जरी स्वतः वायफळ आहे, तरी तिला अधिष्ठान ह्मणून जें कांही असतें, तें सत्यच असलें पाहिजे. आणि तें दुसरें कोणतेंही नसून, हें परब्रह्म स्वरूपच तिला अधिष्ठान आहे. अर्थात् या परब्रह्म स्वरूपाची अगदीं पहिली लहर मीच आहें. शिवाय, लहर हें मूळवस्तूचेंच भासमान रूप आहे. अर्थात् तें मिथ्या आहे. ह्मणूनच मी आपल्यास "**मूळमाया**" किंवा "**आदिमाया**" असें नांव धारण करित्यें.

एखादी वस्तु व तिचा आकार, यांत जितकें अंतर, तितकेंच अंतर, हें परब्रह्मस्वरूप व मी, यांत आहे. ह्मणजे, मीही परब्रह्मरूपच आहें. फक्त फलांदिकांचा रंग, हा जसा मिथ्याभास, त्याचप्रमाणें ही मी, ह्मणजे शुद्ध मिथ्याभास आहे. असो.

बरें, पण मी आतां उपजल्यापासून पाहतें आहें, तों हें संपूर्ण विश्व, केवळ परब्रह्मस्वरूपानेंच व्याप्त असून, जरा दिसण्यांत भिन्न अशी, फक्त मीच कायती एकटी आहें. इतके दिवस मी आपली तोंडास खीळ घालून कशी तरी राहिल्यें. पण आतां मला एकटीला येथें मुळींच करमेनासें झालें आहे. आमची मेली बायकांची जात! बोलल्या चालल्याशिवाय वेळ तरी कसा जाणार बाई! यजमानांच्या सहवासास जावें, तर तिकडे कांहीं विचारावयास नको! आहेत आपले निश्चळरूप बोधले बोवा!

एका अर्थी हेंही खरें. कारण यांची पहिली स्फूर्तिच जर मी, तर यांच्याठायीं शुभाशुभादि कल्पनातरंग कोठून असणार ? बरें यांना सोडून तरी माझें कांहीं चालेलका ? वस्तूच्या स्वरूपानें वस्तु कशी सोडावयाची ? मी यांना सोडणें, म्हणजे माझें अस्तित्वच गमावणें, होय. याकरितां, यांना तर सोडतां येत नाहीं, आणि कर्मणूक तर झाली पाहिजे; याकरितां, मी माझ्या मनोरंजनार्थ, कांहीं क्रीडाभुवन ( सृष्टि ) तयार करणार आहें.

कोणतीही नवीन लागवड बीज व क्षेत्र यांशिवाय होत नसते. अर्थात् मीं योजिलेलें क्रीडाभुवन, मी जरी क्षेत्ररूपिणी आहें, तरी मजकडून होण्यासारखें नाहीं. कारण, बीजरूपी परब्रह्म स्वरूपाशीं माझ्या विजातीयत्वामुळें, माझा संबंध होऊं शकत नाहीं. याकरितां मी माझ्या यजमानांच्या आधारावर स्वसामर्थ्यानें एक स्त्री-पुरुष-शक्ति निर्माण करित्यें. ह्मणजे यांच्या संयोगानें, पुढें आपणास आपली इष्टसिद्धि सहज प्राप्त होईल. करितां तसें करित्यें.

( प्रकृतिपुरुषरूप **महामाया** प्रवेश करित्ये. )

**म० मा०**—मी **महामाया** ! संपूर्ण सृष्ट्युत्पत्तीचें आदिकारण मीच आहें. ' **गुणक्षोभिणी,** ' ' **अष्टधा प्रकृति,** ' ' **जिवशिवात्मिका,** ' ' **अर्धनारीनटेश्वर,** ' ' **प्रकृति पुरुष** ' वगैरे माझींच नांवें. साखरेपासून भिन्न भिन्न आकाराच्या जरी अनेक वस्तु केल्या, तरी त्यांस फक्त वेगवेगळीं नांवें व आकार मात्र प्राप्त होतील. पण त्या सर्व वस्तूंचें मूळ, **साखर** हें एकच असतें. त्याचप्रमाणें मला जरी हें विलक्षण रूप प्राप्त झालें आहे, तथापि तें सर्व **परब्रह्मस्वरूपच** आहे.

यावर कोणी शंका घेईल कीं, जर तूं परब्रह्मस्वरूपी, तर तुला हें चमत्कारिक नांवरूप कसें ? याचें उत्तर या माझ्या स्वरूपांतच आहे. मी मात्राज्ञेप्रमाणें " जगदवडंबर रचणार " ही जी माझ्या ठिकाणीं अनावर इच्छा उद्भवली आहे, तिच्याचमुळें मला हें नामरूप धारण

करावें लागलें. आणि ह्मणूनच हा माझा पुरुषवेष परब्रह्मस्वरूपाचा सूचक असून, हा स्त्रीवेष, नामरूपाचा ह्मणजे मायेचा सूचक आहे.

मला माझ्या स्वरूपाची पूर्ण आठवण असून कधीं कधीं मला माझ्या स्वरूपाची विस्मृतिही पडते. सत्स्वरूपाची **स्मृति** हेंच भगवद्रूप ह्मणजे **ब्रह्म** किंवा **आत्मा** असून, त्यालाच **ज्ञान**, **द्रष्टा** व **शिव** हीं नांवें आहेत. तसेंच, सत्स्वरूपाच्या विस्मृतीस **अज्ञान** अगर **जीव** अशीं नांवें आहेत. अर्थात् ज्ञानाज्ञान व जीव शिव हीं माझींच रूपें आहेत.

काळोख ही प्रकाशाहून कांहीं निराळी वस्तु नाहीं. फक्त प्रकाशाचा अभाव तोच काळोख. एखाद्या काळोख्या खोलींत प्रकाश करावयाचा, ह्मणजे प्रथम तींतून काळोख उपसून टाकल्यावर मग तींत प्रकाश भरावयाचा, असा प्रकार नसून तींत प्रकाश करणें, तेंच काळोख काढणें आहे. त्याचप्रमाणें, ज्ञान व अज्ञान हीं भिन्न नसून फक्त ज्ञानाची विस्मृति, हेंच अज्ञान आहे. अज्ञान ह्मणून कांहीं निराळी वस्तु नाहीं आणि ह्मणूनच **जीव--शिव** स्वरूप एकच आहे. फक्त सद्वस्तूचें विस्मरण; तेंच जीवस्वरूप होय. त्याचप्रमाणें, ज्ञानाचा ह्मणजे शिवाचा कैवार घेणारी जी वृत्ति, तिलाच **निवृत्ति** ह्मणत असून, अज्ञानाचा अगर जीवाचा कैवार घेणारी जी वृत्ति तिलाच **प्रवृत्ति** ह्मणतात.

**प्रवृत्ति** ही, मला माझ्या स्वरूपापासून भ्रष्ट करणारी आहे, ही गोष्ट जरी खरी आहे; तरी मी माझ्या मातुश्रीच्या मनोरंजनार्थ जें क्रीडाभुवन करणार आहें, त्यास कारणीभूत व उत्तेजक अशी तीच आहे. ह्मणून, मी माझ्या स्वरूपाची पूर्ण स्मृति ठेवून, प्रवृत्तिमार्गें पुढील कार्यक्रम करित्यें.

( आईस ) काय आई! असेंच ना ?

**आ० मा०**—बाळे ! अगदीं यथार्थ बोललीस. मी तुझें सर्व भाषण एकाग्रतेनें ऐकत आहें. बरें बाळे ! महामाये ! माझा हेतु पूर्ण करण्यास तूं कसकशी तजवीज करण्याचें ठरविलं आहेस ?

**म० मा०**—त्याबद्दल तूं आतां कांहीं ही काळजी करूं नको.

**आ० मा०**—मुली, मी तुजकडे जी ही कामगिरी सोंपविली आहे, ती पूर्ण विचारानेंच दिली आहे. तुजकडून उत्तम क्रीडाभुवन तयार होईल, याबद्दल माझा पूर्ण भरंवसा आहे. पण योजना कशी कार्य केली आहेस, ती ऐकावी ह्मणतें!

**म० मा०**—आरंभीं, मी माझी ज्ञानशक्ति व अज्ञानशक्ति यांच्या सूक्ष्मांशानें दोन अदृश्य पुरुष उत्पन्न करणार.

**आ० मा०**—ते कशाकरितां बरें?

**म० मा०**—अशाकरितां कीं, मी आतां पुढें जें क्रीडाभुवन उभारणार, तें जीवांशानें उभारणार, हें तर खरेंना?

**आ० मा०**—उघडच. त्याशिवाय होणेंच शक्य नाहीं.

**म० मा०**—यासाठीं, मी कदाचित् त्याच नादांत पडून, मला माझ्या स्वरूपाची साफ विस्मृति पडेल. ती न पडावी ह्मणून, माझें अज्ञानरूप जो जीव त्याजवर ज्ञानरूप जो शिव, तो मार्गदर्शक नेमावयाचा.

**आ० मा०**—शाबास! ही तुझी दूरदृष्टि व सत्स्वरूपाभिरुचि पाहून, मला फारच समाधान होतें. बरें मग पुढें?

**म० मा०**—नंतर मी **सत्वगुणयुक्त** एक आंडें माझ्याच स्वरूपाचें घालणार.

**आ० मा०**—काय! आंडें? आणि तें तुझ्या स्वरूपाचें?

**म० मा०**—होय आई! आंडें; आणि त्यांत एक पुरुष व एक स्त्री अशीं भावंडें करणार.

**आ० मा०**—या सत्वगुणी भावंडांचीं नांवें काय बरें ठेवणार?

**म० मा०**—बंधूचें नांव **आदिनारायण** व भगिनीचें नांव **गौरी** असें ठेवणार आहें.

**आ० मा०**—बरें, मग?

**म० मा०**—मग या **सत्वगुणाच्या** उलट स्वभावी, असें दुसरें एक **तमोगुणी** आंडें घालणार.

**आ० मा०**--आणि त्यांत काय असणार ?

**म० मा०**--त्यांत **शंकर** व **सावित्री** अशीं दोन भावंडें असतील.

**आ० मा०**--ठीक. फारच मजा उडणार आहे तर !

**म० मा०**--आणि नंतर दोन्हीं गुणांच्या मिश्र गुणाचें एक रजोगुणी अंडें घालून, त्यांत **ब्रह्मा** व **लक्ष्मी**, हीं भावंडें उत्पन्न करणार ?

**आ० मा०**--पण या भावंडांपासून पुढील सृष्ट्युत्पत्तीचें काम कसें करितां येणार ?

**म० मा०**--आई ! पुढें यांनीं आपापल्या बहिणीचीं लग्नें करावयाचीं.

**आ० मा०**--वाहवा ! तीं कसकशीं ?

**म० मा०**--**विष्णूनें** ( आदिनारायणानें ) आपली बहीण **गौरी शंकरास**; **शंकरांनीं** आपली बहीण **सावित्री ब्रह्मदेवास**; व **ब्रह्मदेवानें** आपली बहीण **लक्ष्मी आदिनारायणास** देऊन तिघांचीं लग्नें लावणार !

**आ० मा०**--वाहवा ! आतां मात्र यांच्यापासून सृष्ट्युत्पत्ति मोठ्या गमतीची होईल खरी. एकेकांत हजार तऱ्हा करितां येतील.

**म० मा०**--आई ! किती मजा होणार आहे ह्मणून सांगूं ! अग, या सोयरिकीमुळें प्रत्येक गुणांत तीन तीन गुण मिश्र होणार.

**आ० मा०**--ते कसे ? प्रत्येक गुण आपापल्या गुणाची असंख्य प्रजा करील. पण एका गुणांत तीन गुण कसे ?

**म० मा०**--आई, ऐक. विष्णु हे स्वतः सत्वगुणी. पण यांची भार्या लक्ष्मी ही रजोगुणी. तेव्हां ह्यांची प्रजा पूर्ण सत्वगुणी निपजेल काय ?

**आ० मा०**--समजल्यें. पण यांत तमोगुण कोठें आहे ?

**म० मा०**--मुलींचा ओढा माहेरीं विशेष. अर्थात् या लक्ष्मीबाईचें माहेरघर जें रजोगुण, तें हल्लीं तमोगुणी सावित्रीबाईनें बळ-

काविलें आहे. अर्थात् या सावित्रीबाईमुळें, थोडी तरी तमोगुणाची छाया लक्ष्मीबाईंत, व लक्ष्मीबाईमुळें सत्वगुणांत उतरल्याशिवाय राहणारच नाहीं.

**आ० मा०**—वाहावाग मुली!

**म० मा०**—तसेंच, **शंकर** हे स्वतः **तमो**गुणी पण यांची पत्नी **गौरी**, ही पूर्ण सत्वगुणी. शिवाय या गौरीबाईची नणंद सावित्रीबाई. हिनें आश्रय करावयाचा रजोगुणी ब्रह्मदेवाचा! अर्थात् तोही गुण अंशतः तरी या तमोगुणांत उतरल्याशिवाय राहणार नाहीं.

**आ० मा०**—शाबास! मुली, बरोबर आहे.

**म० मा०**—आणि त्याचप्रमाणें ब्रह्मदेव हे स्वतः रजोगुणी. पण यांच्या पत्नी पूर्ण तमोगुणी. शिवाय हिची नणंद लक्ष्मी, ही सत्वगुणाश्रित. अर्थात् तोही गुण या रजोगुणांत अंशतः तरी येणारच.

**आ० मा०**—पण मुली? हे त्रिगुण दृश्य, कीं अदृश्य?

**म० मा०**—आई, हे तिन्ही गुण अदृश्य करणार. हे गुण फक्त वेगवेगळा स्वभाव दाखवितील. शिवाय, "**गुण**" याचा दुसरा अर्थ, **दोरी** असा आहे. अर्थात् पुढील सर्व सृष्टि या तीन दोऱ्यांनीं गच्च बांधून टाकावयाची आहे!

**आ० मा०**—पण या तिन्ही दोऱ्या कोणीं चुकविल्या तर?

**म० मा०**—ही गोष्ट बहुधा शक्यच नाहीं. कारण पक्षी कितीही उडणारा झाला, तरी तो दिग्मंडळाच्या बाहेर कोठें जाणार? त्यांतून कोणी गेलाच तर पुढें मी आहें कीं नाहीं? व मलाही चुकवून कोणी कदाचित् गेलाच, तर मजपुढें तूं आहेसच.

**आ० मा०**—आणि माझ्याही हातावर तुरी दिल्यावर?

**म० मा०**—ही गोष्ट तर अगदींच असंभवनीय. आणि कदाकाळीं तसें घडलेंच, तर तातमहाराजांशीं त्याचें तादात्म्य कां होऊं नये?

**आ० मा०**—बरोबर, जो आह्मां दोघींसही चुकवून पलीकडे जाणारा तो तोच असला पाहिजे. ह्मणून परब्रह्म परमेश्वराशी तादात्म्य पावण्याचा त्याचा अधिकारच आहे.

**म० मा०**—होयना ? झालें तर.

**आ० मा०**—बरें पण मुली ! वरील तिन्ही गुण अदृश्य असावयाचे. या त्रिगुणात्मक सृष्टीपासून पुढें प्रजा होईल, ही गोष्ट तर खरीच. पण ती प्रजा अदृश्य असणार. अर्थात् ती प्रजा, जे कोणी दिव्यदृष्ट असतील त्यांनाच दिसणार. याकरितां, या तीन गुणांहून आणखीं कांहीं दृश्य तत्वें पाहिजेत असें वाटतें.

**म० मा०**—आई ! मला इतकेंही का समजूं नये ? मी ती सगळी पूर्ण तयारी करून ठेविली आहे.

**आ० मा०**—सांग बघूं ! कशी काय योजना आहे ती ?

**म० मा०**—मी प्रथम या **सत्वगुणा**पासून एक **आकाश** नामें फारच सूक्ष्म असें, सत्वगुणी तत्व निर्माण करणार.

**आ० मा०**- ठीक. मग पुढें ?

**म० मा०**—त्या **आकाशा**पासून **वायु**नामक, त्या वायुपासून **तेज** नामक, व त्या तेजापासून **आप**नामक; एकाहून एक दृश्य व जड अशीं, तीन तत्वें **रज**नामक दुसऱ्या गुणाकरवीं निर्माण करविणार !

**आ० मा०**—पण, एकाहून एक दृश्य व जड ह्मणजे कशीं ?

**म० मा०**—ह्मणजे अशीं. आकाशतत्व जितकें दृश्य व जड असावयाचें, त्या पेक्षां किंचित् जास्त दृश्य, व जास्त जड असें **वायु**तत्व असावयाचें; तसाच, वायु जितका दृश्य व जड असावयाचा, त्यापेक्षां किंचित् जास्त दृश्य व जड असें **तेज** तत्व असावयाचें; व तेज तत्वाहून किंचित् जास्त दृश्य व जड असें **आप** तत्व असावयाचें.

**आ० मा०**—अहाहा ! मुली, काय तुझी ही अलौकिक चतुरता ! धन्य आहे तुझी ! बरें; तिसऱ्या “ **तमो** ” गुणाकडेस तूं कोणती कामागिरी सोंपविणार ?

**म० मा०**—त्याजकडूनही एक अगदीं स्पष्ट दृश्य, व अत्यंत जड असें पृथ्वी नामक पांचवें तत्व मी निर्माण करणार !

**आ० मा०**—भले शाबास! बाळे! आतां या दृश्यपंचतत्वापासून नानाप्रकारच्या अनंत वस्तु उत्पन्न करतां येऊन त्या, वरील तीन गुणांच्याद्वारें हव्यातशा नाचवितां येतील. आणि तसें झालें ह्मणजे, आमच्या आनंदास पारावार नाहीं असें होईल! मुली! तूं आल्यापासून माझें औदासिन्य नष्ट करून, माझें अधिकाधिक मनोरंजन करित आहेस, याबद्दल मी तुझें किती ह्मणून अभिनंदन करूं!

**म० मा०**—आई! माझें अभिनंदन करण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्यास मातृसेवा नाहीं, तें अपत्य कसलें? अर्थात्, मी माझ्या कर्तव्याहून जास्त असें कांहींच करीत नाहीं. आतां द्यावयाचेंच असेल तर मला इतकेंच दे. माझ्यावर पूर्ण कृपादृष्टि ठेवून, पुढील सर्व कार्यबाहुल्यांत तूं व तात महाराज यांनीं प्रत्यक्ष असावें, इतकीच हात जोडून प्रार्थना आहे.

**आ० मा०**—बाळे! आम्हां उभयतांचें तुला पूर्ण पाठबळ आहे. इतकेंच नव्हे, पण तुझ्या प्रत्येक कृत्यांत आह्मीं उभयतां समक्ष आहों, म्हणून समज. ( कांहीं कानांत सांगते. )

**म० मा०**—हां समजलें. म्हणजे जेवढें नामरूपात्मक **दृश्य व श्रुत**, तें सर्व **तुझें रूप** असून,त्या नामरूपाव्यतिरिक्त, जें त्याचें मूळ **शेषतत्व**, तेंच तातमहाराज **परब्रह्म परमेश्वर** होत. असेंचना?

**आ० मा०**—होय, तेंच.

**म० मा०**--ठीक आहे. आतां ही खूण मी पूर्णपणें लक्षांत ठेवून माझें कार्य करीन. बरें आई, मी लागतें आतां माझ्या कामाला ( नमस्कार करून जाते. )

**आ० मा०**—( स्वगत-मृदुस्मितपणें ) अहाहा! काय माझ्या लेकीचें हें अप्रतिम बुद्धिसामर्थ्य! हिनें आकाशादि जीं पंचमहाभूतें करण्याचें ठरविलें, त्याच्या योगें, त्यांच्या न्यूनाधिक प्रमाणानें, अनंत प्रकारच्या अनंत वस्तु निर्माण करितां येणार आहेत! व

त्या आकृति, सत्वादि त्रिगुणांच्या न्यूनाधिक मिश्रणानें चित्रविचित्र प्रकारें नाचणार आहेत ! व तो त्यांचा चाळा एकदां सुरू झाला, ह्मणजे, माझें क्रीडाभुवन पूर्णतेस गेलें ह्मणावयाचें ! असो. आतां मी पुढील गम्मत अदृश्यत्वानें पहात बसत्यें. ( परब्रह्मस्वरूपास नमन करून जाते. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

**देखावा**--( तीन गुणांच्या तीन आंड्यापासून निघालेल्या तीन रंगी दोऱ्यांस गांठ मारल्यावर, त्या तिन्ही दोऱ्यांचा मिळून तयार केलेला एक रज्जू हातांत घेऊन महामाया उच्चासनावर बसली आहे. असा देखावा ).

**म० मा०**--मातुश्रीस सांगितल्याप्रमाणें, हीं तीन गुणांचीं तीन आंडीं तर घातलींच ! आतां हीं घातलेल्या क्रमानेंच फोडावीं. ( इच्छाशक्तीनें प्रथम सत्वगुणी फोडते, व त्यांतून विष्णु गौरी बाहेर येतात ).

**वि० गौ०**—( नमस्कार करून ) मातुश्री, नमन करितों.

**म० मा०**—बालकांनों ! तुमचें कल्याण होवो. बाळांनों ! ज्या अर्थीं, तुह्मांस मत्प्रभावानें आकृति प्राप्त झाली आहे, त्या अर्थीं, तुह्मांस कांहीं तरी संज्ञेकरितां नांवें असणें जरूर आहे. करितां, मुला, तुझें नांव मी **आदिनारायण** किंवा **विष्णु** असें ठेवून, मुली तुझें नांव **गौरी** असें ठेवित्यें. या पुढें मी तुह्मास याच नांवानें हांक मारीन बरं का !

**वि० गौरी०**—ठीक आहे आई.

**म० मा०**--तसेंच, तुह्मीं उभयतां **सत्वगुणी** असल्यामुळें, तुह्मां दोघांचाही स्वभाव उत्तमच असणार.

**वि० गौ०**--बरें आहे, आई !

**म० मा०**—आणि ह्मणूनच तुह्मांपासून जी सृष्ट्युत्पत्ति होईल, तीही त्याच गुणाची उत्तम होईल.

**वि० गौ०**--पण आई आह्मीं उभयतां भावंड ना ?

**म० मा०**—ह्मणूनच हीं पहा, दुसरीं दोन आंडीं तयार आहेत. यांपैकीं पहिल्यानें हें तमोगुणी फोडतें. ( फोडतांच आंतून **शंकर, सावित्री** येतात. )

**शं० सा०**—आई ( नमन करून ) चरणीं त्रिवार नमन करितों.

**म० मा०**—बाळांनों ! तुमचें कल्याण असो. बाळा, तुझें नांव " **शंकर** " व मुली तुझें नांव मी " **सावित्री** " असें ठेविलें आहे.

**शं० सा०**—ठीक आहे, मातुश्री.

**म० मा०**—तसेंच, तुमच्या आंगच्या गुणाचें नांव " **तमोगुण** " ह्मणजे, सारासारविचारशून्यत्व. याकरितां तुमच्यापासून जी सृष्ट्युत्पत्ति होईल तीही तुह्मांप्रमाणेंच सारासारविचारशून्य अशीच होईल.

**शं० सा०**—पण आई ! आह्मीं उभयतां भावंडें आहों.

**म० मा०**—तें आहे माझ्या लक्षांत. ( स्वगत ) परस्परविरुद्ध अशा दोन स्वभावांच्या प्रजेची सिद्धता झाली. आतां या दोघांच्या मिश्रणापासून, आणखी एका तिसऱ्या स्वभावाची सृष्टि होण्यासाठीं हें तिसरें आंडें फोडतें. ( आंडें फोडते व आंतून **ब्रह्मा** व **लक्ष्मी** येतात.)

**ब्र० ल०**—आई, ( नमून ) चरणीं त्रिवार नमन करितों.

**म० मा०**—मुलांनों ! तुमचा विजय असो ! बाळा ! तुझें नांव मी " **ब्रह्मदेव** " असें ठेविलें असून, मुली, तुझें नांव **लक्ष्मी** असें ठेविलें आहे. तुह्मीं उभयतां रजोगुणी आहां. करितां, तुमच्यापासून होणारी प्रजा रजोगुणी होईल.

**ब्र० ल०**—आई ! आह्मीं भावंडें आहों.

**म० मा०**—तुह्मां प्रत्येक आंड्यांतील जोडीचें **आह्मीं भावंडें** हें ह्मणणें आहे; आणि तें खरें ही आहे. याकरितां, मी माझ्या इष्ट हेतुसिद्ध्यर्थ असें करित्यें.

**विष्णु**—आई ! कोणती बरें इष्टहेतुसिद्धि ?

**म० मा०**—बाळांनो! ऐका. ज्याच्या पूर्वीं कांहींही उद्भवलें नसून ज्याच्यापासून सर्व कांहीं उत्पन्न झालें, असें जें अवर्णनीय अप्रतीम मूळ तेज, तेंच **परब्रह्म परमेश्वररूप**! व तेंच आपणा सर्वांचें आदिस्थान. त्यास सहजासहजीं "**मी**" अशी स्फूर्ति झाली! समुद्राच्या तळीं असलेल्या प्राण्यानें श्वासवायु सोडतांच, तो जसा विजातीयत्वामुळें, पाण्यांतून बुडबुड्याच्या रूपानें वर येतो, त्याचप्रमाणें त्या मूळतेजाची "**अहंस्फूर्ति**" परब्रह्मस्वरूपांतून "**आदिमाया**" या रूपानें प्रगट झाली. हीच माझी आई!

मूळ स्वरुप निर्विकार असल्यामुळें व माझी आई ही जातीची स्त्रीच असल्यामुळें, तिची कर्मणूक मूळ स्वरूपाकडून होईना. ह्मणून तिनें स्वसामर्थ्यानें मला निर्मिलें, व आपल्या स्वतःच्या कर्मणुकीकरितां एक मनोहर क्रीडाभुवन निर्माण करण्याची मला आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें मला माझी इष्टहेतुसिद्धि करावयाची आहे. पण मी जशी माझ्या आईची आज्ञाधारक आहें; त्याचप्रमाणें मुलांनो, तुह्मींही माझी आज्ञा ऐकालना?

**सर्व**—मातुश्री! आह्मीं सर्व आपली आज्ञा ऐकण्यास हीं पहा हात जोडून तयार आहों!

**म० मा०**—ठीक. तर असें करा. आदिनारायणा, पहिल्यानें तूं इकडे ये.

**वि०**—( जवळ जाऊन हात जोडून ) काय आज्ञा आहे मातुश्री?

**म० मा०**—सांगत्यें थांब. ( स्वगत विचार करून ) हो तीच. ( उघड ) मुली, लक्ष्मी, इकडे ये.

**लक्ष्मी**—( जवळ जाऊन नमून ) मातुश्री, काय आज्ञा आहे?

**म० मा०**—तुमचे उभयतांचे उजवे हात पुढें करा.

**दोघे**—( उजवे हात पुढें करितात ).

**म० मा०**—( विष्णूच्या हातावर लक्ष्मीचा हात ठेवून ) विष्णु, तूं सत्वगुणी आहेस. तुला ही रजोगुणी लक्ष्मी, पत्नी करून दिली आहे. आजपासून तुह्मी पतिपत्नीच्या नात्यानें वागत जावें.

**ल० ना०**—आपली आज्ञा शिरसा मान्य आहे. मातुश्री, ( नमन ).

**म० मा०**—या, तुह्मीं उभयतां माझ्या समोर उजव्या बाजूस बसा.

**ल० ना०**—आज्ञा. ( तसें करितात ).

**म० मा०**—बाळा ! शंकरा, इकडे ये.

**शं०**—( जवळ जाऊन ) आज्ञा मातुश्री !

**म० मा०**—मुली, गौरी, इकडे ये.

**गौ०**—( जवळ जाऊन नमन करिते ) काय आज्ञा आहे?

**म० मा०**—आपापले उजवे हात पुढें करा.

**दोघे**—( तसें करितात ).

**म० मा०**—( शंकराच्या हातावर गौरीचा हात ठेवून ) बाळा शंकरा, तूं तमोगुणी. याकरितां तुला ही पूर्ण सत्वगुणी गौरी पत्नी दिली आहे. आजपासून तुम्ही उभयतांनीं पतिपत्नीच्या नात्यानें वागून, माझ्या क्रीडाभुवनास शोभा आणावी.

**गौ० शं०**—( नमन करून ) आज्ञा, मातश्री.

**म० मा०**—या. तुह्मीं उभयतां माझ्या समोर डाव्या बाजूस रहा.

**गौ० शं०**—आज्ञा. ( तसें करतात ).

**म० मा०**—आतां तुह्मीं दोघें इकडे या, व उजवे हात पुढें करा.

**ब्र० सा०**—( दोघें तसें करितात ).

**म० मा०**—( ब्रह्मदेवाच्या हातावर सावित्रीचा हात ठेवून ) ब्रह्म्या, तूं रजोगुणी. या करितां ही तमोगुणी स्त्री सावित्री तुला दिली आहे. आजपासून तुह्मी पतिपत्नीच्या नात्यानें वागून माझ्या इष्टकार्यास हातभार लावावा.

**ब्र० सा०**—आज्ञा मातुश्री.

**म० मा०**—या, तुह्मी इकडे माझ्या समोर दोहोंच्या मध्यें रहा.

**सा० ब्र०**—आज्ञा. ( तसें करितांत. )

**म० मा०**—बा ! ब्रह्मा, विष्णु, महेश्वरांनों ! आतां तुह्मी आ-

पापल्या गुणास आपापल्या पुढें ठेवून, त्यांच्या करवीं महाभूतें तयार करा.

**तिघे**—आज्ञा मातुश्री.

**विष्णु**—सत्वा ! इकडे ये.

**सत्व**—( येऊन ) आज्ञा !

**वि०**—तूं आपल्या स्वभावास अनुरूप असें, एकच महाभूत यार कर.

**सत्व**—आज्ञा महाराज. चल **आकाशा** ! इकडे ये.

**आकाश**—( येऊन सत्वापुढें राहतें ).

**ब्र०**—रजा ! इकडे ये.

**रज०**—( येतो व हात जोडून ) आज्ञा.

**ब्र०**—तूं आपल्या स्वभावानुरूप, आकाशाहून अधिकाधिक जड अशीं तीन भूतें निर्माण कर.

**रज**—आज्ञा आई ! चला, **वायु, तेज, आप** !

**तिघे**—( क्रमानें रजापुढें उभे राहतात ).

**शंकर**—तमा, इकडे ये.

**तम**—( येऊन ) आज्ञा महाराज !

**शंकर**—तूं आपल्या स्वभावानुरूप एक महाभूत उत्पन्न कर.

**तम**—आज्ञा महाराज ! चल **पृथ्वि** ! इकडे ये.

**पृथ्वि**—( स्त्रीरूपिणी पृथ्वि येऊन उभी राहते. )

**म० मा०**— बाळांनों ! आता तुह्मी सर्वजण, आपापले गुण-रज्जू आपापल्या कंबरेस गुंडाळा पाहूं !

**सर्व**—( तसें करितात ).

**१**—श्वेत रज्जू. विष्णूपासून गौरी, सत्व व आकाशपर्यंत येतो.

**२**—मिश्ररंगी रज्जू, ब्रह्मदेवापासून लक्ष्मी, रज, व वायु, तेज आप पर्यंत येतो.

**३.**—कृष्णरज्जू, शंकरापासून सावित्री, तम, व पृथ्वीपर्यंत येतो. ( तोंच. पडद्यांतून **जीव शिव** येऊन, ते अनुक्रमें महामायेच्या डाव्या व उजव्या हाताजवळ उभे राहातात.)

**जी०**—आई! मी जरासां बाहेर फिरून येतां बरें का?

**म० मा०**—अरे थांब! एकटा जाऊं नको. कुठें तरी चुकशील. बाळा शिवा!

**शि०**--काय आई?

**म० मा०**—अरे, ह्याला जरा फिरंवून आण जा पाहूं?

**शि०**—बरें आहे आई.

**म० मा०**—सांभाळून आणा बरं का? लवकर या.

**शि०**—बरं आहे आई. तूं कांहीं काळजी करूं नको. लवकरच येतों. पण याला नीट सांग आई!

**म० मा०**—समजलास कायरे? सांभाळ! नवीन क्रीडाभुवन तयार होत आहे. कुठल्याकुठें भ्रमूं नकोस बरें?

**जी०**—नाहीं आई. लवकर येतों. भाऊ चल!

**शि०**—चल. आई, येतों बरं का!

**म० मा०**—ठीक आहे.

(दोघे, तेथून पंचमहाभूतांच्या पुढें येऊन समोरासमोर राहातात.)

**शि०**—माझ्या प्रियबंधो, जीवराया! काय हा आमच्या महामायेचा प्रचंड कारखाना! पाहिलास का? अबब! कायही अजस्र शक्ति!

**जी०**—खरें आहे. पण भाऊ शिवराया, या महामायेस तूं "**आमची**" कशी ह्मणतोस?

**शि०**—( तोंडाकडे हात नेऊन ) हें काय! फिरली का इतक्यांतच तुझी बुद्धि! हें आवाहना पूर्वीच विसर्जन ह्मणावयाचें! अरे, आतांच नाहींका आपण तेथून निघालों?

**जी०**—होय, असूं. मग?

**शि०**—मग काय? अरे ती दुसरी तिसरी कोणी नसून तूं व मी यांची जी **मिळवणी,** तीच ती आहे. अरे, तिचें जें **स्त्रीरूप** दिसतें आहे, तेंच **प्रकृतिरूप** असून, त्याच रूपाचा अभिमानी, तूं **जीवरूप** आहेस. आणि तसेंच तिच्यांत जें **पौरुष्य** दिसत आहे तोच **ईश्वरांश** असून, त्याचा पक्ष उचलणारा, मी **शिव-**

रूप आहें. अर्थात् **तूं** व **मी** मिळूनच ती बनलेली आहे. आणि झणूनच, तिला मी " **आमची** " महामाया असें झटलें.

**जी०**—बरें, पण शिवराया ! ही गोष्ट मला इतक्यांतचरे कशी स्मरेनाशी झाली ?

**शि०**—बा जीवराया ! हा मायेचा स्वभावच आहे. ती राईचा पर्वत करून दाखवील ! तूं आतांच पहा किती चकलास तो ? या करितां, सावध रहा. असा भ्रम पावूं नको. तुला कांहीं दोषयुक्त दैवबलानें ही जीवदशा प्राप्त झाली आहे. आणि तो दोष दुंसरा कांहीं नसून, तूं वरचेवर स्वरूप विसरतोस, इतकाच. सूर्य नसला, झणजेच त्याला रात्र झणतात. वस्तुतः रात्र झणून कांहीं दिवसाहून विजातीय नाहीं. दोन्ही मिळून उपाधि, एका काळासच आहेत. तूं तो अंधार झणजे विस्मरण काढून स्वस्वरूपस्थ झालास, कीं तूं शिवच आहेस. झणून झणतों, तूं असा विस्मृत होऊं नको.

**जी०**—भाऊ ! तूं मला योग्यवेळीं योग्य स्मरण दिलें, याबद्दल मी तुझा ( हात जोडून ) आभारी आहे.

**शि०**--अरे यांत आभार कसले ? मला माझा बंधुधर्म पाळला पाहिजे. बरें असो. आतां इकडे ये पाहूं. ही पाहिलीस का आमची आदिमाया ! आतां तरी समजलासना पण "आमची" झणजे?

**जी०**—हो. ओळखली. ही मोठी जबरदस्त बया खरी बुवा ! बरें शिवराया ! हिनें ही हातांत कसली दोरीशी रे काय धरली आहे ?

**शि०**--हाच तो त्रिगुणात्मक रज्जू उर्फ वेसण ! ही दोरी जरी एक दिसते, तरी ती तिहेरी आहे तिहेरी.

**जी०**—तिहरी !

**शि०**—इकडे ये. तुला प्रत्यक्षच दाखवितों. भिऊं नको. आपल्यास कोणीही पहाणार नाहीं. आपल्यास मात्र आपण स्वरूपस्थ असे पर्यंत सर्व कांहीं दिसेल. करितां इकडे ये.

( जीव जवळ जातो, त्यास ती दोरी दाखवून )

**शि०**—ही पाहिलीस का दोरी ? तीन पेडी आहे.

जी०—( पाहून ) अरे हो. खरेंच ! पण हे तीन पेड तीन रंगी किरे !

शि०—बरोबर आहे. हा पहा पहिला पेड. पांढरा शुभ्र आहे. हा या गांठींतून बाहेर पडला आहे पहा. धर हातांत, व तो धरून तसाच चल पुढें !

जी०—( धरून चालत आहे तोंच धाडकन् श्रीलक्ष्मीनारायणाच्या आसनास आपटतो. तों दचकून ) अरे बापरे ! हारे कोण मध्यें ?

शि०—भिऊं नको. आत्मदृष्टि उघडी ठेवून चल ह्मणजे अडखळणार नाहींस. अरे,हाच तो सत्वगुणाधिकारी **आदिनारायण !**

जी०—असें काय ! ( त्यास नमन करून ) पण आधीं, गुण ह्मणजे ?

शि०—गुण ह्मणजे स्वभाव. महामायेच्या आंगचे तीन गुण या तीन दोऱ्यांनीं ध्वनित केले आहेत.

जी०—असें का ! अरे, पण ही श्वेतवर्ण दोरी याच्या कंबरेला गुंडाळली आहे !

शि०—ठीकच आहे. ही पहा, हींच दोरी पुढें गौरीपर्यंत आली आहे.

जी०—गौरी ही कोण ?

शि०—ही ही, आदिनारायणासोबतच सत्वगुणी आंड्यांतून निघालेली आहे. अर्थात् ती या आदिनारायणाची बहीण.

जी०—मग ती इकडे दूरशी काय ?

शि०—खरेंच आहे. लग्न करून दिलेली मुलगी दूर आपल्या नवऱ्याकडेसच असावयाची.

जी०—मग इच्या या पतीचें नांव ?

शि०—साक्षात् शंकर ह्मणतात ते हे.

जी०—असें काय ! ( जलदीनें नमस्कार घालतां घालतां ) ओम् हर हर हर महादेव ! बरें चला पुढें जाऊं ( दोरी धरून

पुढें जातो. तो पुनः सत्वगुणास अडकतो ) अरेच्या ! हा आणखी येथें कोण ?

**शि०**—आदिनारायण व गौरी यांच्या ठायीं असणारा, जो **सत्व** गुण, तो येथें कांहीं कारणास्तव प्रत्यक्ष दाखविला आहे. ही पहा यांच्याही कंबरस तीच दोरी गुंडाळली आहे!

**जी०**—( पाहून ) होय. पण आतां ही कोठपर्यंत अशीच जावयांची ?

**शि०**—आत येथून, ही अशीच ही पहा, आकाश तत्वाच्या कंबरेस गुंडाळून पुरी झाली.

**जी०**—हें समजलें ! ह्मणजे हें **आकाश** तत्व **सत्वगुणी** झालें ह्मणावयाचें ?

**शि०**—हो बरोबर बोललास. हें आकाश तत्व सत्वगुणाच्या ताब्यांत; सत्वगुण आदिनारायणाच्या ताब्यांत; व आदिनारायण, या महामायेच्या हातांत.

**जी०**—अबबब ! काय हा अधिकार ! हिनें तर हें आकाश, हा सत्वगुण, व साक्षात् श्रीमहाविष्णु यासही या सत्वगुण रज्जूनें जखडून बांधून, तो लगाम आपल्या स्वतःच्या हातांत घेतला आहेना ! काय हें बळ ! पण सुबंधो ! साक्षात् महाविष्णुही, मायेच्या सपाटयांत सांपडले आहेत ह्मणावयाचे ?

**शि०**—खरेंच आहे. महाविष्णु झाले, ह्मणून काय झालें ? जोंपर्यंत ते गुणपाशाच्या बाहेर पडले नाहींत, तोंपर्यंत तेही बद्धच. परंतु सदासर्वकाळ ते स्वरूपस्थ असल्यामुळें, त्यांची योग्यता फार निराळी आहे.

**जी०**—ठीक, बरें. आतां हा मिश्रवर्णी रज्जू कसकसा गेला आहे पाहूं.

**शि०**—हा पहा, हा मिश्रवर्ण रज्जू, या गांठींतून बाहेर पडून यानें प्रथम ब्रह्मदेवास गुंडाळलें ! तेथून पहा आतां पुढें हा रज्जू कोठें कोठें गेला आहे तो !

**जी०**—ठीक. ( तसें करितो ) या रज्जूनें तर ही कोणी बाईही गुंडाळली आहे !

**शि०**--होय. ही महामायेच्या रजोगुणी आंड्यांतून ब्रह्मदेवासह निघाली असल्यामुळें, ही या ब्रह्मदेवाची भगिनी असून साक्षात् महाविष्णूची पत्नी आहे. हिचें नांव **श्रीमहालक्ष्मी.**

**जी०**—असें ! ह्मणजे लक्ष्मीनारायण, हें दंपत्य एक गुणी नव्हे ?

**शि०**--नव्हे. पति सत्वगुणी व पत्नी रजोगुणी.

**जी०**—पण, या नवऱ्या बायकांचा भिन्न स्वभाव ठेवण्याचें कारण ?

**शि०**—अरे ! एकत्वांत मजा नाहीं. आणि आमच्या महामायेस पाहिजे गम्मत. मग ?

**जी०**—समजलों. आतां ही दोरी पुढें कोठपर्यंत नेली आहे.

**शि०**--ही पहा. ही या महालक्ष्मीपासून इकडे रजोगुणास वेष्टून, येथून या वायु, तेज, आप, या तीन महाभूतांस वेष्टून, पुरी झाली आहे.

**जी०**--ह्मणजे,या महामायेनें ब्रह्मदेवासही वेसणींत पकडलें आहे!

**शि०**—अरे, ब्रह्मदेवालाच काय ! पण हे पहा साक्षात् देवाधिदेव **शंकर,** कसे तमोगुणांकित होऊन बसले आहेत.

**जी०**--अहाहा ! आई, धन्य आहे तुझी ! तुला नमस्कार असो.

**शि०**—ही पहा, ही काळी दोरी येथून विधिपत्नी सावित्रीस गुंडाळून, तेथून ही पहा या तमोगुणास गुंडाळावयास आली, व येथून पुढें या तमोगुणी पृथ्वितत्वास वेष्टून पुरी झाली.

**जी०**—शिवराया ! हा सर्व प्रकार समजला. पण एक शंका आहे. विचारूं का ?

**शि०**—हो हो, विचार.

**जी०**—शंकर तमोगुणी असून ते श्वेतवर्णी; व विष्णु हे सत्वगुणी असून ते कृष्णवर्णी कसे ? वास्तविक शंकराचा कृष्ण, व विष्णूचा शुभ्रवर्ण असावयाचा.

**शि०**—जीवराया, तुझी शंका योग्य आहे. पण ही सर्व मायेची वैचित्र्यप्रियता होय. तरी पण विष्णु व शंकर यांचा अत्यंत प्रेमसंबंध असल्यामुळें, त्यांनीं आपापल्या वर्णांची अदलाबदल करून,

" **शिवस्य हृदयं विष्णुः** " या वचनाची यथार्थता सूचित केली आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

**जी०**—समजलों. पण शिवराया, हे सपत्न ब्रह्मा-विष्णु-महेश हे त्रिगुण व हीं पंचमहाभूतें, मिळून सर्व महामायेच्या हातांत. नव्हे का ?

**शि०**—होय. या पुढें सर्व सृष्टिक्रम, पंचमहाभूतें व त्रिगुण या आठ तत्वांवरच उभा करावयाचा.

**जी०**—ठीक. बरें पण शिवराया, या त्रिगुणाच्या कंबरेपासून निघालेल्या या तीन दोऱ्यांस ही गांठ मारून पुढें ह्या तिहींचा मिळून एक रज्जू केला आहे, याचें कारण काय ? वेगवेगळ्या तीन दोऱ्या घेतल्यास चाललें नसतें काय ?

**शि०**—जीवराया ! फारच उत्तम प्रश्न केलास ! यावरून तूं मोठा मार्मिक आहेस, यांत संशय नाहीं. शाबास ! सांगतों ऐक. या आपल्या आदिमायेनें जो हा त्रिगुणात्मक दृढ रज्जू धारण केला आहे; त्यावरून तो रज्जू असें सुचवितो कीं, हे गुण सृष्टींत पृथक् पृथक् नसून, त्या परस्परांचा एकमेकांत **गुंता** झालेला आहे.

**जी०**—बरोबरच. प्रथमतः प्रत्येक गुणाभिमानी देवतेची पत्नी भिन्नगुणी ! तिलाही आपल्या मातृगृहाच्या संबंधानें तिसऱ्या गुणाचा स्पर्श ! मग गुंता कसा न होईल ? बरें, पण ही ग्रंथी काय सुचविते !

**शि०**—तीही असेंच सुचविते कीं, या सृष्ट्युत्पन्न स्थावर जंगम वस्तूवर, त्रिगुणांची आपल्या प्रमाणेंच गच्च गांठ बसलेली आहे ही गांठ सोडल्यावांचून, 'त्रिगुणांच्या पलीकडे गेला', असें होणार नाहीं. ही गांठ, म्हणजे जणु एक पूलच आहे.

**जी०**—ही गांठ सोडवावयाची, म्हणजे काय करावयाचें ?

**शि०**—जीवराया ! ऐक. आधीं गुण म्हणजे नाना प्रकारच्या बऱ्या वाईट कल्पना ! बऱ्या कल्पना, तोच सत्वगुण; वाईट कल्पना तोच तमोगुण; व मिश्र कल्पना तोच रजोगुण !

**जी०**—बरें मग ?

**शि०**—मग काय ! या त्रिगुण ग्रंथीच्या पलीकडे जाणें, म्हणजेच

नाना प्रकारच्या कल्पनांच्या पलीकडे जाणें. आणि कल्पनांच्या पलीकडे जाणें, म्हणजेच त्या मनांत येऊं न देणें

**जी०**—असें का!

**शि०**—दुसरें काय? कल्पना मनांत येऊंच न दिला म्हणजे त्या दोऱ्याच नाहींतशा झाल्या! अर्थात्, जर दोऱ्याच नाहींत, तर गांठ कोठें राहिली?

**जी०**—पण, मनांत कल्पनाच येऊं न देणें शक्य आहे का?

**शि०**—हो. अभ्यासानें शक्य आहे. शिवाय, समुद्रावर लाटा येणें, हें जरी स्वाभाविक आहे, तरी त्या लाटा म्हणजे कांहीं समुद्र नव्हे. हें ध्यानांत ठेवून, त्या कल्पनांपासून अलिप्त रहावें. असें केलें तरी, त्याचा अर्थ तोच आहे.

**जी०**—समजलों. पण शिवराया! हे ब्रह्माविष्णूमहेश्वरादि जर त्रिगुणांच्या जाळ्यांतून पलीकडे गेले नाहींत, तर आमच्या सारख्या क्षुद्र जीवांचा, ग्रंथीच्या पलीकडे पल्ला कसा येणार?

**शि०**—भिऊं नको. अरे, हीं जीं तीन देवतांचीं तीन रूपें दिसताहेत, तीं फक्त त्यांनीं सृष्ट्युत्पत्तीच्या कार्यार्थ, त्या त्या कामीं अहंकार धारण केल्यामुळें, दिसताहेत. पण पूर्वोक्त समुद्राच्या दृष्टांतानुरूप त्यांनीं तो अहंकार सोडला, कीं ते साक्षात् **परब्रह्म परमेश्वर** स्वरूपीच आहेत. ते जगद्व्यवहार करताहेत मात्र. पण त्यांचा त्यांस यत्किंचितहि अहंकार नाहीं. जर असता तर त्यांस देवत्व कोठून येतें? मिळून तात्पर्य हेंच. कांहीं जरी व्यवहार केला, तरी आपलें मूळ विसरूं नये म्हणजे झालें.

**जी०**—समजलों. आतां या आठ तत्वांपासून सृष्टि कसकशी निर्माण होणार, तें सांगा पाहूं.

**शि०**—जीवराया! तें सांगण्याची आतां मुळींच जरूर नाहीं. ये, आपण येथें स्वस्थ बसूं. आपणास कोणीही पाहाणार नाहीं. हीं आतां आपसांत काय काय बोलतात, तें आपण येथून गपचूप ऐकूं.

**जी०**—ठीक आहे. (दोघे जवळ जवळ बसतात).

**म० मा०**—मी माझ्या मातुश्रीस सांगितल्याप्रमाणें क्रीडाभुवनास

लागणारें सर्व साहित्य तयार तर केलेंच. यांतील प्रत्यक व्यक्ति आपापलें काम अप्रतिम करण्यास समर्थ आहे. बाळांनों, खरें ना हें ?

**ब्र० दे०**--हें आम्ही होऊन काय सांगावें. आई, काय ती आज्ञा व्हावी.

**वि०**--आई, शंका कां ?

**शं०**—सांग काय तें. म्हणजे प्रत्यक्षच आमचा प्रभाव दृग्गोचर होईल.

**म० मा०**--बाळांनों, मला तुमचा स्वभाव माहीत आहे. बरें, नारायणा, तूं माझ्या मातुश्रीच्या क्रीडाभुवनास कशी काय मदत करणार ?

**आ० ना०**—आई, मी आपल्या सत्त्वगुणाच्या योगें, संपूर्ण सृष्टींत सर्वत्र होईल तितकी सत्स्वरूपाची गोडी लावीन. उत्तमोत्तम सत्कृत्यें करवीन, व परपीडन न होईल असें करीन.

**म० मा०**--बरं, बाळा ब्रह्मदेवा, तूं या कामीं कसें काय सहाय्य करणार ?

**ब्र०**—आई, मजबद्दल तूं कांहींच काळजी करूं नको. सगळा रजोगुण माझ्या स्वाधीन असून, तत्स्वभावी वायु, तेज व आप हीं तीन कारभारी तत्वें, माझ्या हातीं आहेत. मंदिरासंबंधीं बहुतेक सर्व काम मी करून देतों. मी आपला काम करीत राहीन. मला कोणाचें बरें नको व वाईटही नको.

**म० मा०**—बरें, बाळा शंकरा, तुझें कसें काय ?

**शंकर०**—आई, हे उभयतां क्रीडाभुवनास उत्तम भर घालतील हें खरें. पण हें क्रीडाभुवन जर वाढतच गेलें, तर तें उभारण्यास अगोदर जागा कोठें आहे ? शिवाय आम्लकट्वादि रस सेवनाशिवाय मधुरतेची खरी किंमत कळत नाहीं. याकरितां, मी कधींकाळीं रंग पाहून सर्व सृष्टि भस्म करून टाकीन. तसेच जे कोणी, सद्भावनेनें सत्स्वरूपस्थ असतील, त्यांस मी पाहिजे तें देईन. व जे कोणी स्वरूपाच्या ठायीं पराङ्मुख असतील, त्यांचा निःपात करून सोडीन. मला तें तराजूंत

घालून तंतोतंत देणें घेणें आवडत नाहीं. माझें देणेंही तसें, व घेणेंही तसेंच.

**म० मा०**—ठीक आहे. तसहि कांहीं पाहिजेच. शिवाय खेळास रंग नाहीं. बरें बाळांनों, आतां लागा आपल्या कामास.

**ब्र० वि० शं०**—ठीक आहे आई!

**विष्णु**—बरं सत्वा, हा सर्व संवाद ऐकलासना? आतां पुढील कामगिरी फार चांगल्या प्रकारें झाली पाहिजे.

**सत्व०**—( हात जोडून ) महाराज! आपली आज्ञा ऐकण्यास हा दास तयार आहे. मी पुढील सृष्टिमंदिरास अत्त्युत्तम शोभा आणीन.

**ब्र०**—त्याचप्रमाणें, बा रजा! तूंही आपली पराकाष्ठा करून, महाराज्ञीचें विलासमंदिर उत्तमोत्तम शृंगारलें पाहिजे.

**रज०**—( हात जोडून ) ठीक आहे. महाराज, माझी कामगिरी पाहिल्यावर म्हणाल " रजा, शाबास "!

**शि०**—तसेंच, बा, तमा! तूंही आपल्या नांवास अनुसरून अशी सृष्ट्युत्पत्तीस मदत कर. कांहीं वाईट असल्या शिवाय बऱ्याची पारख होत नाहीं. याकरितां आपला प्रताप ओळखून पुढील कार्य कर.

**तम०**—ठीक आहे. माझा तडाखा असा आहे कीं, त्याची सर या दोहोंतून एकालाही यावयाची नाहीं. संपूर्ण विश्व पहा कसें बहिर्मुख करून सोडतों.

**शं०**—शाबास! चला तर

**स० र० त०**— आज्ञा महाराज

**शि०**—जिवराया! चल, आपणही तिकडेसच जाऊं.

**जी०**—चलचल. म्हणजे सर्व कांहीं सहजच पाहावयास सांपडेल.

(सर्व जातात. पडदा पडतो.)

---

## प्रवेश ३ रा.

(जीव शिव पुनः या कचेरीस येतात.)

(आकाशाच्या हातीं पोकळी, वायूच्या हातीं फुगा, तेजाच्या हातीं दिवा, आपच्या हातीं उदक कलश, पृथ्वीच्या हातीं प्रस्तर अशीं पंचभूतें, त्रिगुणांच्या समोर क्रमानें उभीं आहेत.)

**सत्व**—गड्यांनों! आतां स्वस्थ बसून काय करितां? आतांच झालेली राजाज्ञा आपण ऐकली ना?

**तम**—सत्वा! तूं प्रथम बोलणारा कोण? तुझी घमेंडी अशी उतरीन, यादराख.

**सत्व**—(हात जोडून) बाबा माफकर. मी माझे बोलण आपले मागें घेतों.

**रज**—पण तमा, यांत तुझा सत्वानें काय बरें अपमान केला? नवनव्या घडामोडींमुळें मला, व विसराळूपणामुळें तुला, राजाज्ञेचें विस्मरण पडेल, म्हणून त्या विचाऱ्यानें आम्हांस आठवण दिली. त्याचा मोबदला, त्यास तूं बराच दिलास!

**तम**—(रागानें) काय! तुझीही खर्चीं संपली आहे वाटतें?

**रज**—नाहींरे बुवा. तुम्ही आपले दोघे काय हवें तें करा! मी जातों आपला. माझ्या मागें हजार झेंगटें आहेत. हा मी चाललों पहा.

**शि०**—जीवराया! पाहिलीस का ही मजा. खेळास नुकता कोठें सुरवात होत आहे!

**जीव**—पण यांत त्या सत्वाची यत्किंचित्‌ही चूक नसतां तो त्याजवर इतका रागावला काय ह्मणून?

**सत्व**—अरे काय ह्मणून ह्मणजे? मघांची सत्वाची दोरी, पांढरी शुभ्र, व तमाची दोरी काळी ढुस्स, काय ह्मणून?

**जीव**—हां समजलों. त्या रंगांनीं, तिघांचे तीन प्रकारचे स्वभाव दाखविले खरे.

**शिव**—अरे, आपल्या महामायेनें हे भिन्न स्वभाव मुद्दामच केले आहेत. जर तिघे एकच स्वभावी असते तर इतका गोंगाट माजला असता काय?

**जीव**—मुळींच नाहीं.

**शिव**—मग? जर गोंगाट नाहीं, तर खेळ कसला? व खेळा-शिवाय, आमच्या आजीबाईची करमणूक कशी होईल? हे स्वभाव भिन्न भिन्न झाले, कीं पुढील सर्व कृति भिन्न होत जाणार. व पुढील कृति भिन्न झाल्या, कीं गेलें लांबत सृष्टिवैचित्र्य!

**जीव**—अस्सें! समजलों. आतां बरोबर समजलों. बरें, पण आतां हे पुढें काय करतात पाहूं.

**शिव**—होय. मीही तेंच सांगणार होतों.

**तम**—( रजाचा हात धरून ) चाललास कोठें? आणि आजची सरकारी कामगिरी कोण करणार? वडील येणार आहेत वाटतें?

**रज**—अरे बाबा! तूं असा रागावतोस कां? काय करावयाचें तें सांग. आह्मी आपलें तूं सांगशील तसें वागतों. झालें?

**तम**—असं रीतीनें बोला! अमर्यादपणा कराल, तर मजशीं प्रसंग आहे!

**सत्व**—( रजास खुणावून तुच्छता दर्शवितो. )

**रज**—बरें तमा, सांग तर आतां कोणीं कशी कामगिरी घ्यावयाची ती!

**तम**—तें मला कांहीं समजत नाहीं.

**रज**—तुला कांहीं समजत नाहीं, ह्मणून तूंच सांगतोस, व ज्याला कांहीं समजतें तो बोलला, तर तुला राग येतो. आतां पुढें कसें होणार?

**तम**—नाहीं, आतां गेला माझा राग. सांग पुढें कसें करावयाचें तें.

**रज**—मला तरी काय कळतें आहे? आह्मीं तुमचे बंधु ! आमच्यांत खरा कल्पक एकच. बाकी आह्मीं दोघे तसलेच.

**तम**—बरें ( फारच वाईट वाटून ) त्यास सांगावयास सांग.

**रज**—सांगरे बुवा, तूंच सांग. पुढें कोणीं कशी कामगिरी करावयाची ती.

**संत्व**—मला तरी काय समजतें आहे? आपल्या बोलण्यानें जर दुसऱ्यास राग येतो, तर आपण बोला कशाला? काय होईल तें स्वस्थपणें बसून बघायला काय जातें!

**रज**—सत्वा, असें काय बरें! तूंही असें काय बरें करतोस ! तूं इतका समजुतदार असतां, असें बोलूं नये. वेळ होत आला. सरकारी कामगिरीस विलंब होईल तर देहांत प्रायश्चित्त भोगावें लागेल! सांग सांग लवकर.

**सत्व**—मी बुवा या कामांत कांहीं बोलायचा नाहीं. तुह्मीं कांहीं सांगाल, तें मी करणार!

**रज**—हा पहा मी तुला पाहिजे तर एक नमस्कार घालतों. ( सा० न० घालून ) सांग आतां.

**सत्व**—पण, अगोदर बोलण्याचा मला अधिकार नाहीं !

**शिव**—जीवराया ! हा पहा सत्वगुणांत रज.

**जीव**—तो कसा ?

**शिव**—पहा, त्याला कसा झुलवतो आहे तो.

**जीव**—समजलें, सत्वाला पीळदार बोलणें कशाला पाहिजे ?

**शिव**—बरोबर. बरें ऐक पुढें.

**रज**—सांगरे ! जाऊंद्या.

**सत्व**—नकोरे बुवा. मला या तमाची खरोखर मोठी भीति वाटते.

**शिव**—हा पहा. सत्वांत तम.

**जीव**—हो. ओळखला.

**रज**—नको, आतां त्याची भीति नको. गेला आतां त्याचा राग.

**सत्व**—पण हें, तूं सांगून काय उपयोग ?

**रज**—( तमास ) सांगरे बुवा, तूं सांग व त्याची माफी माग. नाहीं तर सर्वांसच देहांत प्रायश्चित्त भोगावें लागेल. सत्व आहे आपला युक्तिबाज. तो हर युक्ति प्रयुक्ति योजून, संकटांतून पार होईल. धाड येणार तुझ्यावर आणि माझ्यावर ! यासाठीं त्वरा करा.

**शिव**—हा पहा, **रजांत सत्व** !

**जीव**—बरोबर ! हें शहाणपणाचें बोलणें आहे.

**सत्व**—( मनांत हंसतो ).

**तम**—( महा संकट भासवितो ).

**रज**—हं ! होऊंद्या. वेळ नको.

**तम**—( हात जोडून ) चुकलों बुवा. मला माफ कर.

**जीव**—हा **तमांत सत्व**. नव्हे का ?

**शिव**—हो. बरोबर.

**सत्व**—( तमास कवळून ) बंधो माफी कसली ! आपण तिघे सोईनें वागलों ह्मणजे सर्वच काम नीट होऊन, आपल्यांतून कोणासच वरिष्ठाचा दोष लागणार नाहीं. पण तूं आपला जेव्हां तेव्हां असाच. यामुळें मला फार वाईट वाटतें.

**तम**—नाहीं. आतां मी तुजवर कधींच रागावणार नाहीं.

**सत्व**—तूं प्रत्येक खेपेस असेंच ह्मणतोस. पुनः आपलें मूळचेंच.

**तम**—पण ( हात जोडून ) पुनः नाहीं ह्मटलेंना ?

**जीव**—शाबास ! याचें नांव शहाणपण ! त्या सत्वानें विशेष न बोलतां, त्यास कसा नरम करून सोडला पहा !

**शिव**—अरे सत्व तो सत्व. त्याची सर या दोघांना कसली येणार ?

**जीव**—या रज तमांवर नेहमीं सत्वाचीच सत्ता असते काय ?

**शिव**—नाहीं, कधीं कधीं हेही प्रबळ होऊन, सत्वास नाहींसा करून टाकतात. परंतु हा यांचा जय, फार वेळ टिकत नाहीं.

**जीव**—मिळून शेवटीं जय सत्वाचाच.

**शिव**—खरेंच. आणि ह्मणूनच परमात्मप्राप्तीस शेवटीं आश्रय याचाच केला पाहिजे. याच्या शिवाय भगवद्दर्शन होणें नाहीं.

**जीव**—मग कित्येक दैत्य, भगवद्रूपीं लीन होतात, ते कसे ?

**शिव**—ते तमोगुणी खरे. पण अति तमोगुणानें, ते परमेश्वराचे द्वेष्टे बनतात; व त्या द्वेषामुळें, त्यांस ध्यानीं मनींही परमात्माच भासतो. अर्थात्, सत्वगुणानें जें कार्य व्हावयाचें तेंच कार्य त्यांच्या तमोगुणापासून शेवटीं होतें ह्मणूनच त्यांस भगवल्लाभ होतो.

**जीव**—समजलों. पण शेवटीं सत्वाशिवाय गति नाहीं ?

**शिव**—नाहीं. बरें, हे पुढें काय बोलतात ऐक.

**जीव**—होय. पण एक विचारावयाचें राहिलें आहे तेवढें विचारतों ह्मणजे झालें.

**शिव**—विचार, विचार काय तें.

**जीव**—सत्वावरून भगवत्पदीं जातां येतें, तसें कधीं तमावरूनही जातां येतें, म्हणून सांगितलें, त्याचप्रमाणें रजोगुणावरूनही भगवद्दर्शन होईल काय ?

**शिव**—नाहीं, मुळींच होणार नाहीं. त्यानें पाहिजे तर सत्वगुणी व्हावें, अगर तमोगुणी होऊन, भगवंताचें पूर्ण शत्रुत्व संपादावें !

**जीव**—छे ! छे ! भगवंतापासून उत्पन्न होऊन, पुनः त्याच्याशीं वैर करावें, हा अत्यंत कृतघ्नपणा होय.

**शिव**—शाबास ! ऐक, पुढें ऐक. ते पहा, काय बोलत आहेत.

**सत्व**—आतां ऐका. फार वेळ होऊन गेला आहे. राज कार्य वेळेवर न झाल्यास त्याचा कोप व्हावयाचा. करितां, आतां असें करूं. आह्मां तिघांच्या ताब्यांत हीं पंचमहाभूतें आहेत. हीं पांच प्रकारचीं पांच आहेत. जसा कारागीर भेटेल, तसतशा यांच्या अनंत वस्तु होणार आहेत. आपल्या आदिमायेला, जितकें होईल तितकें सृष्टिवैचित्र्य पाहिजे. याकारितां, तें जेणेंकरून साधेल ते उपाय केले पाहिजेत.

**रज**—( तमास ) पाहिलेंस. नाहीं तर **तूं व मी** ! प्रसंगीं कसें वागलें पाहिजे तें एकासहि सुचेना !

**तम**—खरेंच बाबा ! मला तर प्रसंगीं ध्यानभ्रष्टताच प्राप्त होते.

**सत्व**—आह्मां तिघांपाशीं तीन प्रकारचे गुण आहेतच; व गुण म्हणजे स्वभाव, हेही तुह्मीं जाणतच आहां.

**रज**—बरें, मग हा स्वभाव काय करावयाचा ?

**सत्व**—अरे, वर सांगितल्याप्रमाणें, पंचमहाभूतांपैकीं प्रत्येकांत दुसरीं चार भूतें, अत्यंत सूक्ष्म फरकानें थोडीं थोडीं वाढवीत गेलों, तर प्रत्येक भूतापासून भिन्नभिन्न अशा किती वस्तु होतील बरें ?

**रज**—अनंत ! अनंत !!

**तम**—मित्रा, निःसंशय अनंत वस्तु होतील !

**सत्व**—या अनंत वस्तूंत आपणांतून प्रत्येकानें, थोडथोडा आपापला गुण प्रेरित करावयाचा !

**रज**—अहाहा ! मित्रा ! काय तुझी ही बुद्धिमत्ता ! या करण्यानें तर फारच बहार उडून जाईल ! याच्यायोगें कधीं उत्तम दिसणारी व्यक्ति, कदाचित् अगदीं दुष्ट असूं शकेल. तसेंच, दिसण्यांत सारख्या सारख्या असणाऱ्या वस्तु, कधीं भिन्नस्वभावीही असतील. अर्थात् अनंत वस्तूं पैकीं प्रत्येक वस्तु, अनंतस्वभावी होऊं शकेल !

**सत्व**—आणि, आमच्या आदिमायेसही वैचित्र्य पाहिजे ! अर्थात्, आपण तिघे सलोख्यानें वागून, या कामास लागलों कीं, आपणास **आदिमहाराज्ञीकृपा** कायमची नाहीं का लाभली ?

**तम**—बरोबर आहे. तूं सांगितलेंस तसेंच करावयाचें !

**सत्व**—ठीक आहे. बा पंचमहाभूतांनो ! हा सर्व संवाद आपण सर्वांनीं ऐकलाच असणार. राजाज्ञेप्रमाणें अप्रतिम वैचित्र्यपूर्ण अशी सृष्ट्युत्पत्ति करावयाची आहे, आणि ती सृष्टि तुमच्याशिवाय होणें नाहीं. याकरितां हें राजकार्य, विलंब न करितां, केलें पाहिजे. तेव्हां कोण कोण, काय काय कामें करण्यास तयार आहेत तें सांगा पाहूं. ?

**आकाश**—महाराज, राजाज्ञेप्रमाणें पाहिजे तें काम करण्यास मी तयार आहें. मी जरी महाभूतांत सर्वांहून विस्तृत आहे, तरी दुसऱ्या

दृष्टीनें मी पांचही भूतांत सर्वांहून अत्यंत सूक्ष्म व विरल आहें. इतका विरल, कीं मी आहें कीं नाहीं, हें समजत सुद्धां नाहीं. ( पोकळी दाखवितो. )

**सत्व**—बरें, मग तुझें पुढें ह्मणणें काय?

**आकाश**—ह्मणणें दुसरें कांहीं नसून, मला बाकी चार भूतांची मदत पाहिजे. ती असल्याशिवाय मजकडून एकही आकृति तयार होणार नाहीं.

**सत्व**—ठीक आहे. वाय्वादि चतुर्भूतांनो!

**चतुर्भूतें**—( उठून हात जोडून ) महाराज!

**सत्व**—तुह्मी चौघांनीं या आकाशास पाहिजे ती मदत करावी.

**चौघे**—आज्ञा.

**सत्व**—शिवाय, तुह्मी पांचही महाभूतांनीं परस्परांस लागेल तें सहाय करावें.

**चौघे**—ठीक आहे, महाराज!

**सत्व**—आकाशा! झालें तुझें? आणखी तुला काय काय सहाय पाहिजे?

**आ०**—मला आणखी कांहीं नको.

**सत्व**—मग, तूं आतां सृष्ट्युत्पत्ति कशी काय करणार?

**आ०**—मी, या चतुर्भूतांना अगोदर माझ्या घरांत रहावयास पाहिजे तेवढी जागा देईन.

**सत्व**—ठीक. जागा तर प्रथम पाहिजे. पण हें प्रत्येक **महाभूत** आहे हो! **अल्पभूत** नव्हे! प्रत्येकास त्याच्या लवाजम्याप्रमाणें जागा फार लागणार! करितां विचार करून सांग.

**आ०**—महाराज! मी सत्वगुणी असल्यामुळें, माझें बोलणें विचार सोडून कधींच नसतें. म्हणून मीं पुनः सांगतों कीं, प्रत्येक भूतास त्याच्या लवाजम्यासह पाहिजे तितकी अपरंपार जागा, मी देईन.

**तम**—ठीक, एक काळजी दूर झाली. जागा नसल्यास मोठी पंचाईतच होती.

**सत्व**—बरें, पण तूं सृष्टिसौंदर्यास भर घालण्याकरितां कोण-कोणत्या वस्तु तयार करशील ?

**आ०**—महाराज ! मी फारच विरळ असल्यामुळें, मज स्वतः-कडून एकही वस्तु तयार होणें नाहीं.

**सत्व**—तर मग जागेशिवाय तुजकडे कांहीं नाहीं, असेंच ना ?

**आ०**—तसें नव्हे महाराज ! बाकी भूतांच्या साह्यानें, ज्यांत मी विशेषत्वानें आहें, अशा वस्तु मी निर्माण करीन.

**सत्व**—ठीक. त्या कोणत्या !

**आ०**—**अनंत पक्षी**. शिवाय **शब्द** (आवाज) हा एक विषय पैदा करीन.

**सत्व**—ठीक आहे. शब्द हा विषय सृष्टिसौंदर्यास पुष्कळ भर घालील.

**रज**—बरें. बाबा वायु ! तूं कसें काय योजिलें आहेस ?

**वायु**—महाराज, मजबद्दल आपण धास्तीच करूं नका. संपूर्ण ब्रह्मांडाची हालचाल करण्याचें काम, मीं घेतलें आहे. माझ्या शिवाय कोणतीही गोष्ट होणें नाहीं. जगाच्या जीवनास कारण **मी** आहें, सरकार !

**रज**—बरोबर आहे. म्हणूनच तूं, तेज व आप यांसही **कार-भारी तत्वें** म्हटलीं आहेत. बरें तूं काय काय वस्तु निर्माण करशील?

**वायु**—मला ही स्वतःला कांहींच करतां येणार नाहीं. तथापि बाकी भूतांनीं थोडथोडें साहाय्य केल्यास, मीही सृष्टिसौंदर्यास शक्त्यनुसार मदत करीन.

**सत्व**—ती कोणती ?

**वायु**—महाराज! ज्यांत माझा अंश जास्त आहे, अशा **देवता, यक्ष, पिशाच्यादि व्यक्ति** मी निर्माण करीन. पण त्यांत सुद्धां स्वभाव भरण्याचें काम आपण केलें पाहिजे; बरं का ?

**तम**—तें तर ठीकच आहे. आह्मां तिघांशिवाय स्वभाव आहे कोठें? तुम्ही पंचमहाभूतांनीं फक्त आकृति ओतून तयार करावयाच्या. त्यांत स्वभाव भरण्याचें काम आमचें !

**सत्व**—बरें वायु, तूं कोणते विषय करूं शकशील ?

**वायु**—महाराज, मी आकाशाहून जरी लहान आहें तरी मी जगांत दोन विषय उत्पन्न करीन.

**सत्व**—ते कोणते ?

**वायु**—**स्पर्श** हा माझा स्वतःचा विषय आहे. शिवाय **शब्द** हाही विषय मजकडेच आहे.

**रज**—शब्द हा तर विषय आकाशाचा आहे.

**वायु**—तें खरें. पण माझी उत्पत्ति आकाशापासून असल्यामुळें, मजमध्येंही तो विषय उतरला आहे.

**तम**—कशावरून ?

**वायु**—( फुंकर घालून ) तुम्हांला स्पर्श भासला ?

**सत्व**—हो.

**वायु**—हा शब्द ऐका. शिवाय मोठा स्पर्श पाहिजे तर तसें सांगा. ह्मणजे **वादळ** सुरू करितों.

**सत्व**—नको नको बाबा ! तुझा प्रताप सर्वश्रुत आहेच.

**रज**—बरें, तेजराज, तुमचें कसें काय ?

**तेज**—महाराज ! माझा प्रताप माझ्या नांवावरून व्यक्त होत आहे. बाकी भूतांनीं कितीही कामगिरी केली, तरी ती सतेज करण्याचें काम माझें आहे. मी नसल्यास, सर्व कांहीं **प्रेतवत्** दिसणार. माझे शिवाय जगाचें जीवन नाहीं. कारण, मजशिवाय अन्नाचा परिपाक होणें शक्य नाहीं. प्रसंग विशेषीं, मी सर्व कांहीं जाळून भस्म करीन.

**सत्व**—पण तूं सृष्ट्युत्पत्तीस मदत कशी काय करणार ?

**तेज**—महाराज ! मज एकट्याकडूनही कांहीं वस्तु तयार होणें नाहीं. तरी पण, मला इतर भूतांचें थोडें बहुत सहाय्य असल्यास,

मी **सूर्यचंद्रादि खस्थ गोलावलि** निर्माण करीन. शिवाय **रूप** हा माझा स्वतःचा विषय असून शिवाय **शब्द, स्पर्श,** हेही दोन विषय माझ्यापाशीं आहेत.

**तम**—हां. म्हणजे **आकाश, वायु** व **तेज** या तिन्ही भूतांचे विषय यांत आले ?

**रज**—होय. आतां आपराया ! तुमचें कसें काय ?

**आप**—महाराज ! वायुतेजाप्रमाणेंच, मीही एक कारभारी तत्व आहें !

**तम**—म्हणूनच त्यांच्या प्रमाणें तूंही राजकार्यास हातभार लावला पाहिजे.

**आप**—महाराज ! मलाही स्वतःला कांहींच करतां येणार नाहीं, तरी मी विस्तीर्ण **महासागर, समुद्र, नद्या** व **मेघा**दिकांच्या स्वरूपानें सृष्टींत राहून, सृष्टिसौंदर्यास शोभा आणीन. शिवाय मला इतर भूतांनीं अंशतः मदत केल्यास, ज्यांत मी विशेषत्वानें आहें असे **मत्स्य कूर्मादि** अनंत **जलचर** व **जलदेवतादि** उत्पन्न करीन.

**तम**—वाहवा ! आणखी काय पाहिजे ? आतां तर सृष्टिभुवनाचें सौंदर्य निःसंशय अप्रतिम होईल !

**सत्व**—ठीक. पण आपराजा, तुझे विषय कोणते ?

**आप**—महाराज ! **रस** हा माझा स्वतःचा विषय असून शिवाय **शब्द, स्पर्श, रूप** हेही विषय मजकडे आहेत !

**सत्व**—यास अनुभव ?

**आप**—मी वाहूं लागतांच खळखळ **आवाज** होतो. मजमध्यें हात बुडविल्यास मीं थंड लागतों, हाच **स्पर्श**, मी पातळ प्रवाही आहें. हेंच माझें **रूप** व **क्षार, कडु**, मधुरादि माझा **रस**!

**तम**—ठीक. आतां भूमाते ! आपले सांगा ह्मणजे झालें.

**पृथ्वि**—महाराज ! मजबद्दल आपण निर्धास्त असावें; बाकी भूतांप्रमाणेंच माझाही प्रभाव कांहीं कमी नाहीं. मी अत्यंत जड असल्यामुळें जगांत माझ्याशिवाय कोणतीही वस्तु **साकार** होणें

नाहीं. मीं आहें, ह्मणूनच सर्व जीवजंतूंस आधार आहे. मी या सृष्टींत **डोंगर, पर्वत, मैदानें, बेटें** वगैरेच्या रूपानें असून नानाप्रकारचीं मौल्यवान रत्नें, धातु, पाषाण, क्षार, मृत्तिकादि द्रव्यें मीं आपल्या पोटांत भरून ठेविलीं आहेत. त्या प्रत्येकाचा सृष्ट जीवजंतूस फार मोठा फायदा करून घेतां येईल! शिवाय, संपूर्ण जीवजंतूंच्या उत्पत्तीस कारणभूत मीच आहें.

**सत्व**—ती कशी?

**पृथ्वि**—ऐका महाराज! जीवजंतूंच्या उपत्तीस कारण **वीर्य,** वीर्यास कारण **अन्न,** अन्नास कारण **वनस्पति,** व वनस्पतीची उत्पत्ति **मज**पासून आहे!

**सत्व**—बरें, तुझ्या ठिकाणीं कांहीं विषय आहेत काय?

**पृथ्वि**—हो आहेत तर. **गंध** हा माझा स्वतःचा विषय असून, शिवाय बाकी या सर्व भूतांचे विषयही मजमध्यें आहेत.

**सत्व**—ठीक. गड्यांनो, झाली आपली सर्व सिद्धता!

**शिव**—बा जीवराया! ऐकलास ना हा सर्व संवाद? या संवादावरून तुला त्रिगुणापैकीं प्रत्येकाचा स्वभाव, व प्रत्येक भूताचा गुणधर्म, चांगला कळलाच असला पाहिजे.

**जीव**—होय. आला बहुतेक प्रकार लक्षांत. शिवाय कांहीं शंका वाटल्यास ज्या त्या वेळीं विचारीत जाईन. पण शिवराया! आतां हे काय करणार?

**शिव**—जीवराया! आतां हीं पंचमहाभूतें व हे त्रिगुण, आपलीं हीं स्वरूपें सोडून जगद्रूपानें नटणार?

**जीव**—काय नटणार? म्हणजे? आतां हीं या रूपानें दृष्टीस नाहीं पडणार?

**शिव**—ऐक. हे त्रिगुण तर मूर्त्रिमंत कधींच नाहीं दिसावयाचे! ते फक्त गुणस्वभावावरूनच ओळखावयाचे!

**जीव**—बरें पंचभूतें तरी?

**शि०**—या पंचमहाभूतांचीं जीं वास्तविक रूपें आहेत, तीं कधीं स्वल्प प्रमाणानें, व कधीं महाप्रचंड व भयंकर प्रमाणानेंही दृग्गोचर होतील! शिवाय, तीं कधीं कधीं प्रत्यक्ष न दिसतां फक्त त्यांच्या गुणावरूनच ओळखावयाचीं, असाही प्रसंग येईल!

**जीव**—मग, हा मोठा गोंधळच उडणार, मला वाटतें!

**शिव**—अरे, गोंधळ तर आहेच. कारण हा सर्व अष्टधा प्रकृतीचा **कालवा**, अगर **चिवडा** बनला आहे! परंतु असें जरी असलें तरी तुला कांहीं भिण्याचें कारण नाहीं. कारण तुला, मूळापासून सर्व प्रकार मीं समक्ष दाखविला आहे. परंतु तूं वारंवार आपलें मूळ विसरतोस, तसें विसरूं नको; म्हणजे कांहीं गोंधळ नाहीं!

**जीव**—पण मला बुवा, हा प्रकार गोंधळांत पाडणार!

**शिव**--छे! गोंधळण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण, हीं जीं आठ रूपें, तीं आपल्या महामायेचींच आहेत. आणि महामाया ही कोण? आदिमायेची स्फूर्ति! व आदिमाया ही कोण? सत्स्वरूपाची स्फूर्ति!

**जीव**--मग?

**शिव**--मग काय? समुद्रावर लहरी ही जशी मिथ्याभासरूप, त्याचप्रमाणें **परब्रह्मस्वरूपावर स्फूर्ति**,हा मिथ्याभास आहे. बोलून चालून जर **जादू**, तर त्या मंत्रसामर्थ्यानें निर्माण केलेल्या वस्तु खऱ्या कोठून असणार? अर्थात् हीं आठही रूपें **झूट** आहेत.

**जीव**—तर खरें काय?

**शिव**—ती प्रथम स्फूर्ति-रूपी कोंब ( मोड ) ज्या मूळ कंदापासून उद्भवला, तो **मूळकंद** म्हणजेच **परब्रह्मपरमेश्वर.** तो खरा काय, आतां तरी आलास शुद्धीवर?

**जीव**—समजलों.

**शिव**—तो मूळकंद तेंच आपणां उभयतांचें मूळ ठिकाण, तेथूनच आम्ही सृष्टिसौंदर्य पहाण्यास निघालों आहों. आमच्या मूळ ठिकाणाशिवाय, बाकी सर्व **भ्रम** आहे. हीच गोष्ट ध्यानांत ठेव.

**जीव**—ठीक आहे.

**सत्व**—आतां गड्यांनो, आपलीं पुढील कामें अशीं अप्रतिम करा कीं, कोणासही आपलें खरें रूप समजूंच नये!

**रज**—ठीक आहे.

**तम**—तरच त्याचें नांव कौशल्य!

**सत्व**—तसेंच पंचमहाभूतांनो, आपणही.

**पं०म०भू०**—महाराज! सृष्टिसौंदर्य पाहिल्यावर आपली खात्री होईल.

**सत्व**—चला तर! सर्व सृष्टिरूपानें नट्टं या.

**सर्व**—चला, चला, चला.

**जीव**—चल, आपणही जाऊं या?

**शिव**—चल. ( सर्व जातात—पडदा पडतो. )

**( पहिला अंक समाप्त. )**



# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—( एक विस्तीर्ण जंगली प्रदेश–डोंगर, ज्वालामुखी, समुद्रकिनारा, गुहा, भारेवाला, प्रवासी, पशु, पक्षी वगैरे. )

**शिव**—अहाहा! कोण हें सृष्टिसौंदर्य! हे **अष्टधाप्रकृति!** तुझी धन्य आहे!

**जीव**—( साश्चर्य ) अबब! हें काय इकडे किती उंच!

**शिव**—अरे, ही पृथ्वि! मातीचे एकावर एक थर बसबसून, हा उंचवटा बनला आहे. याला **डोंगर** किंवा **पर्वत** म्हणतात. यांत पृथ्वीशिवाय दुसरें काय आहे! ही सर्व मृत्तिका व पाषाण यांची रास आहे.

**जीव**—( डोंगराच्या बाजूनें फिरतो, तों एक गुहा दृष्टीस पडते. ) ओ हो हो! ( आंत जातो. ) **शिवराया!** ही पहा इकडे केवढी पोकळी! आंत तर कळोखाशिवाय कांहींच दिसत नाहीं.

**शिव**—अरे, या पोकळीला **गुहा** असें ह्मणतात. ही पोकळी, हेंच **आकाश.** आपण, हा सर्व विस्तीर्ण प्रदेश, व हे चंद्र, सूर्य नक्षत्रादि सर्व, ज्या एका मोठ्या पोकळीमध्यें आहेत, त्यास मोठें आकाश, अथवा **महदाकाश** ह्मणतात.

( तोंच एक केविलवाणा शब्द ऐकूं आल्यावरून तो त्या गुहेंतून बाहेर येऊन पाहतो, तों एक हरीण मरणोन्मुख होऊन पडलेला आहे व एक पाठीवर बोचकें बांधलेला प्रवासी आपलें मार्गक्रमणाचें काम टाकून, दयाळुत्वानें त्या हरणापाशीं बसला आहे, असें पाहतो. )

**प्रवासी**—अरेरे! कोणीं बरें हा दुष्टपणा केला? या बिचाऱ्या निरपराधी मुक्या जनावरास विनाकारण कां बरें ठार मारिलें? शिव! शिव! शिव! ( असें ह्मणत त्या प्रेताच्या पाठीवरून हात फिरवितो आहे, तोंच एक तीरकमटा घेतलेला भिल्ल आला. )

**भिल्ल**—(त्या प्रवाशास एक ठोंसा देऊन) आयती शिकार पाहून जिभेला पाणी सुटलें वाटतें!

**प्रवासी**—( दचकून मागें पाहून ) नाहीं रे बाबा! याची शेवटची तळमळ पाहून, मनास फार वाईट वाटलें, ह्मणून जवळ आलों होतों! असें असतां, तूं उगीच मला मारिलेंस! या हरणानें तुझें काय बरें केलें होतें?

**भिल्ल**—( त्याला खेंचून ) ये, तुला सांगतों, काय केलें होतं तें! ( असें ह्मणून त्याच्या बोंचक्यांतील कांहीं वस्तु हिसकाहिसकीनें काढून घेऊन, व ती शिकार खांद्यावर मारून जाऊं लागतो. )

**प्रवा०**—धांवारे, धांवारे कोणी! दुष्टा, तुला काय सांगूं? मला या जखमा झाल्या नसत्या, तर तुला सांगितलें असतें कसें काय तें! ( जवळून जाणाऱ्या मोळीवाल्यास ) अरे बाबा! तूं तरी येरे माझ्या मदतीस. हा चोर माझें सर्वस्व घेऊन जात आहे!

**भारेवाला**—नकोरे बुवा, मला ती मदत! माझेंच मला आटपेना. सकाळपासून लांकडें जमा कर करून, बांधलेली ही मोळी, माझ्या माथ्यावर कशी चढते, या काळजींत मी! लावतोस का जरा हात! मी तुझा मोठा उपकारी होईन.

**प्रवासी**—ठीक आहे. अरे तो तर माझा धर्मच आहे! हा पहा आलों! ( हळू हळू जातो. ) वडील बावा, काय करूं?

**भारे०**—ही मोळी माझ्या माथ्यावर चढवायची!

**प्रवा०**—हात्तेच्या! इतकेंचना? ( त्यास हात लावून ती मोळी त्याच्या डोकीवर चढवितो. ) जा बाबा! तुझें आजचें पोट या मोळीवर!

**भारे०**—होय माझ्या बाबा! काय करावें! आतां ही मोळी गांवांत विकून, जें काय येईल, त्यावर पोरांना रात्रीं भाकरी!

**प्र०**—अरेरे! काय हें अठराविश्वे दारिद्र्य! वडील बावा! ही तुझी दीनावस्था पाहून मला भारीच वाईट वाटतें. मीही शक्त्य-

नुसार तुला कांहीं मदत केली असती. पण काय करूं? मला त्या भिल्लानें साफ झळझळीत करून सोडिलें.

**भारे०**--नको नको. बाबा मला कांहीं नको. तूं कळवळून " दिले असतें " ह्मटलेंस इतक्यानेंच मला तें दिल्यापेक्षांही अधिक झालें. परमेश्वर तुझें कल्याण करील! बरें येतों बाबा आतां! उशीर झाला.

**प्र०**—ये, ये, बाबा! सांभाळून जाहो!

**भारे०**—बरं आहे. ( भारेवाला जातो. )

**प्रवासी**—आतां काय बरें करावें? होतें नव्हतें तें सर्व कांहीं हा दुष्ट भिल्ल घेऊन पळाला! वाटेवर कोठें पाणी पिईन ह्मटल्यास, तांब्या सुद्धां ठेविला नाहीं! असो. एकाअर्थी त्याचें बरोबर आहे! माझा वेळ जर बरा असता, तर आधीं माझ्या यजमानाचें राज्य शत्रूच्या हातीं जाऊन; मी माझ्या जहागिरीस कां मुकतों? असो. प्रभुसत्ता!

**जीव**—शाबास, या प्रवाशाची! किती हा याचा उत्तम स्वभाव! विनाकारण इतका मार खाऊन, आपलें सर्वस्व गेलें असतां, मनाची समता कायम राखून दुसऱ्यास शक्त्यनुसार मदत करावयास जाणें, हा मनाचा केवढा मोठेपणा!

**शिव**--शिवाय, मोळीवाल्यानें यास याच्या बिकट प्रसंगीं मदत केली नसतांही! **जीवराया**! हा जो याचा उत्तम गुण, याचेंच नांव **सत्वगुण**.

**प्रवा०**—बरें, पण इकडे या झुडपांत लहान मुलासारखें रडतें कोण? ( जाळीच्या आंत जातो व एक बालक घेऊन येतो. ) अहाहा! किती मोहक हें बालक आहे बरें? अरे, पण हा मुलगा कीं मुलगी? ( पाहून ) हा तर मुलगा आहे. अशा या सुंदर पुत्र-रत्नाचा, या निर्जन अरण्यांत त्याग करण्याची, कोणा बरें दैवहीनास ही दुर्बुद्धि उपजली? अथवा, ही दुर्बुद्धि तरी कशी! जर भक्तवत्सल प्रभूनें, माझ्या प्रियतमेच्या, तिच्या

ठायीं असलेल्या एकनिष्ठेस प्रसन्न होऊन, तिचें निपुत्रिकत्व नष्ट करण्याकरितांच हें घडविलें असेल, तर त्याची ती सद्बुद्धीच ह्मणावयाची! असो. येथें आसपास तर कोणींच दिसत नाहीं. तेव्हां प्रभूनें, हें पुत्ररत्न मलाच दिलें, असें मी समजतों. यापासून माझ्या प्रियेलाही मजप्रमाणेंच सर्वस्व गेल्याचें दुःख तर होणार नाहींच; पण उलट पराकाष्ठेचा आनंदच होईल! असो. आपण आतां जावें. अद्याप हा निर्जंतच आहे, असूंद्या ( मुलाला घेऊन जातो. )

**शिव**—समजलास? त्याचप्रमाणें, आपल्या कामापुढें, दुसऱ्याच्या कामाचें महत्व नाहीं. "आपलें काम कीं आपण" हा स्वभाव कोणी दाखविला बरें?

**जीव**—त्या भारेवाल्यानें.

**शिव**—शाबास! तर त्या भारेवाल्याचा जो गुण, तोच **रजोगुण** तसेंच आपल्या जिभेची केवळ हौस भागविण्याकरितां, ज्यानें त्या बिचाऱ्या निरपराधी हरिणीचा जीव घेऊन, तिच्या पोरांस धाय धाय रडावयास लाविलें, व त्या गरीब प्रवाशास विनाकारण मार देऊन, त्याचें सर्वस्व हरण करून पळून गेला, त्या दुष्ट भिल्लाच्या आंगचा जो गुण, तोच **तमोगुण.**

**जीव**—बरोबर. या तीन गुणांच्या योगानेंच, यांची योग्यताही तीन प्रकारची झाली. पण, **शिवराया**! हा धूररे कसला, या डोंगरांतून निघाला? अरे, आतां तर ज्वाळाच येऊं लागल्या!

**शिव**— **जीवराया!** याला **ज्वालामुखी** असें ह्मणतात. **तेज** ह्मणून जें तत्व तें हेंच.

**जीव**—असें काय! हें तर मोठेंच भयंकर बुवा! बरें मित्रा! हे वृक्ष खुणावून कोणास बरें बोलवित आहेत?

**शिव**—**जीवराया!** हे वृक्ष कोणासही बोलवीत नसून हा सोसाट्याचा वारा सुटल्यामुळें, तोच त्यांना हालवीत आहे.

**जीव**—कोण वारा?

**शिव—वायु** ह्मणून जें तत्व, तें हेंच. इकडे ये. तुला आणखी मजा दाखवितों. ( समुद्राकडे जाऊन ) हा पहा केवढा जलसंचय !

**जीव**—अ-ब-ब-ब ! हें रे काय ! अरे ही गर्जना तरी केवढ्या मोठ्यानें हा करितो आहे ?

**शिव**—मित्रा, याला **समुद्र** ह्मणतात. **आप,** ह्मणून जें तत्व तें हेंच. वाऱ्यामुळें, त्यावर ज्या या लाटा येत आहेत, त्यांच्या एकमेकांवर व खडकांवर आपटण्यानें, ही गर्जना होत आहे.

**जीव**—काय या लाटा वाऱ्यामुळें उठतात ?

**शिव**—होय. हा पहा किती जोरदार वारा सुटला आहे तो ? तोच हें पाणी उसळवीत आहे.

**जीव**—पण मित्रा ! येथें **अष्टधाप्रकृति** मूर्तिमंत पहावयास सांपडलीना ?

**शिव**—होय का ! दाखिव बघूं पुन: ?

**जीव**—( प्रत्येकाकडे बोट करून ) ही पहा **पृथ्वी**, हें **आप,** हें **तेज**, हा **वायु** आणि हें **आकाश** !

**शिव**—आणि त्रिगुण कोठें आहेत ?

**जीव**—त्या **प्रवाशाच्या** आंगचा जो गुण, तो **सत्वगुण;** त्या **भारेवाल्या**च्या आंगचा जो गुण तो **रजोगुण;** व त्या **भिल्ला**च्या आंगचा जो गुण, तो **तमोगुण.**

**शिव**--शाबास ! आतां ह्या सृष्टींत ही अष्टधाप्रकृति बरोबर ओळखून, वागत जा. ही अष्टधाप्रकृति, महामायाच नटली आहे ! व महामाया ही, मूळ स्वरूपाची इच्छा आहे व इच्छा ही कांहीं खरी वस्तु नव्हे. या समुद्राची लाट, कांहीं खरी वस्तु नव्हे. समुद्र मात्र खरा. त्याचप्रमाणें, ही माहामाया, मूळरूपावर **लहर-रूप** आहे. करितां, ती लहर **जेथून** उठते, तें आपलें **मूळ** आहे, तें विसरूं नको.

**जीव**--मित्रा, तूं वारंवार मला जागृति देतोस, ह्मणून कांहीं बरें आहे. मला तर बुवा हे चित्रविचित्र प्रकार पाहून, मूळच विसरायास होतें. असो, पण मला बुवा, आणखी एक शंका आहे.

**शिव**—विचार!

**जीव**—वरील आठ तत्वांशिवाय, या सृष्टींत आणखी कांहीं तत्वें असलीं पाहिजेत.

**शिव**—मुळींच नाहींत. सर्व सृष्टि, या आठ तत्वांवरच चालली आहे. व तीं आठ तत्वें, कमजास्त प्रमाणानें सृष्टींतील प्रत्येक वस्तूंत भरलेलीं आहेत!

**जीव**—हें कांहीं मला खरें वाटत नाहीं.

**शिव**—घे, पाहिजे ती वस्तु. प्रत्यक्षास प्रमाण कशाला?

**जीव**—हें झाडाचें पान घेतलें. दाखिव यांत अष्ट तत्वें.

**शिव**—ठीक आहे. **पृथ्वीचें** रूप काय?

**जीव**—दगड, माती वगैर.

**शिव**—ह्मणजे जडपणा, घट्टपणा; पृथ्वितत्वाशिवाय वस्तूंस आकार नाहीं. अर्थात् हा देंठ, शिरा व बाकी भाग, मिळून सर्व **पृथ्व्यंश** आहे.

**जीव**—बरोबर. बरें **आप**?

**शिव**—यांत जो हा **ओलसर**पणा आहे तेंच **आपतत्व.**

**जीव**—ठीक. बरें **तेज**?

**शिव**—(पान हातावर घांसून) हा जो यांत **गरमपणा** तेंच **तेज.**

**जीव**—अहाहा! काय ही सूक्ष्म रचना आहे? बरें, **वायु**?

**शिव**—प्रत्येक वस्तु, बारीक बारीक सूक्ष्म वर्तुल परमाणूंची बनलेली आहे. अर्थात् वर्तुलाकार परमाणूंच्या राशींत मध्यें मध्यें पोकळी रहावयाचीच. त्या मधील पोकळींत जो भरलेला आहे, तो **वायु**; व ही चारी तत्वांच्या मिश्रणानें बनलेली पानाची आकृति, ज्या अवकाशामध्यें आहे, त्या अवकाशाचें नांव **आकाश**!

**जीव**—( विचार करून ) समजलों. ह्मणजे, पृथ्वितत्व आकारानें स्पष्ट दिसावयाचें, व बाकी त्याच्या आंत सूक्ष्मांशानें शोधावयाचीं; असेंच ना?

**शिव**—होय. पण त्यांत आणखी थोडें लक्षांत ठेविलं पाहिजे. **पृथ्वि**, हें पांचवें तत्व. ह्मणून त्यांत पांचही तत्वें, व पांचीं तत्वांचे पांचही विषय पहावहास सांपडतील.

**जीव**—आणि **आप**तत्वांत ?

**शिव**—**आप**, हें चौथें तत्व. म्हणून त्यांत **पृथ्वि**तत्व, व तिचा **गंध** हा विषय नसावयाचा. तसेंच **तेज** हें **तिसरें** तत्व ह्मणून त्यांत **आकाश, वायु**, व **तेज** हींच तीन तत्वें, व **शब्द, स्पर्श** व **रूप** हेच तीन विषय असतील. त्यांत **आप पृथ्वि** हीं भूतें, व **रस गंध** हे विषय नसावयाचे.

**जीव**—समजलों. ह्मणजे पांच पापुद्र्यांचा कांदा !

**शिव**—शाबास ! फारच उत्तम दृष्टांत शोधुन काढलास ? यांत सर्व कांहीं समजूत आली. **वरचा पापुद्रा**, तें **आकाश**. पहा, त्याच्या पोटांत बाकी चार भूतें. शिवाय दुसरें पहा. त्याप्रत्येक पापुद्र्याचे गुणधर्म ( विषय ) खालच्या सर्व पापुद्र्यांवर गेले आहेत. आतां आलें कीं नाहीं लक्षांत ?

**जीव**—हो आतां बरोबर समजलों. ह्मणजे **पृथ्वि**, सर्वांत लहान तत्व असून, त्याहून **आप, तेज, वायु, आकाश** हीं चारीं तत्वें, मोठीं मोठीं होत गेलीं आहेत. असेंचना ?

**शिव**—होय. तर सांग बघूं आतां ? वायु तत्वांत कोणतीं भूतें व कोणते विषय आहेत ?

**जीव**—**वायु**, हा दुसरा पापुद्रा. ह्मणून यांत **आकाश**, व **वायु**, हींच दोन तत्वें असून, **शब्द** व **स्पर्श** हे दोन विषय असले पाहिजेत ?

**शिव**—बरोबर. ह्मणजे, कोणतीं तत्वें व विषय यांत असावयाचे नाहींत ?

**जीव**—**पृथ्वि, आप, तेज** हीं तीन तत्वें; व **गंध, रस, स्पर्श** हे तीन विषय यांत नाहींत. पण येथें एक पुनः शंका येते.

**शिव**—कोणती ?

**जीव**—कधीं कधीं वायु, अग्नि, आप यांस वास येतो. तो कसा ? गंध हा पृथ्वीचा विषय. तो तिच्या **वरील** तत्वांत कसा गेला ?

**शिव**—शाबास ! मित्रा ! तूं आतां चांगला विचार करूं लागलास. हें पहा. तुझें ह्मणणें रास्त आहे. वरील तीन तत्वांस जो कधीं कधीं वास येतो. तो पृथ्वि विषयच त्यांत मिसळल्यामुळें येतो.

**जीव**—तो कसा ?

**शिव**—ह्मणजे एखाद्या फुलावरून जर वारा वाहला, तर त्या फुलाचा वास वाऱ्यांत उतरतो. तसेंच एखादा चंदानाचा तुकडा, जर अग्नींत पडला, तर चंदनाचा वास त्या अग्नीस यावयाचाच. त्याचप्रमाणें, पाण्याची गोष्ट. पण शुद्ध वायु, अग्नि, किंवा पाणी यांत वास बिलकूल नाहीं. पहा पाहिजे तर.

**जीव**—( तसें करून ) बरोबर आहे. आज तर तूं मला पुष्कळ गमतीच्या गोष्टी समजावून दिल्या. बरं आपणही आतां याच वाटेनें जावें. कारण तो बिचारा प्रवाशी व मोळीवाला याच वाटेनें गेले आहेत. यावरून, या बाजूस एखादा गांव असला पाहिजे, पण **शिव**-राया ! मला त्या प्रवाशाची आठवण झाली म्हणजे, पुनः पुनः फारच वाईट वाटतें बुवा !

**शिव**--मित्रा ! तो सत्वगुणी असल्यामुळें, त्याचा परमेश्वरावर पूर्ण विश्वास आहे. शिवाय त्यास जो हा आज पुत्र-लाभ झाला आहे, त्यावरून तूं खात्रीनें जाण कीं, त्याचें परमेश्वर **कल्याणच** करणार आहे. त्याची काळजी नको.

**जीव**--असो, बापड्याचें कल्याण होवो. बरें, चल तर, या जंगली प्रदेशापेक्षां, शहरांत सृष्टिवैचित्र्य पहाण्यासारखें खचित असणार. तें आपल्यास पहावयास सांपडेल.

**शिव**—बा, जीवराया ! तूं ह्मणतोस तें बरोबर आहे. पण मला तुझें भय वाटतें.

**जीव**—तें कसलें ?

**शिव**—अरे, तूं आहेस भ्रांत. भ्रांतीमुळें तूं आपलें मूळ विसरलास, तर या भवसमुद्रांत गटकळया खात राहाशील. एरव्हीं

आमच्या महामायेच्या क्रीडाभुवनाची शोभा, येथल्यापेक्षां शहरांत अधिक प्रमाणानें असणार, हें निर्विवाद आहे.

**जीव**--होय ना ! तर अवश्य गेलेंच पाहिजे.

**शिव**—पण फसलास तर ?

**जीव**—नाहीं फसणार, चल तूं.

**शिव**—चल तर. तो, तो, तो,–पहा प्रवाशी ! फारच लांब गेला ! बरं चल.

**जीव**—चल, चल. ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—गांवच्या वेशीजवळ देवीचें देऊळ. (देखावा) **तारांगना** ( नायकीण ) हातांत तंबुरी घेऊन देवीसमोर गात बसली आहे. शिवाय, कोणी स्तोत्र, कोणी प्रदक्षिणा याच्या आवृत्ति करितो आहे. ) ( चीज झटल्यावर )–

**तारा**—आई जगदंबे ! तुला नाहींचना अद्याप माझी करुणा येत? तूं मला जें हें अनुपम सौंदर्य दिलें आहेस, त्याचा व्यर्थ असा दुरुपयोग व्हावाना ? मी निश्चयानें पुनः सांगत्यें, जर मला कोणी यजमान द्यावयाचा असेल, तर या रत्नपुरीचा **राजा** दे. त्या शिवाय इतर पुरुष मला **पितृवत्** आहेत. हीच माझी प्रतिज्ञा. या नंतर जशी तुझी मर्जी असेल, तसें कर. पण आजन्म अशी सेवा करणार. ( हिचें भाषण चाललें आहे तों **जीव शिव** येतात. )

**जीव**—(देवालयाचें सौंदर्य पाहून) मित्रा ! **शिवराया** ! काय हें या देवालयाचें अप्रतिम काम ! काय हे किती उंच मनोरे ! काय हीं कोरलेलीं सुबक चित्रें ! व देवालयाचा हा सभा मंडप, चित्रविचित्र नाना वस्तूंनीं किती ह्मणून सुशोभित केला आहे !

**शिव**—बा **शिवराया** ! पुन; स्मरण देतों. सावध रहा. या व याहूनही अधिक सुंदर, अशा कितीही जरी वस्तु दिसल्या, तरी " त्या सर्व पृथ्व्यंशी असून, फक्त त्रिगुणांनीं पंच विषयद्वारें, त्यांस अप्रतिम शोभा आणली आहे. " हें विसरूं नको.

**जीव**—बरें मित्रा! हा येथें बसून काण काय करितो आहे?

**शिव**—मित्रा, प्रश्न थोडा चुकीचा झाला.

**जीव**—कां बरें!

**शिव**—तो बसलेला पुरुष नव्हे, स्त्री आहे; आणि ती आपल्या नित्य क्रमाप्रमाणें, या श्रीजगदंबादेवीपुढें गायन करित आहे.

**जीव**—कोण! स्त्री? आणि आपण कोण!

**शिव**—अरे आपण, तसेंच हे पहा ( देवळांतले ) पुरुष; व ही, व तिच्याच प्रमाणें या बायका!

**जीव**—हं, ह्मणजे प्राण्यांत या दोन जाती असतात वाटतें?

**शिव**—बरोबरच. स्त्रीपुरुषांशिवाय उत्पत्ति कशी होईल?

**जीव**—समजलों.

**शिव**—सांग तर आतां. तुझा पहिला प्रश्न कसा पाहिजे होता?

**जीव**—"ही" येथें कोण बसलेली आहे? असा पाहिजे होता नव्हे का?

**शिव**—होय. पण मित्रा, स्त्रियांसंबंधी अधिक पृच्छा करूं नये. ती आतां काय गाते तें ऐक. (जीव तिजकडे मोहित होऊन पाहतो.)

**तारा**—( पुनः एक चीज गाते व नमस्कार करुन जातां जातां पुनः ) या रत्नपुरच्या राजाशिवाय, दुसरा यजमान करणार नाहीं. आई! हें ध्यानांत असूंदे. ( नमस्कार करीत-करीत जाते. )

**शिव**—( तिजकडे पाहात राहून वेडया झालेल्या जिवास हालवून ) अरे ए, **जीवराया**! अरे ए!

**जीव**—( तोंड उघडें टाकून, ती लांब गेली तरीं तिजकडे पहातच रहातो. )

**शिव**—( हालवूनही तो आपल्याकडे लक्ष देईनासें पाहून ) अरे, हा तर इतक्यांतच बेफाम झाला.

**जीव**—अहाहा! मित्रा, तिचें सौंदर्य किती मोहक आहेरे! मला तर रात्रंदिवस, तें पाहतच बसावेंसें वाटतें!

**शिव**—मित्रा! घसरत चाललास! सांभाळ! तुला मीं आतांच

सांगितलेंना ? कीं स्त्रियांविषयीं अधिक चर्चा कामाची नाहीं ह्मणून !

**जीव**—मित्रा, तें कांहीं असो. मला तर तिला पाहिल्या-शिवाय प्रत्येक क्षण युगाप्रमाणें भासत आहे ! शिवाय तिनें जें आतां गायन केलें, तें तर मला सारखें डुलवीतच होतें !

**शिव**—मित्रा, तूं तर अगदींच बहकत चाललास ! अरे, तुला या नगरांत प्रवेश करण्यापूर्वी पुनः पुनः केलेला इतका उपदेश, तूं फुकटच घालविणार वाटतें ? अरे, तूं जो तिच्या सौंदर्याला, व गायनाला इतका भुललास, याचा कांहीं विचार केलास का ? अरे, हा देह ह्मणजे, शुद्ध अस्थि, मांस, रक्त, थुंका, मळ, मूत्र, यांचा चर्मानें गुंडाळलेला एक गोळा असून, गायन ह्मणजे, शुद्ध एक आकाश तत्वाचा शब्द विषय आहे. दुसरें त्यांत काय आहे ?

**जीव**--तें सर्व मला माहित आहे पण मला तें तिचें रूप, व तिचें तें गायन, अहर्निश पहावें, व ऐकतच बसावेंसें वाटत आहे.

**शिव**—असें का ? ह्मणजे तूं शब्दस्पर्शादि पंचविषयांच्या स्वाधीन होणार. असेंचना ?

**जीव**--ते सर्व विषय एक वेळ तरी चाखून पहावे, असें माझ्या मनानें फार घेतलें आहे खरें. मग माझें मन असें कां फिरलें, तें मला समजत नाहीं.

**शिव**--बा, **जीवराया** ! ही तुला मोठी दुर्बुद्धि उपजली ह्मणावयाची ! तुला तुझ्या इच्छेप्रमाणें मी हें सृष्टिसौंदर्य पहाण्याकारितां, आमच्या मूळ आदिस्थानापासून, मातुश्रीच्या आज्ञेवरून आणिलें. सर्व कांहीं पाहून झाल्यावर, आपल्यास जागच्याजागीं लवकर जातां यावें, ह्मणून निघण्यापूर्वी, तुला सर्व मायाजाळ दाखवून, व स्वरूपाची साधारणतः बरीच ओळख करून देऊन, नंतर मीं तुला आंत आणिलें. असें असता इतक्यांतच असा कसा भ्रमलास ? आतां मातापितरांस मी जाऊन काय सांगूं? "बाळांनों, लवकर या" ह्मणून जी तिनें आज्ञा केली आहे, तिचें कसें करावें !

**जीव**—मित्रा, तें कांहीं असो. मी माझा जो निश्चय केला,

तों केला. तिचें सान्निध्य संपादल्याशिवाय मी तुजबरोबर येत नाहीं. तूं जा आपला **परब्रह्मास** धरून बस.

**शिव**—( तोंडांत बोट घालून स्वगत ) आतां ह्यास काय करावें, हा तर हातचा सुटूं पहातो ! आणि जर याला सोडून गेलों, तर माझी आई रागावल्याशिवाय राहणार नाहीं. आणि हा काय आतां माझा **वेदांत** ऐकेलसा वाटत नाहीं. करितां, आतां ह्याच्याच तंत्रानें वागून, यास युक्तीनें रस्त्यावर आणिलें पाहिजे. ( कांहीं विचार करून ) बस्स, असेंच करावयाचें. ( त्याच्या खांद्यावर हात घालून ) बा, जीवराया ! असें वेड्यासारखें काय करितोस ? आह्मांस आमच्या महामायेची काय बरें आज्ञा आहे ?

**जीव**—तीं कांहीं असो. मी आतांच्या स्त्रीची प्राप्ति झाल्याशिवाय, तुजबरोबर घरीं यावयाचा नाहीं. समजलास आतां ?

**शिव**—बरें, प्राप्ति झाल्यावर, मग तरी येशील ?

**जीव**—( आशाभूतपणें ) का ! आहे का कांहीं युक्ति ? हें पहा मित्रा, मी तुझ्या पायां पडतों. मला तिची प्राप्ति झाल्यावर खास तुझ्या बरोबर येतों.

**शिव**—अरे पण, ती तुला प्राप्त होण्याची कांहीं आशा आहे कां ?

**जीव**—कां ? कां ? आशा आहे ह्मणजे ?

**शिव**—अरे,ती आतां जातांना काय बोलून गेली तें ऐकलेंसना?

**जीव**—नाहीं. माझें सर्व ध्यान तिच्या सौंदर्याकडेसच लागलेलें होतें.

**शिव**—समजलें. असें पुष्कळदां होतें खरें. असो, ती या देवी जगदंबेकडे प्रतिज्ञा करून गेली आहे कीं, “ जर यजमान केला, तर रत्नपुरचा नृपति करीन, नाहींतर जन्मभर अशीच राहीन. ” इतर पुरुष मला पितृवत् आहेत.अशी कडकडीत प्रतिज्ञा करून गेली आहे.

**जीव**—असें कां ? बरें, ती आहे कोणाची कोण ?

**शिव**—तीं स्त्रीपुरुषें आतांच आपसांत कुजबुजत. त्या त्यांच्या भाषणावरून समजतें, कीं ती येथील रत्नपुरच्या वाड्यासमोरच राहाणारी एक **विश्वयोषिता** आहे.

**जीव**—कोण ? विश्वयोषिता ? विश्वयोषिता ह्मणजे ?

**शिव**—ह्मणजे,ती अमक्याची ह्मणूनच कोणी विवाहित स्त्री नव्हे.

**जीव**—तर तिचा यजमान कोण ?

**शिव**—जो तिच्या इच्छेप्रमाणें द्रव्यादि देईल तो.

**जीव**—इतकेंचना ? मग काय ? या सर्व सृष्टींतील द्रव्य माझेंच आहे !

**शिव**—अरे तें खरें. पण ती या रत्नपुरच्या राजाशिवाय यजमान करणार नाहीं ह्मणत्ये.

**जीव**—झालें, संपलें. ( निराशेनें ) मित्रा, माझें आयुष्य संपलें. ( मूर्च्छित पडतो. )

**शिव**—( त्याला वारा घालून ) मित्रा, काय हें ? सावध हो ! सावध हो ! मी तुझी सर्व इच्छा पूर्ण करितों. पहा, मजकडे डोळे उघडून पहा तरी ! ( सावध होत नाहींसें पाहून ) अरे, हा तर अगदींच चैतन्यभ्रष्ट झाला अँ ! शाबास ! हे अष्टधा प्रकृति ! धन्य आहे तुझी ! असो. वाऱ्यास पाठ दिली पाहिजे.ज्या अर्थी आह्मीं उभयतां आज तुझ्या साम्राज्याच्या केंद्रस्थानीं येऊन पडलों आहों,त्या अर्थीं आतां तुझा अधिकार बलवत्तर आहे ! याकरितां, आतां यास माझ्या सत्स्वरूप मंत्रानें सावध करितों. मित्रा ! ऊठ ऊठ ! सर्व कांहीं तुझ्या मनासारखें करितों.

**जीव**—( किंचित् सावध होऊन ) काय ? तूं माझ्या मनासारखें खरोखरच का करणार ? का उगीच मला फुसलावतो आहेस ? मित्रा, मी तुला खचित् सांगतों, मला ती प्राप्त करुन दिल्याशिवाय, मी तुझ्या हातीं लागावयाचा नाहीं !

**शिव**—खरेंच. आणि मी तुला ती प्राप्त करून देण्याची जी योजना ठरविली आहे, तीही त्याचकरितां.

**जीव**—तर सांग मित्रा ! ती योजना मला सांग.

**शिव**—पण मित्रा ! मला या कामीं अभिवचन दिलें पाहिजे.

**जीव**—तें कोणतें ? पाहिजे तें वचन मजकडून घे.

**शिव**—पण, तुला ती प्राप्त करून दिल्यावर मग तरी तूं मज-बरोबर स्वस्थानीं येशीलना ?

**जीव**—हात्तेच्या ! एवढेंचना ? हें घे वचन ! मला ती प्राप्त करून दिल्यावर मी तुजबरोबर खचीत येईन. हें पहा ! मी या देव-ळांत जगदंबेसमोर वचन देऊन सांगतों.

**शिव**—तुला तिची प्राप्ति करून दिल्यावर किती दिवस तूं तिच्य सहवासांत राहूं इच्छितोस ?

**जीव**—फक्त पांच दिवस !

**शिव**—अरे, तिच्या **दर्शनानें** तूं जर इतका वेडा झालास, तर तिच्या **स्पर्शानें** तूं किती वेडा होशील ? तिची संगति घडल्यावर मग तुला, तिला सोडून येईनसें वाटणार नाहीं. ह्मणून, मला तुझा भरंवसा वाटत नाहीं.

**जीव**—आतां, तुला माझ्या खात्रीच्या भाषणाचा भरंवसा वा-टत नाहीं, त्याला मी काय बरें करूं ? मी तर या देवीसमोर सांगतों कीं, मी पांच दिवसांत परत तुला येऊन भेटेन.

**शिव**—हें खरेंना ? पहा, नीट विचार कर.

**जीव**—केला ! पूर्ण विचार केला आहे.

**शिव**—ठीक. आहे. मी तुला तिची गांठ घालून देतों.

**जीव**—पण वचन ?

**शिव**—हें घे वचन. पण सांभाळ बरें का ! आपलें वचन विसर-शील ! तर सर्व घात होईल.

**जीव**—नाहीं विसरणार.

**शिव**—होयना ! चल तर हो पुढें. धर राजधानीचा रस्ता. हा मी आलों. ( जीव पुढें जातो. )

**शिव**—( स्वगत ) हा त्या मोहपाशांतून पांच दिवसांत बाहेर पडेलसें, मला मुळींच वाटत नाहीं. ह्मणून मी या माझ्या मित्रा-करितां वरिष्ठाकडून एक मासाची मुदत घेऊन ठेविली आहे. ति-तक्या अवधींत याला सहज शुद्धीवर आणितां येईल. आतां असें

करावें. ( विचार करून ) हो, असेंच. हा रत्नपुरचा राजा, येत्या गुरुवारीं रात्रीं सर्पदंश होऊन एकाएकीं मरणार आहे, तो मेल्यावर त्याचें प्रेत स्मशानांत नेतील. तेथें यानें योगविद्येनें त्या प्रेतांत प्रवेश करावयाचा. असें केल्याशिवाय तिची व याची गांठ पडणें शक्य नाहीं. या एका कारणापासून मी दोन हेतु साध्य करणार. एक, या जीवरायास **तारांगने**ची भेट व्हावी, व दुसरा बाह्यदृष्ट्या जरी हा प्रपंच सुखकर वाटतो, तरी सार्वभौम सारख्या राज्यांतही जर तें सौख्य नाहीं, तर तें साधारण दारिद्र्यावस्थेंतील कुंटुंबांत नाहींच नाहीं हें सिद्ध करून, **हा सर्व प्रपंच केवळ दुःखमय आहे,** हें त्यास दाखवावयाचें. याला पूर्ण पश्चात्ताप झाल्याशिवाय, हा वैराग्यसंपन्न होणार नाहीं, व वैराग्याशिवाय शुद्धीवर येणें शक्य नाहीं. याकरितां, यास हीच युक्ति ! लागावें आतां आपल्या कामाला ! ( जातो. )

( पडदा पडतो. )

**अंक दुसरा समाप्त.**



# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—राजवाडा--हाहाःकार. राजप्रेत चौघांच्या खांद्यावरून जात आहे. पडद्यामागें देवीचें देऊळ, व देवळाच्या मागें चिता रचण्याची तयारी. ) ( मध्यरात्र ).

**राणी**—( गरोदर )-फुटलें माझें कपाळ ! आतां देवा, मी कायरे करूं ! आतां हा एवढा जन्म मी कसारे घालवूं ! देवा ! कांहींच नाहींका तुला माझी करुणा आली ! अरेरे! प्राणनाथ! गेलेत कांहो मला सोडून ! आपल्या जिवावर माझ्या सर्व उड्या होत्या हो! मला येथें आतां कशालाहो ठेविली ! ( रडते व कपाळावर हात मारून घेते. )

**दासी**—बाईसाहेब ! काय हें देवाच्या मनांत जसें होतें तसें झालें ! आपण विचार करा. आपण तर सर्वांस ज्ञानाच्या गोष्टी सांगतां, आणि आपणच जर अशा प्रसंगीं धैर्य सोडलें तर कसें होईल ? ( डोळे पुसते. ) उगी बाईसाहेब उगी रहा.

**प्रधान**—आतां झालेल्या गोष्टीस काय बरें इलाज ! राज्यकारभाराचें सोडा ! तो कसाही चालवितां येईल ! पण मी आतां **त्वत्संगतीस** अंतरलों,याचें मला फार वाईट वाटतें. असो. ईश्वरेच्छेपुढें इलाज नाहीं. बरें दासींनो, राणीसाहेबांना नीट सांभाळा, त्यांची समजूत करा, बरं का !

**दासी**—ठीक आहे सरकार ! कायरे देवा हा प्रसंग !

**प्रधान**--तसेंच, कोण आहे रे पहाऱ्यावर ?

**पहारेकरी**—मी आहें सरकार.

**प्रधान**--सांभाळा. चारी दरवाजांवर बरोबर देखरेख ठेवा. आह्मी पुढील कार्यभाग उरकून येतों.

**पहारेकरी**—आज्ञा सरकार. ( सर्व जातात. )

**दासी**--बाईसाहेब ! चला, आंत चला.

**राणी**—आतां मी कायगं करूं ! ( पुनः आक्रोश करिते. )

**दासी**—नकाहो बाईसाहेब, असा आक्रोश करूं ! अशानें पोटांतल्या **त्या प्राण्याचे** हाल होतात हो बाईसाहेब ! चला, चला, या आंत या. ( जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—देवीचें देऊळ. रात्रौ १ वाजतां.

**तारांगना**--हे आई जगदंबे ! हा कालपावेतों तुझ्या सेवासामर्थ्यानें, माझा हेतु, आज नाहीं उद्यां, पूर्ण करून घेईन; अशी मला आशा तरी होती ! ती ही आज समूळ नष्ट झाली ! आतां मला तुझी सेवा करून तरी काय करावयाचें आहे ? ज्याकरितां तुझी सेवा करावयाची, तीच वस्तु जर जगांतून नष्ट झाली, तर मला हें जीवित्व तरी काय करावयाचें आहे ! आतां तुला हात जोडून शेवटची इतकीच प्रार्थना करितें कीं, पुढील जन्मीं तरी मला त्यांची **पट्टराणी** कर. येत्यें आतां.( असें ह्मणून पोटांत सुरी मारून घेणार तोंच.)

**देवी**—तारे ! तारे ! तारे ! अविचार ! अविचार !

**तारांगना**--काय, अविचार ? कोठून बरें हे शब्द आले !

**देवी**--तूं जिच्यापुढें आहेस, तेथून च.

**तारांगना**--तर मग आई, ही तुझीच आज्ञा ह्मणावयाची ! होऊंद्या, कायती ! मला ती शिरसामान्य आहे.

**देवी**—ऐक. तूं ज्या अर्थीं माझी कांहीं सकाम का होईना, पण भक्ति केली आहेस, त्याअर्थीं, तुझी इच्छा पूर्णत्वानें नाहीं, तथापि अंशतः तरी पूर्ण होईल. जा, आणि ती याच जन्मीं !

**तारांगना**—काय, **याच जन्मीं** ? आई, ही गोष्ट अगदींच अशक्य. कारण, ते तर सर्पदंशानें मृत्युमुखीं पडून, त्यांचें प्रेतही इतक्यांत स्मशानांत गेलें असेल. त्यांच्या मृत्यूची दुर्वार्ता, कानीं पडतांच, मी, ही रातोरात, एकटी, मातुश्रीच्या चरणांचें शेवटचें दर्शन घेण्याकरितां इकडे आल्यें. तेव्हां, आई ! हा तुझा आशिर्वाद कसा फलद्रूप होणार ?

**देवी**—ती काळजी तुला कशास ?

**तारां०**—क्षमा असावी आई. येत्यें ! ( जाते. )

**देवी**—ठीक आहे. ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—स्मशान. ( राजप्रेत आणून चितास्थानीं उतरतात, व कोणी चिता रचतात. )

**एक**—अरे, अगोदर हीं लांकडें रचा.

**दुसरा**—चंदनाचीं खोडें हीं इकडे आहेत, बरें का ?

**तिसरा**—भटजी ! तुमची कायती तयारी आहेना ?

( तोंच दुसऱ्या बाजूनें **जीव शिव** येतात. )

**जीव**—मित्रा ! स्मशानभूमि अद्याप किती लांब आहे ? कितीवेळ एकसारखें चालतों आहों, पण अद्याप गांठेना !

**शिव**—ही आलीचना स्मशानभूमि ! ते पहा लोक दहनविधीची तयारी करताहेत !

**जीव**—पण त्या राजाचें प्रेत कुठें दिसत नाहीं तें ?

**शिव**—तें पहा. पलीकडच्या बाजूस त्या साटीवर आडवें घातलें आहे. पाहिलें कां ?

**जीव**—हो पाहिलें

**शिव**—इकडे ये. आतां तुला कांहीं कानांत सांगावयाचें आहे.

**जीव**—( कानपुढें करून ) काय बरें ?

**शिव**—( कांहीं कानांत सांगतो ) या युक्तीनें त्यांत प्रवेश कर. तूं **पांच** दिवसांनीं परत येईन, म्हणून मजकडे कबूल केलें आहेस. पण

कृपाळूपणानें,मी तुला **पंचविस** दिवसांची मुदत देतों,यांत तूं सावध हो. तुला वेश्यासमागम व राज्यवैभव वगैरे जरी बाह्यतः सुखकर वाटत आहे, तरी खरोखर तें **सुखकर** नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें फारच **दुःखकर** आहे प्रपंचांत प्रत्येकाच्या मागें कांहींना कांहीं यातना ही असावयाचीच. कोणी दारिद्र्यानें, तर कोणी शारीरिक व्यथेनें, तसेंच कोणी मुलीस सासरीं जाच होतो ह्मणून, तर कोणी निकटसंबंधी स्त्री, व्यभिचारिणी म्हणून, अशा अनंत प्रकारच्या यातना प्रत्येकाचें अंतःकरण आंतून सारखें कोरकोरून टाकित आहेत ! परंतु अज्ञानी जीव, केवळ बाह्य थाटमाट व शृंगारिक अभिनय, यांस भुलून जातात ! आंतील **घाण** एकाच्याहि लक्षांत नसते ! याचा तुलाहि लवकरच अनुभव येईल. या करितां, तुला जेव्हां या दिलेल्या मुदतीच्या आंत पश्चात्ताप होईल, त्या दिवशीं तूं माझें स्मरण कर. ह्मणजे मी तुला, तूं असशील तेथें भेटेन.

**जीव**—ठीक आहे. मित्रा, मजवर तुझे अनंत उपकार आहेत. येतों आतां मी. बरें, पण तूं आतां कोठें जाणार ?

**शिव**—तूं माझें स्मरण करीपर्यंत, मी त्या देवीच्या देवळांतच गुप्तरूपानें स्वरूपस्थ असेन. बरें, जा तूं आतां. मी ही जातों. (जातो).

**एक**—हं ! झाली सर्व तयारी ! भटजी ! होऊं दे आतां तुमचें कायतें !

**भट**—आतां प्रेत चितेवर ठेवावयाचें.

**सर्व**—ठीक आहे. उचलारे त्या बाजूनें !

( तोंच तें जरा जरा हालतें. अँ असा शब्द होतो. )

**सर्व**—( दचकतात. व एकमेकांकडे पाहतात ).

**एक**—अरे ! हेंरे काय ?

**भट**—आतां पाहतां काय ? ( पंचपात्री घेऊन पळत सुटतो,)

( तोंच तें प्रेत उठून बसतें ! )

**दु०**—खचित. यांत पिशाच्च संचार झाला !

**ति०**—काय ? पिशाच्च संचार ! अहो भटजी ! थांबा ! मीही आलों थांबा !

**भट**—नको नको. आह्मांस ती दक्षणा नको ! ( पळत सुटतो. )

**बाकी**—भटजी ! थांबा ! आह्मीं आलों ! थांबा !

( सर्व पळतात त्याच्यामागून प्रेतही धांवतें. )

**सर्व**—( मागून येतेंसें पाहून ) अरे, बापरे ! हें तर आमचा पाठलागच करीत आलें ! भरलीं आमचीं शंभर वर्षें ! खचीत हें पिशाच्च ! आह्मांस आतां खाऊन टाकणार ! अरे ! पळा !

**राजप्रे०**—अरे ! थांबा ! थांबा ! मी पिशाच्च नव्हे ! पिशाच्च नव्हे ! अरे, मी तुमच्याच सारखा माणूस ! थांबा ! थांबा ! सांगतों तें ऐकून तर घ्या !

**भट**—नकोरे बाबा ! पुरे झाली दक्षिणा ! चलारे पळा, तुह्मी त्याचें कांहीं ऐकूं नका ! पळा लवकर !

**सेना०**—प्रधानजी ! इतर माणसांप्रमाणें आपणही पळून जाणें बरें नव्हे.

**प्रधान**—तें खरें. पण मला बावानों भय वाटतें.

**सेना०**—तुह्मांस भय वाटतें, तर मी मागें फिरतों. न जाणो, कदाचित् पुनः खरोखरच जीव आल्यास, या आमच्या अत्याचाराबद्दल प्राणांत संकट येईल.

**प्रधा०**—बरोबर आहे. मग, चला तर व्हा पुढें, मी तुमच्या मागून येतों.

**सेना०**—ठीक आहे. ( सेनापति मागें फिरून हळू हळू राजापर्यंत येतो. )

**राजा**—अहो ! थांबा ! मी खरोखरच पिशाच्च नाहीं !

**सेना०**—( लवून मुजरा करितो ).

**प्रधान**—( लवून नमस्कार करितो ).

**राजा**—( त्यांचे मुजरे घेऊन ) अहो, तुम्ही पळतां कां ?

**प्रधा०**—महाराज ! आपल्याला रात्रीं सर्पदंश झाला होता.

**राजा**—( आतां यांच्याच भाषेनें बोललें पाहिजे, नाहीं तर परत पळावयाचे ! ) तें मला माहित आहे. तो होतांच, मी मला एका सिद्ध पुरुषानें दिलेली औषधी खाऊन तसाच माझ्या मंदिरांत निजलों होतों.

**प्रधा०**—पण महाराज ! आपली हालचाल व नाडीही साफ बंद पडली होती.

**राजा**—बरें, पण आपण कोण ?

**प्रधा०**—महाराज ! मी आपलाच दास प्रधान आहें.

**सेना०**—(प्रधानास "असें काय"? अशा अर्थाची खुणा करतो).

**प्रधा०**—( "काय बुवा समजत नाहीं." अशा अर्थाची खुणा करितो. )

**राजा**—आणि हे कोण ? सेनापति वाटतें.

**सेना०**—( हात जोडून ) होय सरकार.

**राजा**—( स्वगत ) अरे, पण मी हे काय भलतेच प्रश्न केले ! आतां ते सुधारून घेतले पाहिजेत. ( उघड ) काय विषाचा अम्मल ! मला अझूनही माणसाची पुरी ओळख मिळेना ! असो, बरें पण नाडी बंद पडली म्हणून ?

**प्रधा०**—सरकार ! श्वासोच्छ्वासही बंद पडला होता. मग काय बरें समजावें ?

**राजा**— अहो ! त्या औषधीचा गुणच असा आहे कीं, बरोबर चार प्रहरांनीं विष उतरावयाचें.

**प्रधान**—पण सरकार! हें आह्मास कसें समजावें? घरांत कोणासच जर ही गोष्ट माहीत नाहीं, तर आमचा काय बरें अपराध ?

**राजा**—तें बरोबर. पण, मी माझ्या मंदिरांत निजलों होतों, तो इकडे कसा आलों ?

**प्रधान**—( सेनापतीस ) आतां यांस काय सांगावें?

**सेना०**—आतां असेल तो खरा प्रकार स्पष्ट सांगावा हेंच बरें.

**प्रधान**—( हात जोडून ) क्षमा असावी सरकार! ( सर्व प्रकार कानांत सांगतो ).

**राजा**—असें असें! मग तुमच्याकडे दोष कसला?

**एक**—अहो भटजी! ते पहा प्रधान, सेनापती तर त्यांशीं कायसें खलबतच कितीवेळ करताहेतना?

**दुसरा**—चला तर मग! आपल्यास आतां जवळ जाण्यास काय भय?

**तिसरा**—चलाना तर! आपणही जाऊं!

**सर्व**—( साशंक जवळ जाऊन, राजास नमन करतात ).

**राजा**—( सर्वांचे मुजरे घेतो ) काय गेलीना आतां तरी सर्वांची भीति!

**सर्व**—महाराज! आमचें पूर्वपुण्यच उभें राहिलें, असें आह्मी समजतों.

**प्रधान**—( सेनापतीस ) सेनापती, तुह्मीं पुढें जाऊन नगरांत आनंदोत्सव करण्याबद्दल कारभाऱ्यांकडून तजवीज करवा, व लागलेंच कांहीं निवडक लोकांसह मंगलवाद्यें वाजवीत, महाराजांस सामोरे या.

**सेना०**—ठीक आहे. ( पुढें जातो ).

**बाकीचे**—चला तर, आपणही आस्ते आस्ते पुढें व्हावें सरकार.

**राजा**—चला.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थल**—राजवाडा. राणीचा महाल.

**सेनाप० स्त्री**—बाईसाहेब! बाईसाहेब! उठा. उठा. तुमच्या सौभाग्यसमुद्रास पूर्ण भरती आली. उठा, हें घ्या हळद-कुंकू! लावा.

**राणी**—( साश्चर्य ) काय, यमुनाबाई, तुह्मीं काय ह्मणतां. मला नीट सांगाहो. मी अगदीं वेडी झाल्यामुळें मला धड कांहींच समजत नाहीं हो!

**यमुना**—बाईसाहेब! अगोदर हें गळ्यांत मंगळसूत्र बांधा, व हें हळद कुंकूं घ्या.

**प्र० स्त्री**—अहो यमुनाबाई, अगोदर पुरतें सांगाहो कायतें!

**यमुना**—बाईसाहेब, महाराज सरकारनीं ह्मणे, तो सर्पदंश होण्याबरोबर, कसलेंसें औषध खाल्लें होतें. त्यामुळें तें विष उतरून, ते पुनः जीवंत होऊन येत आहेत !

**सरस्व०**—काय ह्मणतां, यमुनाबाई, असें कसें होईल? तुह्मांला ही गोष्ट कळली कोठून ?

**यमु०**—बाईसाहेब, मी खोटें का सांगेन ? स्मशानयात्रेंतून, प्रधानजींच्या आज्ञेवरून आमच्या इकडचें येणें होऊन, सर्व गांवभर आनंदोत्सवाचा हुकुम सुटलाच.

[ तोंच तोफांचे आवाज ऐकूं येतात ].

हे पहा, उत्सवाप्रीत्यर्थ बार होऊं लागले.

**राणी**—अहाहा! परमेश्वरा! कायरे हा मला पुनः तूं आनंदाचा दिवस दाखविला! मला वाटलें होतें, कीं तूं कोठें मजकडे पाठ केलीस! पण नाहीं, नारायणा! तुला आली माझी करुणा, अग बायांनों ! हळद कुंकुं आणा ! ( हळद कुंकुं लावते ). यमुनाबाई ! तुह्मीं आज मला ही अत्यानंदाची वार्ता प्रथम दिली, ह्मणून हा तुह्मांला हार घ्या! घाला गळयांत!

**यमुना**—( घेऊन ) ठीक आहे बाईसाहेब !

**सरस्व०**—हीं फुलें घ्या बाईसाहेब !

( इतक्यांत सर्व मंडळीसह **राजा** वाजत गाजत येतो ).

**राणी**—( त्यांस आरती ओंवाळते ) व नमस्कार करिते.

**प्रधान**—( खजीनदारास ) खजीनदार ! नगरांत घरोघर साखर वाटण्याची व्यवस्था करा. तसेंच सुमंत ! आपण जमलेल्या मंडळीस पानसुपारी, अत्तर गुलाब द्या !

**दोघे**—आज्ञा ! ( तसें करितात ).

**राणी**—( सर्व स्त्रियांस हळदकुंकू व साखर देत्ये ).
**प्रधा०**—महाराज! आतां मंगलस्नानास चलावयाचें.
**राजा**—ठीक आहे. चला.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थळ**—तारांगनेचा महाल.

**तारां०**—( माडीवरून खालीं उतरून ) अहाहा! आई जगदंबे! काय तुझी ही विलक्षण कृपा! लोक ह्मणतात, कलियुगांत **देव** कोठें आहे? छे:! हें ह्मणणें सर्वथा खोटें आहे! वरील ह्मणण्याच्या ऐवजीं "या युगांत **भाव** कोठें आहे" हें ह्मणणें, किती बरें यथार्थ झालें असतें! आई, मी तुझे उपकार कसे फेडूं? तूं प्रत्यक्ष मला आश्वासन दिल्याप्रमाणें, कधींच न घडणारा असा चमत्कार तर घडून आलाच! असंभवनीय गोष्ट जर घडून आली, तर संभवनीय गोष्टीचा मुळींच संशय नको! बरं, पण आजहा जिकडे तिकडे आनंदोत्सव कसला?
(तोंच दरवाज्यांत "घरांत कोण? दार उघडाहो" असा शब्द होतो).

**एक**—( साखरेचें ताट घेऊन ) महाराज सरकारांस सर्पदंशामुळें मूर्च्छा आली होती. तिजबद्दल सर्वांची भलतीच समजूत होऊन, मोठा प्रमाद घडला! शिवाय, महाअनर्थ होणार होता, पण सुदैवानें तो घात चुकला! म्हणून सरकारांतून ही साखर, गांवभर वांटली जात आहे. ( साखर देतो ).

**ता०**—( साखर घेऊन ) आई जगदंबे, त्यांना उदंड आयुष्य दे!

**दु०**—बरं. आतां जातों.

**ता०**—ठीक आहे. ( स्वगत ) आतां, आपण श्रीजगदंबेची सेवा, अधिक मनोभावें चालविली पाहिजे.

मेले कित्येक पुरुष, किती निर्लज्ज व विषयलंपट असतात! मी

अमुक एक प्रकारची प्रतिज्ञा केली आहे, म्हणून सांगितलें असतां, मला द्रव्याची लालूच दाखवून भुलवूं पहातात ! पण पाप्यांनो ! मी द्रव्याला भुलणारी **वारांगना** नव्हे बरें! " खाईन तर तुपाशीं, नाहींतर उपाशीं"! अशी मी आहें, समजलांत! चांडाळांनो, आपआपल्या स्वस्त्रियांना घरांत रडत बसवून, व रोज निशाचर-वृत्ति पत्करून, रात्रभर दुसऱ्याचीं दारें ठोंठावून त्यांचा निद्राभंग करण्यास, तुम्हांला लाज नाहीं का वाटत ?

मेल्यानों, हे तुमचे दुर्गुण तुम्हांला दिसत नाहींत. आणि मग, " आमची बायकोच वाईट हो " म्हणून मागाहून शंख करावयाचा ! पण मेल्यांनो ! त्यांस वाईट केलें कोणी ? तुम्हींचना निर्लज्ज, पाजी कुठले !

असो. पण आपण आतां स्वस्थ बसून उपयोगी नाहीं. श्रीजगदंबेच्या कृपेनें तो योग जमून येणार, हें निर्विवाद. पण तसें जरी असलें, तरी स्वतःचा प्रयत्न पाहिजेच. असो, पाहूं कसें काय होतें तें.(जाते).

---

## प्रवेश ६ वा.

**स्थळ**—दौलतराव सरदेसाई यांचें घर.

**दौल०**—प्रिये, तूं पहावें तेव्हां अशी खिन्न कां बरें दिसतेस ? अग, सर्वस्व गेलें, ह्मणून काय झालें ? परमेश्वरानें इतक्या संकटांतून आपणांस मुक्त करून, शिवाय वर आणखीं एक हें पुत्ररत्न दिलें, ही त्याची कृपा कांहींच नव्हेका ? मी तर माझ्या या रत्नाची किंमत-जहागीर सोडच–पण सार्वभौम राज्यापेक्षांही अधिक समजतों. आतां तूर्त जरा विपत्ति आहे, ही गोष्ट खरी; पण तिला डगमगतां नये; परमेश्वरावर भार टाकून, धैर्यानें ती निभावली पाहिजे !

**स्त्री**—महाराज ! मी तरी काय ह्मणत्यें ? त्या दयाघन प्रभूनें हें आह्मांस पुत्ररत्न दिलें, यामुळेंच मी समाधान मानून घेत आहें ! पण मला दुसरें कांहीं वाईट वाटत नसून, या माझ्या बाळाचे खाण्यापिण्याचे हाल होत आहेत, यामुळेंच मी झुरणीस लागल्यें आहें !

**बालक**—( विजय ) आई ! दिवसभल ललतेस काग ?

**स्त्री**—नाहींरे बाळा रडत. ( कुरवाळून मुका घेते ).

**विजय**—दोयेबिये पुतून थाप कलून, ललत नाहीं ह्मनतेस होय? थांगना मला ! तुला काय पाहिदे तें !

**स्त्री**—नको बाळा, मला कांहीं नको !

**विजय**—तल कोन तुला लागावलं होय ? बाबा ! तुमीका माद्या आइला लागें भललां ?

**दौल०**—नाहींरे, माझ्या लाडक्या! मी कशाला बरें उगीच तिला रागें भरेन ?

**विजय**—तल मग ही बगावी तेवां ललते कां? आई आनि बाबा, तुमाला मी सांगतों तुमी कथल्याच गोत्तीची कालदी कलूं नका. देवदयेनें थलव कांहीं नीट होईल ! तुह्माला काय कमी आहे, तें तुह्मी मला थांगा ! मी तें तुह्मांला पातालांतूनही आनून देईन !

**दौल०**—(कुरवाळून) माझ्या लाडक्या ! परमेश्वर तुला दीर्घायु करो ह्मणजे, सर्व कांहीं आह्मांस पोहोंचलें !

**स्त्री**—देवा! माझ्या बाळाला उदंड आयुष्य दे ! (त्यास चुंबिते.)

**विजय**—बलं, आई मी दातों, आतां तिलकमत्यानें खेलायला ! ( तिरकमटा घेऊन जातो. )

**दौल०**—प्रिये, परमेश्वरानें, आपल्याला अशा प्रकारचें अमोल्य सद्गुणी पुत्ररत्न दिलें असतां, तूं भितेस कां ? तूं त्यावर आहे तसाच विश्वास कायम ठेव! निरंतर त्याचें ध्यान धरून धैर्यानें रहा ! हे वाईट दिवस आतां लवकर नष्ट होतील ! भिऊं नको !

**स्त्री**—बरं आहे, प्राणनाथ ! पण हा मुलगा अस्सल क्षत्रियचना?

**दौल०**—प्रिये, त्यांत शंका नको. कांतिनगरचा राजा चित्रवर्मा, विषयांध झाल्यामुळें, त्यांच्या मांडलिकांस उन्मत्त होण्यास फावलें. अर्थात् ते प्रबळ होऊन, त्यांनीं चित्रवर्मा राजास ठार मारिलें! शिवाय राजपुत्रासही ठार मारण्याच्या उद्देशानें ते राणीवसांत येणार, ही बातमी समजतांच, त्यांच्या **जसवती** नामक इमानी दासीनें, मुलास

टापलींत घालून, चोरमार्गानें रातोरात निसटली ! उजाडण्यापूर्वी, चार योजनें जमीन पोटाखालीं घालून, हा राजपुत्र त्या रानांतील गुहेंत आणून ठेविला; व " ईश्वरा ! आतां या बाळाचें तूं रक्षण कर. " असें ह्मणून ती तेथून निघाली.

**स्त्री**—बरें, पण याची आई.

**दौल०**—जसवती राजवाड्यांतून बाहेर पडली नाहीं, तोंच तिला समजलें कीं, राजपुत्राच्या आईसही त्या दुष्ट शत्रूंनीं ठार करून, सर्व राज्य खालसा केलें. .

**स्त्री**—अरेरे ! पण ही हकीगत आपणास कशी कळली.

**दौल०**—हल्लींच, थोडया दिवसांपूर्वी, एक वैरागिणीच्या वेषाची स्त्री, मला देवीच्या देवळाजवळील धर्मशाळेंत दिसली. तिच्याशीं सहज बोलतां बोलतां, तिनें आपली सर्व हकीगत गुप्त ठेवण्याचें मजपासून वचन घेऊन, मला सांगितली. व खळकन् अश्रुधारा सोडून " माझ्या अन्नदात्यांच्या त्या गुहेंत टाकलेल्या चिमुकल्या रत्नाची काय गति झाली असेल कोण जाणें. " इतकें ह्मणून ती चूप झाली. त्यावर सर्व खुणा पटल्यावर, मी तिला इतकेंच सांगितलें कीं, " तो सुरक्षित आहे. "

**स्त्री**—एकूण, हा राजपुत्र आहे तर ?

**दौल०**—अग ! त्याचें तेजच नाहीं का सांगत ?

**स्त्री**—पण, आतां ती जसवती कोठें आहे ?

**दौल०**—ती ह्मणाली, "मुलगा सुखरूप असला ह्मणजे झालें." मग तो कोठेंही असो. मी तिला आमच्याकडे राहावयास बोलावित होतों. पण " तूर्त तसें करतां येत नाहीं " असा तिनें जबाब दिल्यावरून, मी तिला फारसा आग्रह केला नाहीं.

**स्त्री**—पण तिला राखून धरली पाहिजे, असें वाटतें.

**दौल०**—होय. ती तजवीज मीं केली आहे.

( इतक्यांत दौलतराव सरदेसाई ह्मणून गांवांत कोणी आहे काय ? अशी दौंडी होते. )

**स्त्री**--पहा ! पहा ! आपलें नांव तो शिपाई कशाला पुकारतो आहे? देवा, कांहीं नवीन संकट न येवो !

**दौल०**--तूं भिऊं नको. काय प्रकार आहे,त्याची चौकशी करून मी जरूर येतों. ( शिपायास ) काय आहे ?

**शि०**--दौलतराव सरदेसाई कोण ?

**दौल०**—मी.

**शि०**—( आज्ञापत्र देतो. )

**दौल०**--(वाचून) ठीक आहे, अकरा वाजतां राजकचेरींत हजर होतों.

**शि०**—ठीक आहे, मी चाललों तर. ( मुजरा करून जातो ).

**दौल०**—बरं आहे. ( आज्ञापत्र घेऊन येतो ).

**स्त्री**—प्राणनाथ ! काय आहे गडबड ?

**दौल०**—आपल्या चोरीस गेलेल्या संपत्तीबद्दल कांहीं तपास लागला असावासें वाटतें ?

**स्त्री**—मलही कालच्या रात्रीं अशा अर्थाचें कांहीं स्वप्न पडल्याचें आठवतें. देवा ! कर बाबा, कांहीं कृपा ! हकनाक बुडालों आहों !

**दौल०**--बरं ! प्रिये, स्नानाची तयारी कर. लवकर राजकचेरींत गेलें पाहिजे.

**स्त्री**—महाराज ! चला सर्व तयारी आहे.

( सर्व जातात, पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

**स्थळ**—राजकचेरी. ( सर्व मानमानकरी बसल्यावर राजा येतो. सर्व उठून ताजीम देतात. )

**राजा**—प्रधानजी ! आपल्या राज्याचें दरसालचें एकंदर उत्पन्न काय ?

**प्रधान**—सरकार! जवळ जवळ दोन कोट, ऐशीं लक्ष रुपये!

**राजा**—खर्च?

**प्रधान**—सुमारें अडीच कोट रुपये!

**राजा**—ठीक! बरं! प्रजेच्या उत्पन्नाचा कितवा हिस्सा सरकार-जमा होतो?

**प्रधा०**—तृतियांश.

**राजा**—हा त्यांस भारी होईल. करितां, पंचमांशाहून जास्त कर बिलकूल घेऊं नये. तसेंच, जमीन लागवड करण्याऱ्या शेतकऱ्यांस, सरकारी जमीन स्वल्प साऱ्यानें पाहिजे तितकी द्यावी.

**प्रधान**—आज्ञा सरकार?

**राजा**—बरें! प्रजेच्या शिक्षणाबद्दल काय व्यवस्था आहे?

**प्रधान**—राज्यांतील बहुतेक मुलांस माफक गुरूदक्षिणा घेऊन, सुशिक्षण देण्याची व्यवस्था ठेवलेली आहे सरकार!

**राजा**—ठीक. पण गरीब रयतेचीं मुलें व राज्यांतील सर्व कन्या, यांनीं विद्यामंदिरांत शिकलेंच पाहिजे. करितां, सर्व रयतेस तशी समजूत देऊन, त्यांस तें फुकट शिक्षण देण्यांत येईल, असेंही जाहिर करावें.

**प्रधान**—जशी महाराजांची आज्ञा.

(इतक्यांत, एक शिपाई, एका बंदिवान भिल्लास घेऊन प्रवेश करितो.)

**शिपाई**—सरकारचा विजय असो! (जमिनीपर्यंत लवून मुजरा करितो.)

**राजा**—काय आहेरे?

**शिपाई**—सरकार! हा भिल्ल, हा तांब्या, एका किरकोळी दुकानदारास विकीत होता, हें मी सरकारी कामगिरीवरून येतांना, रस्त्यांत पाहिलें. मला याची मुद्रा साशंक वाटल्यावरून, मी जाऊन तो तांब्या पाहिला, तों त्यावर नांव भलतेंच! त्यावरून मी यास जरा दरडावून खरा प्रकार विचारला. तों कांहीं धड कबूल होईना. तोंच एक म्हातारा

डोकीवर सर्पणाची मोळी घेऊन जात असतां वाटेंत आपल्याशीं सहज बोलला, " अरे, हा तर त्या दिवसाचा भिल्ल" हे शब्द माझ्या कानीं पडतांच, त्या म्हाताऱ्यास थांबवून, मी त्यास सर्व हकीगत विचारली. त्यावरून समजलें कीं, त्यानें सरदेसाई नांवाच्या मनुष्यास लुबाडलें.

**राजा**—मग, ते सरदेसाई व म्हातारा कोठें आहेत ?

**शिपाई**--महाराज, त्यांस सरकारी आज्ञा विदित करून कचेरींत हजर ठेविले आहेत.

**राजा**—शाबास ! बरें, त्या म्हाताऱ्यास प्रथम इकडे आण.

**शिपाई**—आज्ञा सरकार. ( त्यास आणून उभा करितो ).

**राजा**—( म्हाताऱ्यास ) काय म्हातारे बुवा, तुला या भिल्लाबद्दल काय माहिती आहे ?

**म्हाता०**—सरकार, आणखी चारच वर्षें पाहिजेत. म्हणजे बरोबर शंभर वर्षें होतील ?

**राजा**—याला बरोबर ऐकूं येत नसावें.

**प्रधान**—महाराज, ही गोष्ट शक्यच आहे. कारण याच्या सांगण्यावरून याचें वय ९६ वर्षांचें दिसतें.

**म्हातारा**—जरा मोठ्यानें बोललें पाहिजे महाराज ! ऐकावयाला व दिसायलाही जरा कमी येऊं लागलें !

**प्रधान**—( तोच प्रश्न मोठ्यानें करितो. )

**म्हाता०**—होय होय. मला या चोराची माहिती आहे सरकार !

**राजा**—सांग बघू काय ती.

**म्हा०**—थोड्याच दिवसांपूर्वीं, मी नित्यक्रमाप्रमाणें रानांत लांकडें तोडीत होतों. तों एका हरणाची केविलवाणी किंकाळी मला ऐकूं आली. वळून पाहतों तों, एक चिंतेनें व्यग्र झालेला व हातापायांस बऱ्याच जखमा झालेला, असा एक पुरुष, त्या पडलेल्या हरणाजवळ आला, व कळवळून म्हणाला, "कोणी बरें दुष्टानें या निरपराधी गरीब प्राण्यास ठार केलें ?" असें म्हणून त्यास कुरवाळतो आहे, तोंच हा भिल्ल हातीं तिरकमटा घेऊन आला, व त्यास एकदोन ठोंसे

लगावून, त्याशीं कांहीं भांडाभांड करून, तें हरणाचें प्रेत व त्याच्या पाठीवर काय होतें नव्हतें तें लुबाडून घेऊन पळत सुटला!

**राजा**—बरें, त्या प्रवाशाला तूं आतां ओळखशील?

**म्हा०**—तें बरोबर सांगतां येत नाहीं सरकार! त्याचें माझें बरेंच भाषण झालें होत, पण माझी दृष्टि बरीच व्यंग असल्यामुळें, मला बरोबर ओळख मिळेलचसें सांगवत नाहीं.

**राजा**—बरें, म्हातारे बावा, तो प्रवासी स्वभावानें तरी कसा होता?

**म्हाता०**—महाराज! तो मनुष्य स्वभावानें फारच उत्तम! लाख मनुष्य असला पाहिजे! कारण त्या प्रसंगीं त्यानें मला मदतीस बोलाविलें, त्यावेळीं मी त्यास "नाहीं" म्हणून सांगितलें. (स्वगत) जाऊनही ध्वजच लावला असता!

**राजा**—मग, त्यांत त्याचा चांगुलपणा कुठला?

**म्हाता०**—महाराज, सांगतों ऐका. त्या दुष्ट भिल्लानें त्याच्या जखमा दुखविल्या असतां, व त्याचें सर्वस्व हरण केलें असतां, व त्या प्रसंगीं मदतीसाठीं मजकडे त्यानें याचना करूनही ती मी त्यास साफ "**नाहीं**" म्हणून सांगितलें असतांही, त्यानें मात्र माझ्या विनंतीस ताबडतोब मान दिला, व मला हातभार लावून मार्गस्थ केलें. यावरून खचित तो मोठा सज्जन असला पाहिजे.

**राजा**—याशिवाय, त्याचा आणखी कोणता गुण तुझ्या दृष्टीस पडला?

**म्हाता०**—माझी ही दारिद्र्यावस्था पाहून, तो फार ममताळू-पणानें म्हणाला, "वडील बाबा, मी जर असा कफल्लक झालों नसतों, तर शक्त्यनुसार तुला कांहीं मदतही केली असती" अहाहा! काय त्याचा दयाळू स्वभाव होता म्हणून सांगूं! त्या हरणाचा केविल-वाणा दुःखरव कानीं पडतांच, तो आपलें मार्गक्रमण सोडून त्या प्रेताकडे जाऊन सारखा रडत बसला होता! अहाहा! शाबास त्याची! नाहीं तर हा मांग, कसाई हा!

**राजा**—या म्हाताऱ्यास यावेळीं बाहेरच्या खोलींत जरा दूर बसवा, व त्या प्रवाशास बोलवा.

**शिपाई**—( तसें करितो. )

**प्रवा०**—( येतांच नमून मुजरा करतो. )

**राजा**—अहो, तुमचें नांव काय !

**दौल०**—दौलतराव सरदेसाई; सरकार !

**राजा**—तुमची कांहीं वस्तु हरवली आहे काय ?

**दौल०**—होय महाराज ! कांहीं दिवसांपूर्वीं, रानांतून मी येत असतां मजवर एका भिल्लानें दरवडा घातला आणि तो भिल्ल, हाच.

**राजा**—मग तुम्हीं इतके दिवस सरकारांत कां नाहीं कळविलें ?

**दौल०**—महाराज ! "जें आपलें आहे, तें आपल्याकडेसच रहावयाचें. परंतु जें आपलें नव्हे, तें बंदोबस्ताच्या ठिकाणीं ठेवूनही रहावयाचें नाहीं." या परमेश्वरी नियमावर माझा भरंवसा आहे.

**राजा**—ठीक. बरें हा तांब्या कोणाचा ?

**दौल०**—हा माझा आहे, सरकार.

**राजा**—कशावरून ?

**दौल०**—यावर माझें नांव कोरलें आहे, महाराज !

**राजा**—बरें, तुमच्या बोजांत आणखी काय काय होतें ?

**दौल०**—( यादी देतो ) इतके जिन्नस होते, सरकार.

**राजा**—( प्रधानास ) पहा; याप्रमाणें त्या बोजांत आहेतसे !

**प्रधा०**—सरकार, दोन नग कमी आहेत.

**राजा**—बरें तुमचा कोणी साक्षीदार आहे ?

**दौल०**—महाराज ! रानांत साक्षी कुठला ? तरीपण एक म्हातारा मोळीवाला तेथें जवळच होता, व त्यास मी माझ्या साहाय्यास बोलावलें होतेंही. पण तो विचारा म्हातारा मला म्हणाला, "ही मोळी उचलण्यास तूंच मला मदत करशील तर बरें होईल."

**राजा**--पण तुम्ही इतक धट्टेकट्टे असतां, या चोरास हार कसे गेलेत ?

**दौल०**--महाराज ! त्यावेळीं मी दुखणाईत होतों. पायांला बऱ्याच जखमा झाल्या होत्या. हें पहा सरकार, त्यांचे वण ! ( दाखवितो ) त्या नसत्या, तर याच्यासारख्या दहा असामींस हात दाखविला असता !

**राजा**—बरें, तुम्ही त्या म्हाताऱ्यास आतां ओळखाल काय ?

**दौल०**—हो. ओळखीन सरकार.

**राजा**—तिकडच्या त्या म्हाताऱ्यास आणा पाहूं.

**शिपा०**--( दुसऱ्या भलत्याच म्हाताऱ्यास आणतात ).

**राजा**—पहा.

**दौल०**—महाराज ! हा नव्हे तो म्हातारा.

**राजा**—बरें, त्या दुसऱ्यास आणा पाहूं !

**शिपाई**—( दुसरा खरा म्हातारा येतो. )

**राजा**—हा पहा.

**दौल०**—हो, सरकार ! हाच तो.

**राजा**--बरें, या बोजांत कोणते नग कमी आहेत.

**दौल०**--( पहातो ) महाराज ! एक मोत्यांचा कंठा, व एक सोन्याचा तोडेजोड.

**राजा**—( चोरास ) हें खरें आहे !

**भिल्ल**— होय सरकार.

**राजा**—ते दोन्ही नग काय केलेस ?

**भिल्ल**—**हेमचंद** मारवाड्यास विकत दिले आहेत.

**राजा**—**हेमचंदास** घेऊन या, लवकर.

( शिपाई घेऊन येतो. )

**राजा**—तुम्ही यास ओळखतां ? खरें बोला.

**हेम०**—हो सरकार ओळखतों.

**राजा**—याच्या तुमच्या ओळखीचा काय संबंध !

**हेम०**—महाराज ! माफ मागतों. ( हात जोडून )

**राजा**—प्रश्नाचें उत्तर पाहिजे.

**हेम०**—महाराज, हा मी याच्यापासून दोन दागिना विकत घेतला होता.

**राजा**—कोणते ? खरें सांगा नाहीं तर पस्तावा होईल.

**हेम०**—नाहीं महाराज, खरा सांगते ! एक मोतीचे कंठा, अने एक सोनाचा तोडा जोडी.

**राजा**—त्या दोन्ही नगांची किंमत सुमारें काय होईल ?

**हेम०**—सुमार पांच हजार रुपिआ !

**राजा**—तुम्ही त्यास काय दिलें ?

**हेम०**—एकसो अने चालीस रुपया रोकडा दिला.

**राजा०**—( चोरास ) होय ?

**भिल्ल**—नाहीं सरकार. एक संबर, आणि दोन इसा !

**राजा**—समजलों. म्हणजे तितकेच. बरें, ते दोन्ही नग आतां कोठें आहेत ?

**हेम०**—घरीं आहेत सरकार.

**राजा**—घेऊन या, शिपायाबरोबर जाऊन ते आतांच आणिले पाहिजेत !

**प्रधान**—शिपाई !

**शिपाई**—जी सरकार !

**प्रधान**—जा. त्यांच्या बरोबर, लवकर घेऊन या.

**शिपा०**—आज्ञा ! ( जातात. )

**राजा**—हे तुमचे बाकी नग बरोबर आहेतसे पहा.

**दौल०**—बरोबर आहेत सरकार.

**राजा**—ठीक.

( मारवाडी येतो. )

**मार०**—( दागिने पुढें करून ) हे पहा महाराज !

**राजा**—( हातांत घेऊन ) हे दोन्ही नग पांच हजार किंमतीच

आहेत, ह्मणून तुह्मीच सांगतां. असें असतां यांची किंमत तुह्मी एकशें चाळीस रुपये कशी केली ?

**हेम०**—महाराज, कबूल झाले, ह्मणून आमी घेतले.

**राजा**—अहो ! पण, पांच हजारांचा माल, केवळ एकशें चाळीस रुपयांस तो देतो आहे, यावरून तो खास चोरीचा असला पाहिजे, असें तुह्मांस कसें वाटलें नाहीं ?

**हेम०**—ते तर हामी तवाच समजले !

**राजा**—तर तो घेतला कसा ?

**हेम०**—महाराज ! आमचे वेपारी लोकांच्या अशाच रीत असतो.

**राजा**—होय का ! ऐकतर. तूं सच्चा व्यपारी नाहींस, चोर आहेस ! या करितां, ते दोन्ही नग मालकाचे मालकास देऊन टाकलेच पाहिजेत. शिवाय, तूं चोरी केलीस, याकरितां दुसरे पांच हजार रुपये दंड ह्मणून यांस आणून दिलें पाहिजेत. न दिल्यास पांच वर्षें कारागृहवास पतकरला पाहिजे.

**हेम०**—सरकार ! हामी आपले रुपायाच आणून भरते.

**राजा**—जा, लवकर आणून हजर कर, ( शिपायासह जातो. ) प्रधान ?

**प्रधा०**—सरकार ! ( हात जोडून )

**राजा**—खालील हुकमाची सर्वांस समजूत द्या.

१ सर्व दागिने व मारवाड्याकडील ५ हजार रुपये, दौलतराव यांस द्यावयाचे.

२—दौलतरावांस तूर्त जामदारखान्यावर मुख्य.

३—शिपायास जमादारी.

४—भारेवाल्यास तहाहयात दरमहा दोन मोहरा वेतन त्याच्या घरीं पोंचवावयाचें.

५—चोरास पांच वर्षांची सक्त मजुरी.

**प्रधान**—आज्ञा सरकार !

**राजा**—मी आतां बागेंत फिरावयास जातों.

**प्रधान**—( नमून मुजरा. )

( राजा जातो व शिपायासह मारवाडी येतो ).

**प्रधान**—काय ! रक्कम हजर आहे ?

**हेम०**—जी सरकार ! ही आणली आहे सर्व रक्कम.

**प्रधान**—आणा इकडे, गादी समोर ठेवा.

**हेम०**(— तसें करितो ).

**प्रधान**—तुम्ही एवढे मोठे व्यापारी असतां, फारच हलकट चागणुक दाखविली याकरितां तुह्मांस जबर शिक्षा करणें रास्त होतें, पण महाराज सरकार दयाळु होऊन, तुम्हांस फक्त पांच हजार रुपये दंड घेऊन सोडिलें आहे. याबद्दल महाराजांचे उपकार मानून, या पुढें तुम्ही सावध रहा.

**हेम०**—हे पहा सरकार ! हामी आमची कानास खडा लावून घेते. ( तसें करितो. )

**प्रधान**—चला जा.

**हेम०**—( मुजर करून जातो. नंतर तोंडावर मारून घेऊन ) नकोरे बाप्पा हे चोरीचें काम घणुं खराब.

**प्रधान**—( दौलतरावास ) दौलतराव ! इकडे या, बसा.

**दौल०**—( बसतो ).

**प्रधान**—हे घ्या तुमचे सर्व दागिने. शिवाय, सरकारनीं त्या मारवाड्यास पांच हजार रुपये दंड करून, ती रक्कम तुम्हांस देण्याचा हुकूम केला आहे. त्याप्रमाणें ही पांच हजारांची रक्कम आपल्या ताब्यांत घ्या.

**दौल०**—काय ही महाराजांची कृपा !

**प्रधान**—दौलतराव ! महाराजांनीं तुमच्या सद्गुणास लुब्ध होऊन, तुम्हांवर याहून ही एक मोठी कृपा केली आहे !

**दौल०**—ती कोणती बरें ? ( नमून )

**प्रधान**—तुह्मांस तूर्त जामदारखान्यावरील मुख्य कामागिरीची

जागा देण्यांत आली आहे. करितां, त्या आपल्या कामावर उद्यां प्रात:काळपासून तुम्ही हजर व्हा.

**दौ०**–( स्वगत ) दौलतरावा ! तुझे दुर्दिन संपले, हें उघड आहे ! ह्मणून अधीर मात्र होऊं नको. ( उघड ) महाराज, मी सरकारचा फारच आभारी आहें. बरें मी येतों.

**प्रधा०**—ठीक आहे. उद्यां जरा लवकरच या, ह्मणजे तुमच्या कामाची तुह्मांस माहिती देववितों.

**दौल०**—ठीक आहे. ( मुजरा करून जातो. )

**प्रधा०**—शिपाई, तानाजी !

**शिपा०**—सरकार !

**प्रधा०**—तुह्मी सरकारी कामगिरी फारच इमानें इतबारें, व हुशारीनें केली, याबद्दल महाराजसरकार संतुष्ट होऊन, त्यांनीं तुह्मांस **जमादारीची** जागा दिली आहे!

**शिपा०**—माझ्या स्वल्पगुणाबद्दल, महाराजसरकारांनीं एवढें औदार्य दाखविलें, याबद्दल मी सरकारचा ऋणी आहें.

**प्रधा०**—अरे, भारेवाला, इकडे ये.

**ह्मातारा**—( मुजरा करितो. )

**प्रधा०**—तुमच्या या अत्यंत वार्धक्यांत सुद्धां, स्वस्थ बसून मीठभाकरीचीही तुमची सोय नाहीं, इतक्या करितां, महाराजसरकारचें कोवळें मन फार द्रवाल्यामुळें, व शिवाय तुह्मी आपला **दोष**, व दुसऱ्याचा **गुण** स्पष्ट कबूल केल्यामुळें, सरकार स्वारी फार संतुष्ट होऊन, दरमहा दोन मोहरा, तुमच्या जिवांतजीव असेपर्यंत, तुह्मांस मिळाव्या, असें महाराजांनीं ठरविलें आहे. त्या तुमच्या घरीं पोंचत्या करूं. यानंतर तुह्मीं रानावनांत जाऊं नये.

**ह्मा०**—( आनंदानें ) परमेश्वरा ! या दयाळू महाराज सरकारचें सर्व प्रकारें कल्याण कर ! बरें मी येतों महाराज !

**प्रधा०**—ठीक आहे. अरे, त्या भिल्लास इकडे आणा.

**शिपाई**—( आणतात. )

**प्रधा०**—तुझ्या वागणुकीवरून, तूं अत्यंत नीच, निर्दय व महा· पापी आहेस, असें सरकारच्या नजरेस आल्यावरून, तुला देहांत शिक्षाच द्यावयाची, पण कृपाळूपणें फक्त पांच वर्षें कारागृहवासाचीच शिक्षा तुला दिली आहे. (शिपायांस) न्यारे याला नेऊन कारागृहांत ठेवा. आजच्या दरबाराचें काम पुरें झालें आहे.

(सर्व उठतात.)

---

## प्रवेश ८ वा.

**स्थळ**—हिरावाग.

**राजा०**—(इकडे तिकडे फिरत असतां स्वगत) काय हें राज्यभार हांकण्याचें काम किती कटकटीचें आहे? सारा दिवस व रात्र, मनाला स्वस्थपणा ह्मणून कसा तो क्षणभरही नाहीं. (तों एक दासी येऊन दूर उभी राहते.) कोणग तूं?

**दासी**—सरकार! कागुद हाय कागुद!

**राजा**–काय पत्र आहे? आण कोठें आहे तें! कोणीं दिलें आहे?

**दासी**—त्यामंदी समंद हाय सरकार!

**राजा**—(पत्र वाचतो.)

"महाराजाधिराज यांचे चरणीं,

अनेक साष्टांग प्रणिपातः—

महाराजांची चरणधुळ एक वेळ तरी या दासीच्या आश्रमास लागावी अशी कित्येक दिवस इच्छा करीत चातकी होऊन आहें! कृपामेघ वृष्टि करणें, महाराजांपाशीं."

सर्वस्वीं आपली दासी

**वारांगना.**

अरे! मी जिच्याकरितां माझ्या मित्रा करवीं इतकी खटाटोप करविली, तिचीच साफ विस्मृति! मला असें वाटतें की, जर आज हें पत्र न येतें, तर या राज्यसूत्राच्या दगदगीमुळें, मी हिला अगदींच विसरतों; व सर्व मुदत अशी तशीच निघून गेली असती!

तरी माझ्या मित्रानें मजवर केवढी कृपा केली कीं, मला पांचा बद्दल पंचवीस दिवसांची मुदत दिली! ( दासीस ) हें घे उत्तर ( पांच घटका रात्रौ असें उत्तर देतो. ) करितां आजपासून तिकडे गेलेंच पाहिजे.

वास्तविक, मी जें सांप्रत छत्रचामरादि गजांतलक्ष्मीचें राज्य-सुख भोगीत आहें. यामुळें मला अत्यानंद होत आहे! मजसारखा सुखी, साऱ्या दुनयेंत कोणी नसेल! असो, आतां आपण भोजन आटपून प्रथम राणीमहालांत जावें, व तेथून मग तिकडे जावें. ( जातो. )

**स्थळ**—पाकशाळा—( राजाकरितां चांदीचा पाट व सुवर्ण पात्रें ठेवून राणी मुलास घेऊन जवळच दुसऱ्या एका पाटावर बसून, वाट पाहत बसली आहे. तों राजा येतो. )

**राणी**—यावं महाराज! केवढी रात्र येण्यास!

**राजा**—प्रिये, कामामुळें किंचित् वेळ झाला. चल, वाढायाला सांग.

**राणी**—( आचाऱ्यांस ) चला, वाढारे.

**आचा०**—( वाढतो. )

**राणी**—महाराज! या सुवर्णाच्या वाटयांत, अनुक्रमें श्रीखंड, मुरंबा, बासुंदी, तूप, दूध, दहीं हे पदार्थ ओळीनें ठेविले आहेत, कोणता पाहिजे असेल तो यथेच्छ सावकाशपणें सेवन करा. ( भटजींस ) पुऱ्या आणाहो! ( वारा घालते. )

**राजा**—नको नको बस्स. या आहेतना? प्रिये! मला तुझ्यासारखी सुशील स्त्री मिळाली. याबद्दल परमेश्वराचा मी अत्यंत आभारी आहें. माझ्या प्रकृतीस व जेवणाखाण्यास तूं इतकी डोळ्यांत तेल घालून जपतेस, याबद्दल तुझी करावी तितकी स्तुति थोडीच आहे! त्यांतून सांप्रत तूं भरलेल्या दिवसांची गरोदर असतांही माझ्या खाण्यापिण्याचा योग्य बंदोबस्त स्वतः ठेवितेस, यामुळें मला तुझें मोठें कौतुक वाटत आहे!

**स्त्री०**—महाराज ! यांत मज दासीचें कौतुक कसलें करावयाचें ? आह्मां बायकांचा '**पतिसेवा**' हाच धर्म आहे. तो आह्मी न पाळूं तर आह्मांस **नर्कप्राप्ती**शिवाय दुसरें काय मिळणार ?

**राजा**—शाबास ! प्रिये, ही तुझी पतिव्रताधर्माभिरुचि पाहून, मी फारच खुष आहें !

**राणी**—( आचाऱ्यास ) अरे, भाज्या, रायतीं आण.

**राजा**—नको. कांहीं नको. बस्स. ( उठतो. )

**राणी**—( स्वतः हातावर पाणी घालून हात पुसते व विडा देते. )

**राजा**—( विडा खात खात ) चल प्रिये, आपण आंतल्या दिवाणखान्यांत बसूं. ( दोघें जातात व दुसऱ्या वाटेनें बैठकीच्या ठिकाणीं येतात. )

**राणी**—सरकार ! दिवस होऊन गेले आहेत. आज कांहीं लक्षण निराळें दिसत आहे. करितां, सूतिकागृहाची नीट व्यवस्था ठेववावी.

**राजा**—कोण आहेरे तिकडे ?

**शिपा०**—सरकार, जी.

**राजा**—जा ! व प्रधानजीस आतांच बोलाविलें आहे ह्मणून सांगून जरूर घेऊन ये.

**शिपा०**—जी सरकार ! ( जातो. )

**राजा०**—प्रिये ! तूं कांहीं काळजी करूं नको. सर्व व्यवस्था ठेवलीच असणार. पण तूं आज जेवलीस नाहीं ती.

**राणी**—नको महाराज, मी संध्याकाळींच थोडें फराळाचें केल्यामुळें, आतां जेवणावर इच्छा नाहीं.

( तोंच प्रधान येतो )

**प्रधा०**—( येऊन नमन करितो. )

**राजा०**—प्रधानजी ! सूतिकागृहाची व्यवस्था बरोबर आहेना ?

**प्रधा०**—ती तर व्यवस्था, सरकार, आठ दिवसांपूर्वीपासूनच ठेवलेली आहे.

**राजा**—ठीक आहे. मी गुप्तवेषानें नगरांतून असा फेरफटका करून येतों. ( राजा जातो. )

**प्रधा०**—आज काय पोटांत दुखतें आहे वाटतें !

**राणी**—होय. आतां पासूनच शिणाशिणूं लागलें आहे.

**प्रधा०**—एकदां बरेपणी मोकळीक झाली, ह्मणजे झालें. मला तर हे पांचचार महिने, पांचचार **युगां**प्रमाणें गेले ! !

**राणी**—( मृदुस्मित ) बरें, बरें !

**प्रधा०**—बरें, मी आज घरीं जात नाहीं. पुढच्या गच्चीवरच आहें. सर्व तयारी ठेवली आहे, आपण भिऊं नये.

**राणी**—मला सोडून जाऊं नकाहो ! सरकारस्वारीही बाहेर गेली आहे.

**प्रधा०**—हरकत नाहीं. मी आहेना येथेंच. पुढील गच्चीवर जागत बसतों. ( जरा पुढें येऊन ) काय माझें हें भाग्य ! प्रपंचास पुरून उरण्यासारखें भरपूर वेतन मिळालें असून, शिवाय नजर नजराण्यांचा अवांतर फायदाही यथेच्छ मिळत आहे ! आज मजसारखा भाग्यवान् दुसरा नाहींच ह्मटल्यास चालेल ! ही सांपत्तिक बाजू तर सोडाच, पण ही साक्षात् **इंदिरे**सारखी लावण्यलतिका राजपत्नीही, बिचारीचा नवरा **तृतियप्रकृति** असल्यामुळें, मला यथेच्छ उपभोगावयास मिळत आहे ! काय माझें हें भाग्य ! असो. " आलिया भोगासी असावें सादर ! "

( जातो. )

---

## प्रवेश ९ वा.

**स्थळ**—तारांगनेचा महाल:—

**तारा**—आई ! तुझ्या इतक्या दिवसांच्या सेवेची फलश्रुति, मला आज फळास येणारना ? तुझ्या कृपेनें आज माझ्या आनंदास पारावारच नाहींसा झाला आहे ! पण स्वारीचा अद्याप पत्ता नाहीं. हें काय ? ( तोंच दारावर थाप ) कोण ?

**राजा०—तोच!**

**तारा**—म्हणजे ?

**राजा—पत्रांतला!**

**तारा**—( धांवत खालीं जाते ) यावें सरकार! ( त्याच्या हातास धरून मंदिरांत नेते, आरती ओंवाळून चरणीं मस्तक ठेवते, व हात जोडून दूर उभी राहते. )

**राजा**—( हंसत ) कां, काय हुकूम आहे ?

**तारा**—महाराज! हें काय बरें? मज गरीब दासीचा स्वीकार व्हावा हीच प्रार्थना आहे! या पायांच्या दर्शनाची एकसारखी मार्गप्रतीक्षा चालविली आहे!

**राजा—वारांगनाच** तूं! कशी नाहीं करणार ?

**तारा**—महाराज! मी **वारांगना** तर खरीच, पण गांवांतील इतर **वारांगना**, व मी यांच्यामध्यें अंतर आहे!

**राजा**—तें कसें काय ?

**तारा**—महाराज, मी **ऋतुमति** होऊन आज पांच वर्षें झालीं. त्यावर हजारों श्रीमान् पुत्रांनीं, नानायुक्तिप्रयुक्तींनीं मला गऱ्या घातल्या, पण माझा एकच निश्चय. "साऱ्या जन्मांत **एकच** यजमान करावयाचा, व तो दुसरा कोणी नसून फक्त **सरकार स्वारीच.**"

**राजा**—( स्वगत ) बरोबर, ही देवीच्या देवळांत हेच शब्द बोलल्याबद्दल माझा मित्र मला म्हणत होता खरा. ( उघड ) म्हणजे अशी प्रतिज्ञाच केली आहेस वाटतें ?

**तारा**—महाराज! प्रतिज्ञा म्हणून काय सांगूं? आई, जगदंबेलाच ठाऊक काय तें ?

**राजा**—तिला काय ठाऊक असावयाचें ?

**तारा**—महाराज! आपल्याला सर्पदंश झाला, ही बातमी मी ऐकिली. त्याचवेळीं, या प्रपंचाची आशा साफ सोडून मध्यरात्रीं, एकटी, गांवाबाहेरील श्रीअंबाबाईच्या देवळांत गेलें, व माझ्या सर्व आशेची निराशा झाली; इतक्या करितां, तिच्या समोर आत्महत्या

करण्यास तयार झाल्यें. अशा समयीं, साक्षात् जगदंबेनं मला त्या कर्मापासून परावृत्त करून, व मला महाराजांच्या प्राप्तीची आशा लावून, पुनः येथें घरीं पाठविलें! मी असें समजलें कीं, तिच्याच कृपेनें मजकरितां आपण जिवंत झालां, व मला हा अलभ्य व असंभवनीय लाभ घडला! (दासीस) अग, लवंगे, भटजींना ताट आणायाला सांग.

**लवंगी**—आज्ञा, बाईसाहेब.

**भटजी**—( वाढलेलें ताट आणून पुढें ठेवतो. )

**तारा**—( प्रत्येक पदार्थ खाण्यासाठीं आग्रह करिते व स्वतः वारा घालते. )

**राजा**—अगोदर हात पाय धुवावयाचे!

**तारा**—ठीक आहे, महाराज! मी स्वतः आपल्या हातांनीं पाय धुत्यें.( पाय धुऊन स्वतःच्या शालूनें ते पुसते व तीर्थ प्राशन करिते.) घ्या महाराज आतां!

**राजा**—ही तुझी सेवा पाहून, **तारे**, मी अगदींच चकित झालों आहें.

**तारा**—( राजा खात असतां, आरती ओंवाळते ) महाराज! यांत चकित होण्यासारखें कांहींच नाहीं. कारण, आपल्याठायीं या दासीची जी आदरबुद्धि आहे, तिला अनुरूप अशी सेवा करण्यास मी असमर्थ आहें!

**राजा**—तारे! ही तुझी सेवा, व भाषा "जर **वारांगनीथाटाची** नसेल, तर तुला **विश्वयोषिता** असें कोण म्हणेल? तूं महान् **साध्वि** असली पाहिजेस!"

**तारा**—महाराज! मी तर आपल्या चरणप्राप्त्यर्थ, **जगदंबेची** सेवा, एकाग्रतेनें करित आहें. व त्या सेवेचें फळ, मला तिच्याच कृपेनें अलौकिकरित्या मिळालें आहे!

**राजा**—खरोखरच, तूं पूर्वजन्मींची कोणी **अप्सरा** असली

पाहिजेस ! ( इतक्यांत एक राजवाड्यांतील दासी धांवत धांवत येऊन, "दार उघडा, हो दार उघडा" म्हणून ओरडते ).

**तारा**—कोण आहे ?

**दासी**—मी दासी, **चंपा.**

**तारा**—कोठुन आलीस ?

**दासी**—अग ! उघड आंदी बिगीन दरवाजा ! राजवाड्यात्न आल्यें, राजवाड्यात्न !

**तारा**—कशाला ?

**दासी**—अग 'उघड म्हणत्येंना बिगीन दरवाजा ! बाईसाहेबांस्नी थकड परानांताची एळ; आन ही हकड खुलासा मांगत बसलीया !

**राजा—तारे,** उघड उघड. राणीसाहेबांबद्दल कांहीं खबर सांगण्यास वाड्यांतून आली असावी !

**तारा**—म्हणजे ! ( दरवाजा उघडते, **चंपा** आंत येते. )

**राजा**—ऐक, **चंपा** आतां सर्व कांही सांगेल-( चंपेस ) कायग **चंपे** ?

**चंपा**—म्हाराज ! सरकारापाशीं लय निकडीच काम हाय बगा ! रानीसरकार अक्षी लय कष्टावत्याती ! मूल आडव आल्यापायीं, देहांतीचा वकुत आला हाई सरकार ! महाराज, लवकर चला ! लवकर आला तर दिष्ट भेट तरी व्हइल !

**राजा**—अग, पण कांहीं उपाय अद्याप केलाच नाहीं ?

**चंपा**—म्हाराज, एकसारखे उपायच चालल हाइती नी, काय सांगूं ? शस्तीर वइज बी आनलाय !

**राजा**—मग, तो काय ह्मणतो ?

**चंपा**—तो ह्मन्तो, मूल कापूनशेनी काडल पायजे !

**राजा**—राम, राम, राम ! धिःकार असो, या जन्मास ! बिचाऱ्या प्राण्या, घे जन्मधारणेचें सुख ! बरें, चंपे ! शास्त्रीबुवा वगैरे कोणीच आलेले नाहींत ?

**चंपा**—शास्तीरबावा बी आल्याती ! पन ते ह्मनत्यात, तिसरच्च काय बी !

**राजा**—ते काय ह्मणतात ?

**चंपा**—ते ह्मनत्यात, असी पतिवर्ता अस्त्री गवसाया होवी कीं, बगा, तिच **मन** बी पर पुरुक्शावर गेल नाय पायजे.

**राजा**—बरें मग ?

**चंपा**—मग काय ? तिच्या पायाच **तिरीत** दिला की, तावडतोब सुटका बगा !

**राजा**—खरं कीं काय ? मग अशा कांहीं स्त्रिया अद्याप कां नाहीं आणल्या ?

**चंपा**—ह्मराज ! आननार खटन ? अट किती लय दांडगो हाय, आपुन आयकली नाइ काय ?

**राजा**—असली ह्मणून ?

**चंपा**—ह्मराज ! हें काम लय कडक हाय बगा ! लय तर, कोन बी आपला धेय राखून शान धरील, पन, मन कस धरायासनी येईल ! जरा कुट " दुसरा पुरुस **बरा** हाय " ह्मनुनशेनी मनांत आल, की झाली भरुष्ट ! तवां, ह्मराज ! असी बायकू खट गवसाया बसलिया ! पन सरकार ! आतां उसीर नग.

**राजा**—पण **चंपे**, मी येथें आहे. ह्मणून तुला कसें समजलें ?

**चंपा**—ह्मराज ! या **तारा बापूची लवंगी** काल आपल्या बागेंत न्हवती का आली ?

**राजा**—मग ?

**चंपा**—म्हाराज, तवा मी पलीकडन हळूच पायल व्हत तवां तरुक केला कीं, ह्ये काय तरी हाय खर !

**राजा**—शाबास ! तूं मोठी तर्कज्ञानी आहेस ! तूं बाजू राखली नसती, तर मी अमुक ठिकाणीं आहें, ह्मणून कोणासच समजण्याचा मार्ग नव्हता. अर्थात्, घराकडची खबर, मला लवकर समजली नसती. तेव्हां, आज तूं फारच मोठें काम केलें ! असो, चंपे, तूं हो पुढें. हा मी आलों.

**दासी**—( जाते. )

**राजा**—प्रिये **तारे**! ( जवळ घेऊन ) परमेश्वरानें ही तुझ्या परीक्षेची वेळ, मुद्दाम आणिली आहे, असें मी समजतों! कारण, तुझ्यासारखी **वारांगना**ही, विमल पतिव्रताधर्मपरायण असूं शकते, हें सर्व जगास, यावच्चंद्र दिवाकरौ, दिसून येणार आहे. करितां आतां विलंब नको!

**तारा**—ठीक आहे. महाराज! (स्वगत) आई श्रीजगदंबे! आजपर्यंत माझे सर्व हेतु तूं पूर्ण केलेस! माझें सर्व हृद्गत तूं ओळखत आहेस! माझी सर्व लाज रक्षण करणारी तूं आहेस! जर मी खरी **एक पुरुषव्रता** असेन, तर मला यश दे. ( उघड ) चला महाराज!

**राजा**—चल. ( जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश १० वा.

**स्थळ**—सूतिकागृह.

**राणी**—( आंत मोठ्यानें ओरडते ) अहो! मला कोणी सोडवाहो! मेल्यें, मेल्यें, मेल्यें! धांवारे धांवा कोणी! देवा! धांवरे! अग आईगे! मी यानंतर देवा, नाहीं रे या फंदांत पडायाची! आग लागो या विषयसुखाला! आतां हें दुःख माझें मलाच काढावें लागतें आहे! हॉं!! हाय, हाय! देवा सोडवरे मला एकदां! मेल्यें! प्राणनाथ धांवा हो! ( मोठ्यानें रडते. )

( तोंच राजा तारेसह येतो. )

**राजा**—कां! वैद्यराज! कसें काय आपलें मत?

**शस्त्रवैद्य**—पोटांत मूल मेलें आहे, सरकार! तेंही काढतां आलें असतें, पण तें आडवें आल्यामुळें, चिरल्याशिवाय गत्यंतर नाहीं!

**राजा**—शिव! शिव! शिव! मूल चिरून! राम राम राम! आणि

तें कदाचित् जिवंत असलें तर? बालहत्या. देवा! देवा! नकोरे हा जन्म! नको! नको!

**शास्त्री०**—महाराज सरकार! यास एकच उपाय! अस्सल **पतिव्रतेचें** चरणतीर्थ पाहिजे! कीं आतां कार्य होईल!

**श०वै०**—(पोट धरून हंसतो.) काय वेडी समजूत आहे लोकांची! नुसत्या तीर्थानें जर अशा प्रसूतीसारख्या नाजूक गोष्टी साध्य होतील, तर मग शारीरशास्त्र व शस्त्रविद्या शिकण्याचें कारणच नाहीं!

**शास्त्री०**—(रागावतो.) काय हंसतां काय! खी, खी, खी, करून दांत दाखविले ह्मणजे झालें का? काय लाज बीज तरी वाटते का? पूर्वीं असें झालें, **सीमंतिनी** ह्मणून एक राजकन्या, ब्राह्मणदंपत्यांची **गौरीशंकर** भावनेनें पूजा करून त्यांस यथेच्छ वस्त्रालंकार देत असे. त्या आशेनें दोघां पुरुषांतून एकानें स्त्रीवेष घेऊन ते दोघे, **दंपत्य** ह्मणून **सीमंतिनी**कडे गेले. पाहतांच त्या साध्वीनें हें कृत्रिम ओळखिलें, पण एक ब्रहि न काढतां, **हरभवानी** याच भावनेनें त्यांची पूजा केली. समजलं का?

**श० वै०**—हो. मी एकाग्रतेनें ऐकतों आहें. पुढें?

**शास्त्री०**—तेव्हां, चमत्कार असा झाला कीं, वेषधारी ब्राह्मण खरोखरच **स्त्री** बनला! पुढें त्यास पुनः पुरुषत्व आणून देण्यासाठीं, देवी प्रीत्यर्थ हवन करून, देवी प्रसन्न करून घेतली व तिजकडे त्याच्या पुरुषत्वाची याचना केली. त्यावर देवी काय बोलली माहित आहे का?

**श० वै०**—मला काय ठाऊक?

**शास्त्री०**—देवी ह्मणाली, "**साध्वीचा अधिकार मजपेक्षांही बलवत्तर आहे!**" याकरितां, या वेषधारी स्त्रीचा पुनः पुरुष होणें शक्य नाहीं! असा पतिव्रतेचा महिमा आहे. दाखवले आपले दांत! लाज नाहीं वाटत? मी तुमचें शारीरशास्त्र व शस्त्र-

विद्या खोटी नाहीं ह्मणत, पण " मानवी बुद्धिसामर्थ्यापुढें आणखी कांहीं आहे. " ही गोष्ट कबूल न कराल, तर मी नाहीं ऐकणार !

**राजा**—शास्त्रीबुवा ! रागवतां काय ? आपल्या वेळाकडे लक्ष दिलें पाहिजे. **तारे**, पाहातेस काय ?

**तारा**--( डोळे मिटून ) हे आई जगदंबे ! तुझी लीला अगम्य आहे ! तुझेशिवाय, या सृष्टींत कांहींही नाहीं ! सर्व सत्ता तुझी आहे ! या आपल्या धर्मकन्येची, जर अशा प्रकारें कीर्ति वाढवावी, अशी तुझी इच्छा असेल, तर कोण जाणे ! पण जर कदाचित् वाढली, तर ती **माझी** कसली ! **तुझीच** आहे ! मजकडे काय आहे ? हे शास्त्री ह्मणतात, हा न्याय जर खरा आहे, व मी जर **सीमंतिनी**च्या चरणरजाच्या तरी लायकीची असेन, तर तुझें नांव घेऊन, दिलेल्या या चरणतीर्थानें ती प्रसूत होईल ! आणा वाटींतून थोडें पाणी ! (त्यांत पायाचा आंगठा भिजवून स्वतःच ती वाटी घेऊन आंत जाते. )

**राणी**—हायरे देवा ! धांवरे धांव ! चुकल्यें ! देवा चुकल्यें ! क्षमा कर चुकल्यें !

**तारा**--बाईसाहेब ! ऐका. श्रीजगदंबा मातुश्रीचें स्मरण करून, हें तीर्थ घ्या. भिऊं नका !

**राणी**—( तीर्थ घेते. तोंच मृतपुत्र पडतो. ) हाय ! देवा, काय बरं हा चमत्कार ! तीर्थ घेतल्याबरोबर सर्व वेदना एकदम बंद होऊन, आंतील गर्भास एक हिसका मिळाल्यासारखा होऊन, गर्भ रस्त्यावर आला ! व मला आपल्या कृपाप्रसादानें, देवा ! एकवेळ मोकळें केलें ! बाई तूं मला जीवदान दिलेंस ! तुझे उपकार—

**दासी**—( बाहेर येऊन ) महाराज ! तीर्थ दिल्या बरोबर सुटका झाली !

**राजा**—काय ! सुटका झाली ? अहाहा ! देवा ! बरं, **तारा** कोठें आहे ? ( तोंच ती बाहेर येते, तिचा हात धरून ) शाबास ! **तारे** तुझी धन्य आहे !

**तारा**–महाराज ! ही सर्व श्रीजगदंबेची कृपा !

**शास्त्री०**—काय ! वैद्यराज ! कसं काय ! नमस्कार ! ( नमस्कार करितो. )

**श० वै०**–( खट्टू होतो ) मोठें आश्चर्य खरें ! ( तोंडांत मारून घेतो. ) चुकलों बुवा ! कोणाचे हातीं कधीं काय सामर्थ्य असेल, याचा नेम नाहीं ! या करितां, जगांत कधींही ताठा धरूं नये !

**शास्त्री०**–हं ! असें बोला ! ( तारेस ) बाई तारे ! शाबास तुझी ! तूं जातीची **वारांगना** असतांही, आज या नगरांतील एकूण एक बायकांस खालीं पहावयास लाविलेंस ! धन्य, धन्य, धन्य, आहे तुझी ! तुला वारांगना कोण ह्मणेल? तूं साक्षात् **देवी** आहेस, देवी !

**तारा**–महाराज ! हा सर्व खेळ त्या जगदंबेचा आहे ! सर्व सत्ता तिची आहे !

**शास्त्री०**—काय मुलगा, कि मुलगी झाली सरकारना ?

**तारा**—मुलगा होता, पण तो गमावला !

**शास्त्री०**—जाऊंद्या पण आधीं राणीसरकारची मुक्तता झाली ! असो, झालें तें बरें झालें. सरकार ! आतां आह्मांस परवानगी ! येतों !

**राजा**—ठीक आहे.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ११ वा.

**स्थळ**–दौलतरावांचा वाडा.

**दौल०**—प्रिये, तुला मी किती वेळ बरें सांगत होतों कीं, **परमेश्वर कोठें दूर नाहीं** ह्मणून ! मात्र त्यास निरंतर ध्याइलें पाहिजे. तो आपल्या भक्ताची कधींही उपेक्षा करणार नाहीं !

**स्त्री**—प्राणनाथ ! आपलें ह्मणणें अक्षरशः खरें आहे !

**दौ०**—घे ! घाल आतां किती पाहिजे तितके दागिने ! जो आपल्या स्वतःच्या घामानें मिळविलेला विषय आहे, तो पाण्यांत बुडविला तरी बुडणार नाहीं ! व अन्यायोपार्जित द्रव्य पुरून ठेविलें, तरी

तें नष्ट म्हणून होणारच. कोळसेही झाल्याचीं उदाहरणें आहेत ! वरील प्रमाणें, माझा दृढनिश्चय असल्यामुळें. मी सरकारासही कळविलें नव्हतें. पण परमेश्वरासच करुणा येऊन, त्यानें आमचा विषय आम्हांस आणून दिला कीं नाहीं? बरें, राजा तरी किती उत्तम ! सर्पदंश होण्यापूर्वी, हा म्हणे इतका उत्तम स्वभावाचा नव्हता ! हल्लीं तर प्रजेच्या हिताचेच सर्व कायदे कानू करून टाकीत आहे !

**स्त्री**—प्राणनाथ ! हें असें कसें बरें ?

**दौल०**—तें कांहीं तरी असेना! पण आमच्या राशीस तो उत्तम आला, हें खरें की नाहीं ? माझे सर्व दागिने मला देऊन, शिवाय त्या मारवाड्यास केलेल्या पांच हजार रुपये दंडाची रक्कमहि मलाच देवविली ! शिवाय, त्यानें याहूनही मजवर एक मोठी कृपा केली आहे !

**स्त्री**—ती कोणती बरें ?

**दौल०**—प्रिये ! त्यानें त्या म्हाताऱ्या साक्षीदाराकडून माझी शिफारस ऐकून, मला तूर्त जामदारखान्यावरील मुख्य कामगिरीची जागा दिली आहे ! उद्यांपासून कामावर हजर होण्याचा हुकूम झाला आहे. !

**स्त्री**—खरंच का ? अहाहा ! देवा ! आमच्या कुटुंबाची दारिद्र्यांतून सुटका केलीस ! तुझे अनंत उपकार आहेत ! आई जगदंबे ! आतां मी तुझें भजन पूजन दुप्पट प्रमाणानें वाढविणार !

**विजय**—बाबा ! कायहो ! आई कायग झालें ? आज बाई तुला इतक्या दिवसांत हंसतांना पाहिलें !

**स्त्री**—बाळा काय नाहीं ! काय व्हावयाचें ? आम्हांस महाराजसरकारकडून राजकचेरींत जागा मिळाली !

**विजय**—कोणास, बाबांस होय ? कसली बरें ?

**स्त्री**—बाळा ! जामदारखान्यावरील मुख्य अधिकारी झाले !

**विजय**—हात्तेच्या, इतकेंचना ? मी तर ही जागा साफ नको म्हणून सांगितली असती !

**दौल०**--तर तूं कसली चाकरी करणार ?

**विज०**—काय चाकरी ? छट् चाकरी कोणीं करावी ?

**दौल०**—तर पुढें तूं करणार काय ?

**विज०**—काय ह्मणजे ? **राजा** होणार, **राजा** !

( तोंच, रस्त्यावरून लोक पाण्याच्या कळशा घेऊन धांवतात, चला हो चला लवकर ! राजवाड्यास आग लागली आग ! चला धांवा लवकर. )

**दौल०**—काय ! **आग** ? आणि ती **राजवाड्यास** ? थांबा ! दार लावून घ्या. मी असाच जाऊन येतों.

( असें ह्मणून राजवाड्याकडे धांवतो. )

---

## प्रवेश १२ वा.

**स्थळ**—राजवाडा–मागचा एक चौक पेट घेतो.

**राणी**--अहो ! धांवाहो धांवा कोणी ! माझ्या बाळाला वांचवाहो ! वरच्या मजल्यावर माझा बाळ निजला आहे हो! गडबडींत कांहींच भान राहिलें नाहीं ! देवा ! कायरे आतां माझ्या बाळाचें होणार ? देवा ! धांवरे धांव !

**लोक**—( इकडून तिकडे पाणी घेऊन धांवताहेत, तों. )

**दौल०**—बाईसाहेब ! हा निघालों पहा ! काळजी करूं नका !

**राजा**—ओहोहो ! काय आगीचा डोंब उसळला आहे ! यांत तो बिचारा मुलगा कसचा वांचतो ! पण पाहूं. आतां एक कोणीसा धाडशी पुरुष, आंत गेला आहे. यावर नशीब त्याचें !

( तोंच करपून गेलेला असा दौलतराव येतो. )

**दौल०**—महाराज ! आगीचा डोंब झाला आहे ! त्याकडे नुसतें पाहवतहि नाहीं ! पराकाष्ठेचा धूर ! कोठेंच कांहीं दिसेना ! शिवाय, ज्वाळांनीं सर्वांग करपून जाण्यासारखी स्थिति ! तरी पण मी विचार केला. ज्या अर्थी, मीं महाराजसरकारचें अन्न खातों आहें, त्या अर्थी त्यांच्या अशा प्रसंगास हा देह जर लावावयाचा नाहीं, तर त्याचा काय उपयोग ?

**राजा**—पण, मी आपल्याला अद्याप ओळखिलें नाहीं ! शब्द ओळखीचा दिसतो. पण या धांदलींत पुरती ओळख अद्याप पटली नाहीं.

**दौल०**—महाराज ! मी आपला सेवक दौलतराव आहें !

**राजा**—कोण दौलतराव ! वा, वा, वा, शाबास ! दौलतराव ! बरें मग पुढें ?

**दौल०**—सरकार ! वर सांगितल्याप्रमाणें विचार करून, जिवावर उदार होऊन गेलों खरा, पण कांहीं उपयोग झाला नाहीं ! ( डोळे पुसतो. )

**राजा**—काय ? गमावला ?

**दौल०**—होय सरकार ! काय सांगूं ? मी तशा ज्वाळांतूनच मुलास हुडकून काढिलें ! पण तो भयंकर प्रकार सांगण्यासारखा नाहीं ! ( डोळे पुसतो. )

**राजा**—हायरे हाय ! देवा ! माझ्या फुटक्या दैवांत हेंचका आहे ?

**राणी**—( ओरडून ) येरे माझ्या बाळा ! कोणीकडेरे गेलास ? मला सोडून ! माझ्या या नशिबीं पुत्रसुख नाहींच कायरे देवा ! देवा ! एकावर एक कितीरे दुःखें कोसळताहेत हीं देवा ! आतां मी कायरे करूं ?

**लोक**—( नानाप्रकारें समजावताहेत. )

**राजा**-धिःक्कार असो ! या राज्यसुखास ! आणि आग लागो या जन्मास ! लौकिकदृष्ट्या, जगांत उच्चतम ह्मणून मानलेलें सुख कोणतें ? या प्रश्नाचें उत्तर कोणीही हेंच देईल कीं, **राज्यसुख !** तें मी स्वतः भोगीत असतां, त्या दिखाऊ सुखाचा कितवा हिस्सा बरें, आज माझ्या वांटणीस आला असावा ? मजसारख्या सार्वभौम राजास जर हें सौख्य, तर या प्रपंचांत गोरगरिबांच्या सौख्याचा अजमास करणें, सोपें आहे.

**भगवच्चिंतना शिवाय खरें सौख्य नाहीं ! हेंच खरें !**

**राणी**—बाळा ! इतक्यांत कोठेंरे गेलास ? आतांचनारे तुला मी दूध पाजून निजविला ! ( रडत्ये. )

**राजा**—आतां व्यर्थ शोक करून, प्रिये ! काय बरें कामाचा ? आपला असल्यास, तो कां गेला असता ? आपण आतां याहूनही शोक केला, तरी गेला तो कांहीं पुनः येणें नाहीं !

**राणी**--पण महाराज ! मजवर एकामागून एक, हीं किती हो संकटें !

**राजा**—तें आतां बोलून काय उपयोग ? कारण, सर्व कांहीं पूर्वसुकृतानुसार व्हावयाचें. जें भोगावयाचें, तें भोगलेंच पाहिजे. तें चुकवीन ह्मटल्यास, चुकणार नाहीं. चल ऊठ ! आपण पुढच्या चौकांत जाऊं.

( सर्व–राजास मुजरा करून जातात. )

( दौलतरावास ) दौलतराव ! तुह्मी या प्रसंगीं आपल्या **स्वामिभक्ती**ची कमाल करून दाखविली, ही गोष्ट माझ्या लक्षांत आहे !

**दौल०**—सरकार ! मी जर आपलें अन्न खात आहें, तर स्वामिकार्यास बळी पडणें, माझें कर्तव्यच आहे ! त्या कर्तव्याचा अत्यंत सूक्ष्मांश जर कदाचित् माझ्याहस्तें घडला असला, तर त्याबद्दल माझा एवढा मोठा गौरव करणें, हा माहाराजांच्या **मनाचा थोरपणा** आहे ! असो, मी आतां रजा घेतों सरकार !

**राजा**—ठीक आहे, या. ( राणीस. ) बरें, प्रिये, चल आपण आतां आंत बसूं.

---

## प्रवेश १३ वा.

### स्थळ—( तारेचा महाल. )

**तारा०**—मनुष्यावर प्रसंग येऊं लागले, ह्मणजे आपले एकसारखे येतच राहतात. त्यांजवरील ह्या नानाप्रकारच्या भयंकर प्रसंगांनीं तर, त्यांचें हृदय हल्लीं दुभंगच झालेलें दिसतें ! सारा दिवस आपले

विवंचनेंत असतात ! (दारावर थाप. तारा धांवते. ) यावं महाराज ! ( हातास धरून नेऊन आसनावर बसविते, पाय धुवून पुसते, तीर्थ घेते, फराळाचें आणून पुढ्यांत ठेवते, व आरती दाखविते. )

**राजा०**—प्रिये तारे ! मला कांहींही नकोसें झालें आहे ! कशावरच माझी इच्छा नाहीं !

**तारा**—महाराज ! घ्या थोडें, कांही तरी घ्या; आणि वरती हें थोडें दूध प्या.

**राजा**—( थोडेंसें कांहीं खातो. )

**तारा**—( हात धुवून पुसून, विडा देते. )

**राजा**—प्रिये तारे ! तुझी योग्यता, मी आजपर्यंत ओळखली नव्हती.

**तारा**—महाराज ! कसली योग्यता नि कसलं काय ! जेव्हां पहावें तेव्हां आपली सारखी माझी स्तुति चाललेली असावयाची ! पण नुसत्या स्तुतीनें का कोठें पोट भरतें ?

**राजा**—म्हणजे ?

**तारा**—म्हणजे, निजलेल्यास जागें करितां येतें, परंतु जागा असतां, उगीच डोळे मिटून निजल्याचें सोंग घेणाऱ्यास, जागा कसा करणार ?

**राजा**—समजलों ! तारे तूं माझी हल्लींची सर्व स्थिति पाहत असतां, तूंच अशी कशी बरें बोलत्येस ? तुजशीं शृंगार खेळण्यास माझें मन स्वस्थ आहे का ?

**तारा**— महाराज ! आपलें मन स्वस्थ कधींच असणें शक्य नाहीं. "जितका व्याप तितका संताप" याकरितां,मी आज आपल्याला कांहीं सोडावयाची नाहीं ! ( गळ्यास मिठी मारते. )

**राजा**—अग ! पण थांब !

**तारा**—थांब बिंब तें कांहीं नाहीं ! मी आज नाहींच ऐकावयाची !

**राजा**—बरें नको ऐकूं. पण, अगोदर एक चीज गाऊन दाखीव पाहूं !

**तारा**—अगोदर, आपण माझें ऐकल्याशिवाय, मी आपलें कांहीं एक ऐकावयाची नाहीं ! चला अगोदर अंतरगृहांत ! ( त्यास ओढीत आंत नेते. )

**राजा**—पण थांब म्हणतोंना ?

**तारा**—नाहीं थांबत ! अशी ओढीत नेणार. ( आंत नेते. व कांहीं वेळानें राजा बाहेर येतो. )

**राजा०**—( कपाळावर हात मारून रडतो ) धिःकार असो मला ! माझ्यासारखा दुर्दैवी जगांत कोणीही नसेल ! तरी पण, मला सुखी समजणारे लोक जगांत कितीतरी असतील ! हाय ! हाय ! दैवा ! हात धुऊन माझा पिच्छा कांबरें तूं पुरविला आहेस ? अरे ! इंद्राच्या अप्सरेसारखी स्त्री तनमनधनेंकरून मला वश असतां, तिच्या खऱ्या सौख्याचा वांटा माझ्या कपाळीं नाहीं ! छी ! छी ! ! छी !!! जगांत मला आतां तोंड दाखविण्यासही जागा नाहीं ! मला काय ठाऊक, माझें **भांडवल** इतकें निरुपयोगी आहे तें ! पहिले दिवस आपले गडबडींतच गेले, त्यामुळें अनुभवाचा प्रसंगच नाहीं आला ! सर्व आकृति जनशिरस्त्याप्रमाणेंच बरोबर असल्यावरून, तें ऐन प्रसंगीं असा घात करील, ह्मणून वाटलें नव्हतें ! पण आज अनुभवाचीच वेळ आल्यामुळें, गोम बाहेर पडली ! शिव ! शिव ! शिव ! शुद्ध **अजागळ** ! ! धिःक्कार ! धिःक्कार ! धिःक्कार ! असो मला ! "जें चकाकित दिसतें. तें सर्वच सोनें नसतें" असो. पण या गोष्टींवरून दुसरी महत्वाची एक गोष्ट समजून घेण्याचा सुप्रसंग आज माझ्या हातीं आहे.

मी माझ्या मित्राच्या सूचनेप्रमाणें, या राजदेहांत भर स्मशानांत प्रवेश केला. त्यापूर्वी या देहांत तो मूळचा राजा होता. मूळचा राजा जरी अन्य असला, तरी त्याचा देह हाच. अर्थात् या देहद्वारें, त्यास प्रजोत्पत्ति कशी झाली ? हा मोठा प्रश्न आहे. आणि मला संशय आल्याप्रमाणेंच, जर तोही प्रकार असेल, तर मी ह्मणतों,

" आग लागो या सृष्टिवैचित्र्यास ! धिःकार असो, त्या जन्मधारणेस आणि चूड पेटो, या असल्या सार्वभौम सौख्यास!! इशूशश् "! ! जातों, याचा आतांच तपास केला पाहिजे.

( राजा जातो, व रडत रडत तारा येते. )

**तारा**—( कपाळावर हात मारून ) घात झाला ! घात झाला ! घात झाला ! आई जगदंबे ! तूं इतकी कायग कपटी आहेस ? तूं माझा गळा कैंसानेंकीग कापलास ! मला ही तड नाहीं, व तीही नाहीं, असेंच कीं ग केलेंस ! सर्वतोपरी मला तूं कसें बुडविलें ! हाय ! देवा ! माझ्या नशिबीं पुरुषसुख नाहींच कायरे ! आतां मी दुसरा पुरुष कोणत्या तोंडानें करूं ? आई ! माझी एवढी दिगंतरीं कीर्ति पसरून, शेवटीं मला हेंच कायगे फळ ? आतां मी जगांत तरी कशाला राहूं ? ही पहा आल्यें, हा देह आज तुझ्या काजीं लावल्या-शिवाय राहत नाहीं. ! ( म्हणून तशीच पुनः मध्यरात्रीं देवळांत निघते. )

( देवळाचा देखावा. काळोख. )

आई ! मला अशी हालहाल करून मारण्यापेक्षां, एकदम भस्म करून कां नाहीं टाकित ? अगर भूकंपानें धरणी दुभंग करून, मला तिच्या पोटांत गडप् कां नाहीं करित ? माझ्या प्राणप्रियाची गांठ घालून देत्यें, असें तूं मला वचन दिलें असतां, माझी अशी दुर्दशा करून कां बरें टाकिलीस ? मी तुझी एकाग्रतेनें जी शक्त्य-नुसार सेवा करित आहें. तिचें फळ मला याच रूपानें मिळावें ना ? ठीक आहे, जर तुला माझें सौख्य नको, तर मला तरी माझा जन्म कशाला पाहिजे ? हा पहा ! घे माझा शेवटचा नमस्कार ! ( सुरी काढून पोटांत भोंसकणार तोंच साक्षात् देवी, स्त्रीरूपानें येऊन तिचा हात धरते. )

**देवी**—मुली ! सावध हो ! ऐक, तूं मला **वचनभ्रष्टतेचा** दोष देत्येस, पण मी वचनभ्रष्ट नाहीं. मी बोलल्याप्रमाणें, तुला तुझ्या प्रियकराची दीर्घप्रयत्नानें **गांठ** घालून दिली कीं नाहीं ?

**तारा**—आई ! तूं अशी कपटी कशीगे ? "गांठ घालून देईन" या शब्दाचा असा विपरीत अर्थ तूं करणार, हें जर मला पूर्वी कळतें, तर मी तुजकडून तशी बंदोबस्ती करून घेतली असती. प्रत्येक अक्षर तुजकडून बांधून घेतलें असतें ! ठीक आहे. मर्जी तुझी ! आतां सोड मला, केलेंस तें उत्तम केलेंस ! आतां मी जीव ठेवणार नाहीं !

**देवी**—( कुरवाळून ) माझे लाडके मुली ! ऐक. तुझी निष्कलंक भक्ति पाहून माझ्या अंतःकरणांत प्रेमाचा उमाळा आल्यामुळें, मी तुला हें प्रत्यक्ष दर्शन देऊन, एखाद्या **दासीप्रमा**णें ही तुझी सेवा करित आहें ! याची तरी कांहीं लाज धर, व सांगत्यें इकडे लक्ष दे.

**तारा०**—( हात जोडून ) आई ! काय आज्ञा आहे ?

**देवी**—आधीं तें शस्त्र इकडे दे. ( शस्त्र घेऊन दूर फेंकून देत्ये. ) बाळे ! नीट लक्ष दे. मी तुझें हित करण्यासाठींच येथें प्रगट झाल्यें आहें. एकाग्र हो.

**तारा**--मातुश्री ! सांग सांग काय तें. मी ही हात जोडून उभी आहें !

**देवी**—तूं पूर्वजन्मीं स्वर्गीची अप्सरा होतीस. सुरसभेस येण्यास किंचित् उशीर झाल्यामुळें, तुला देवांचा शाप होऊन, तूं या भूलोकीं जन्मास आली आहेस. आणि ह्मणूनच, तुला या लोकींच्या साधारण पुरुषांचा कंटाळा. नाहीं तर द्रव्येच्छेला कोणती वारांगना लुब्ध झाल्याशिवाय राहिली असती ? पण तूं उच्च कुलोत्पन्न असल्यामुळें, तुजकडून निंद्यकर्म कधींही घडलें नाहीं ! आतां, तें विषयसौख्य तरी तुला कां प्राप्त नाहीं ? असा तुझा प्रश्न. त्यास कारण असें:-तूं स्वर्गी असतां, देवसभेस जाण्यास जो उशीर केलास, तो उशीर होण्याचें कारण तुझी विषयलुब्धता, हें होतें. ज्या विषयलोलुपतेनें आपल्या सेवेला हजर होण्यास तूं उशीर केलास, तें विषयसुख तुला येथेंही मिळूं नये, असा देवलोकींचा तुला शाप झाल्यामुळें, तुला तें सुख येथेंही मिळालें नाहीं !

**तारा**—तर मग आई ! त्यांची सुसंगति तरी कशास पाहिजे ?

**देवी**—मुली ! खरोखर ह्मणशील तर, तुला त्याच्या संगति-सुखाचाहि लाभ व्हावयाचा नव्हता. पण मी तुझ्या अप्रतिम सेवेस लुब्ध झाल्यामुळें, मी ती विलक्षण घडामोड करून, तेवढी तरी संगति तुला घडविली. नाहींतर, सर्पदंश झाल्यादिवशींच तुझ्या सर्व सौख्याचा अंत व्हावयाचा होता.

**तारा**—तर मग आई ! आतां मी काय करूं ?

**देवी**—बाळे ! तुला जर विषय सौख्य पाहिजे असेल, तर मी तुजकरितां ह्मणून, प्रेमबद्धतेमुळें, पाहिजे तर अशी तजवीज करित्यें.

**तारा**—कशी ?

**देवी**—तुला इच्छा झाल्यादिवशीं, रात्रीं तुझ्या स्वप्नांत एक दिव्य पुरुष येऊन, तो तुझी इच्छा पूर्ण करील. पण याच्यायोगें, जगांत तुझा पुढें दुर्लौकिक होईल. आणि जर तूं या ब्रह्मचर्यव्रतानें राहशील, तर तुझी यालोकीं आणखीही कीर्ति होऊन, परलोकींही तुला सद्गति प्राप्त होईल. तेव्हां बाळे ! कोणता मार्ग पतकरत्येस ?

**तारा**—पण आई ! माझा आतां हा एवढा जन्म मी ब्रह्मचर्य-व्रतांत घालवून, माझ्या चरितार्थाची सोय कशी होणार ?

**देवी**—त्याबद्दल तूं कांहींच काळजी करूं नको. तुला आतां जगांत फार दिवस काढावयाचे नाहींत. आणि तुझ्या ऐहिक काला-पुरता, मी योग्य बंदोबस्त केलेला आहे. तुला कांहीं कमी पडणार नाहीं. अन्न व वस्त्रभूषणें वगैरे सर्वकांहीं वैभव, तुला भरपूर प्राप्त होईल ! तूं त्याजबद्दल बिलकुल काळजी करूं नको. मात्र जर यानं-तर **वचनभ्रष्ट** होशील, तर मात्र तुझी गति फारच वाईट होईल. याकरितां बोल तुला काय पाहिजे तें ? तें कीं हें ?

**तारा**—( स्वगत ) मजकरितां, या माझ्या जगदंबेला केवढी काळजी ही ? हिच्या आज्ञेप्रमाणें वागल्यास, संकटसमयीं हाक मार-ण्यास तरी आधार आहे. शिवाय, सर्व कांहीं राजवैभवसुख **देईन** ह्मणते, तेव्हां हेंच पतकरावें झालें ?

शिवाय, इच्छा असल्यास विषयसुखही प्राप्त होण्याची तजवीज

करित्यें ह्मणते. पण त्या सुखांत परिणामीं काय असतें, तें हल्लींच चार दिवसांपूर्वी, राणीसाहेबांनीं समक्ष दाखविलें आहे ! आणि इ. तकें करूनही, त्यांत पडल्यानें,पुढें अपकीर्ति व्हावयाची. या सर्व गोष्टीं-चा विचार करतां, **दुसरी** गोष्ट पतकरावी, हेंच श्रेयस्कर ठरतें.

**देवी**—मुली! किती वेळ, कसला विचार करत्ये आहेस? दोहोंतून कोणतेंही एक तुला मिळेल.

**तारा**—आई ! ज्यांत माझें खरें कल्याण आहे, तें तूंच निवडून मला दे.

**देवी**—शाबास ! मुली तूं फारच शहाणी आहेस. बाळे, ज्या-अर्थी, मी तुझ्या कल्याणाची खरी इच्छा करीत आहें, त्याअर्थी तूं माझी दुसरी देणगीच स्वीकारावी, असें मला वाटतें. यांतच तुझें खरें कल्याण आहे.

**तारा**—ठीक आहे. आई, मला दुसरीच देणगी दे तर मग ! मी आपली **ब्रह्मचर्यव्रतच** राहत्यें ! मात्र, सर्वकाळ कृपा ठेव. हीच प्रार्थना.

**देवी**—ठीक आहे. झालेंना आतां तुझें समाधान ? आतां कधीं कुरकुर करूं नको. समाधानवृत्तीनें रहा. अंतसमयीं आपलें सर्व द्रव्य ब्रह्मार्पणबुद्धीनें, देशांतील विद्या, कलाकौशल्य वाढून, **गो-गरीब** लोकांचा **उदरनिर्वाह** होईल, अशा कामीं देऊन टाक. ह्मणजे अंतीं सत्स्वरूपांत लीन होशील. ठीक आहे. येतें मी !

( अंतर्धान पावते. )

**तारा**—आई ! कृपा असावी. ( नमस्कार करित्ये. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश १४ वा.

**स्थळ**—राजवाडा, राणीमहाल, मध्यरात्र.

**राजा**—काय, प्रकृति बरी आहेना?

**राणी**—मला धाडसुद्धां यावयाची नाहीं.माझीं एकाहून एक सुंदर

अशीं दोन रत्नें या आठ दहा दिवसांत गेलीं, यामुळेंच मी झुरणीस लागत चाललें आहें. मला आतां कांहीं नको !

**राजा**—कां ? इतक्यांतच इतकी **विरक्तता !**

**राणी**—महाराज ! आपण असं कसं म्हणतां ? मी माझ्या लाडक्याशिवाय आतां कशी कालक्रमणा करूं ? माझें आतां पुढें कसें होणार ?

**राजा**—कां इतक्यांतच झालीसका म्हातारी? आतां पुढें होणारच नाहींत वाटतें मुलें !

**राणी**—महाराज ! मला आणखी चिडवूं नका ! मी माझ्या नशिबीं आलें, तें निमुटपणें सोशीत आहें! त्या **दुःखाग्नींत** आणखी **तेल** ओतूं नका !

**राजा**—कसलें दुःख तूं सोसत्ये आहेस ? तूं एवढी मोठी राजपत्नी असतां तुला दुःख ? ही गोष्ट साफ असंभवनीय आहे !

**राणी**—प्राणनाथ ! काळोखांतील वस्तु शोधून काढण्यास सूर्याच्या हातीं दिवा कशाला पाहिजे ?

**राजा**—तूं काय म्हणतेस ? मला समजत नाहीं ! नीट स्पष्ट सांग.

**राणी**—तुम्हींचना मला पापकर्मास लाविलें ?

**राजा**—काय ? मी तुला पापमार्गास लाविलें ?

**राणी**—तुम्हींचना मला त्या प्रधानजीची गांठ घालून दिली ?

**राजा०**—काय ? **मी** तुला प्रधानाची गांठ घालून दिली ? म्हणजे तुझा प्रधानाशीं **शरीरसंबंध** आहे तर मग ?

**राणी**—सरकार ! आपणच जर त्याशीं शरीरसंबंध जुळवून दिला, तर पुनः आणखी मला काय विचारतां ?

**राजा०**—काय ? त्याशीं रममाण होण्यास तुला **मी** सांगितलें ? इश्श्श् ! ( स्वगत विचार करून ) हो, पण मी पुनः मलाच विसरलों ! ही म्हणते, तें कदाचित् बरोबर असावें. सर्पदंश होण्याच्या पूर्वी, या शरीरांत कांहीं मी नव्हतों. जो कोणी या देहांत होता, त्यानें हिला संमति दिली असेल. असो पुढें आणखी ही काय काय बोलते पाहूं !

**राणी**—सरकार ! मी आपल्यापुढें आतां नाक आपटून जीव देईन ! आतां इश्‌श्‌श्‌ करतां ? तुह्मांला हा प्रकार जितका निंद्य वाटतो, त्याच्या अनंतपट, मला हा प्रकार, त्यावेळेपासून, तों हा कालपावेतों, अत्यंत **निंद्य व त्याज्य** वाटत आहे. पण काय करूं माझ्या प्रारब्धाला ! मी तर तेव्हांपासूनच आपल्याला साफ सांगत आहें कीं, मी आपलें सर्व आयुष्य ब्रह्मचर्यव्रतांत घालवून फक्त आपली **पादसेवा** करून राहण्यास कबूल आहें. पण, "राज्यास कोणी तरी वारस पाहिजे" या सांगीवर, मला आपणच आग्रहपूर्वक या पापकर्मांत लोटून दिलें ! असें असतां, आतां **इश्‌** करतां !

**राजा**—बरें, तें असो ! मी कदाचित् तुला सांगितलें असेल अविचारानें ! पण, त्या **नीच** कर्माचें तूं कसें अवलंबन केलेंस !

**राणी**—मीं आपल्याला एक वेळ सांगितलें ना, मला फिरफिरून चिडवूं नका ह्मणून !

**राजा**—बरें पण प्रिये! ती जर माझीच चूक, तर तुजकडे अपराध कसला ? ठीक आहे. तो सर्व दोष मी आपल्यावर घेतों. पण तुला विचारतों; पहिला मुलगा तुला कोणापासून झाला ?

**राणी**--(रागानें लाल होऊन, राजाकडे डोळे वटारून पहाते, व श्वासोच्छ्वास जोरानें सोडते.)

**राजा**—हें काय ! हें काय ! ( ह्मणतां ह्मणतां ती बेशुद्ध पडते. राजा पळत पळत पाणी आणून डोळ्यांस लावतो, व वारा घालतो, व कपाळ दाबून तिला सावध करितो. ) प्रिये, हें काय बरें !

**राणी**—काय ! तुह्मीं आतां मला अशा रीतीनें छळून माझें तोंड **काळें** करणार काय ? ठीक आहे ! तुह्मी करण्यापूर्वी मीच आपलें करून घेत्यें ! ( आंगठींतली हिरकणी काढूं लागते. )

**राजा**--थांब ! थांब ! प्रिये, शांतहो ! शांतहो ! शांतहो !

**राणी**—आंगावर प्रत्यक्ष आग पाखडावयाची, आणि ह्मणाव-

याचें, शांतहो, शांतहो ! महाराज ! मी अशी प्रतिज्ञा करण्यास तयार आहे कीं, मी केवळ आपल्या आज्ञेवरून, फक्त **प्रधानाशीं** मात्र शरीरसंबंध ठेविला आहे. त्याशिवाय, जर इतर कोणाही पुरुषाकडे पापदृष्टीनें नुसतें पाहिलें असेल, तर हा देह आतांच्या आतां जळून **भस्म** होवो !

**राजा**—शाबास प्रिये, तुजकडे कांहींही दोष नाहीं. मी फक्त तुझी परीक्षाच पाहण्याकरितां, तुला चाळविलें, दुसरें कांहीं नाहीं. तुजबद्दल माझी खात्री पूर्वींच झालेली आहे. असो, आतां तूं माझें ऐकणार ?

**राणी**—महाराज ! आपली आज्ञा, मला माझ्या प्राणाहूनही ज्यास्त प्रिय आहे. आपण मला समुद्रांत उडी टाक ह्मणून सांगितलें, तरी मी मागें पुढें पाहणार नाहीं.

**राजा**—तुला आतां त्या **प्रधाना**ची गरज आहे काय ?

**राणी**—मला त्या गोष्टीचा मुळापासूनच वीट आहे ! फक्त आपल्या आज्ञेवरून, संततिप्रीत्यर्थ, अत्यंत नाखुषीनें, त्यांच्याशीं संबंध ठेविला होता ! आपण आतां आज्ञा कराल, ती मला सर्वथैव मान्य आहे ! मला त्याच्याशीं काय करावयाचें आहे ?

**राजा**—मी त्यास या जगांतून नाहींसा करणार !

**राणी**—जशी आपली इच्छा ! मला आपली इच्छा प्रमाण ! मी देहानें जरी आपल्याहून भिन्न असलें, तरी मनानें बिलकूल नाहीं. मी माझें मन आपल्या मनाशीं लीन केलें आहे.

**राजा**—ठीक आहे. कोण आहेरे तिकडे ?

**शिपाई**—( हात जोडून ) जी ! महाराज सरकार !

**राजा**—जा, आणि आतांच्या आतां, **प्रधान**जीस बोलावलें आहे म्हणून सांगून, त्याला घेऊन ये. रिकामा आलास तर ध्यानांत धर !

**शिपाई**—जी सरकार. ( जातो व थोड्या वेळानें **प्रधान**जीस घेऊन येतो. ) सरकार ! प्रधानजी बाहेर येऊन उभे आहेत.

**राजा**—( शिपायास ) तुम्ही कोणीही जवळ राहूं नका. चला खालीं लांब रहा. प्रधानजीस इकडे पाठवून द्या.

**शिपाई**—आज्ञा सरकार. ( जातो व प्रधानास पाठवितो. )

**प्रधान**—( मुजरा करून हात जोडून उभा रहातो. )

**राजा**—( मुजरा न घेतां रागानें लाल होतो. ) **प्रधान** ! मला तुमच्या तोंडावर नजर घालणें, **महत्पाप** वाटत आहे.

**प्रधान**—( दचकतो, व थरथर कांपत टकमक पाहतो. ) सरकार ! काय चूक झाली समजत नाहीं. क्षमा असावी सरकार !

**राजा**—काय ! चूक समजत नाहीं ! जर तूं आजपर्यंत **एकच** चूक केली असतीस, तर ती तुझ्या लक्षांत बरोबर राहिली असती. असंख्यच जर चुका झाल्या असल्या, तर लक्षांत कोणती म्हणून ठेवणार ?

**प्रधान**—सरकार, हा दास क्षमेस पात्र आहे.

**राजा**—क्षमेस **अपात्र** आहेस. सांग आजपर्यंत काय काय अनीतीचीं कर्में केलींस तीं ! स्वमुखानें सर्व कबूल कर; नाहीं तर तुला येथेंच ठार करीन.

**प्रधान**—कोणाचें कांहीं काम केलें ह्मणजे, कोणी कांहीं तरी आणून देतात; पण त्यांस तें आणावयास, मी कांहीं सांगत नसतों सरकार !

**राजा**—**काय** आणून देत असत ?

**प्रधा०**—सरकार क्षमा !

**राजा**—बोल लवकर !

**प्रधान**—कोणी द्रव्य, कोणी वस्त्रालंकार, कोणी फळफळावळ !

**राजा**—याशिवाय ?

**प्रधान**—कधीं कधीं कोणी **स्वस्त्रीही** !

**राजा**—शिव! शिव ! शिव ! बरें, यांतून एक वेळा तरी यांतील वस्तु परत केली आहेस का ?

**प्रधान**—नाहीं सरकार.

**राजा**—सर्वांचा स्वीकार केलास ना ?

**प्रधान**—स-स-सरकार क्षम-म-मा !

**राजा**—अगोदर उत्तर दे !

**प्रधान**—होय सरकार सर्वांचा स्वीकार केला आहे !

**राजा**—बरें याशिवाय ?

**प्रधा०**—महाराज ! मी या सर्वांहूनही अत्यंत नीच, असें एक **महा पाप** केलें आहे खरें ! ( कांपतो. )

**राजा**—कोणतें ?

**प्रधान**—रा-रा-रा-**राणी सरकारशीं** !

**राजा**—काय राणीसरकारशीं ?

**प्रधान**—स-स-स-**संबंध** !

**राजा**—कसला संबंध ?

**प्रधान**—श-श-शर-**शरीर संबंध** !

**राजा**—इश्श् ! ! ( हात पाय आपटून घेतो. )

**प्रधान**—पण सरकार !

**राजा**—काय ह्मणतोस ?

**प्रधा०**—आपल्या हूकुमावरून ना ?

**राजा**—काय ? मी तुला हुकूम दिला होता ?

**प्रधान**—होय सरकार !

**राजा**—( स्वगत ) हँ समजलों—हीही मघांच्या सारखीच चूक होत होती. असो.( उघड ) पण मी असें ह्मणतों, कदाचित् अविचारानें, मी हुकूम दिला असेल, पण तो योग्यायोग्य पहाण्याचें काम कोणाचें ?

**प्रधान**—मा-मा-माझें सरकार !

**राजा**—होय ना ? मग तुम्हीं योग्यायोग्य काय पाहिलें ? अहो ! आपल्या शास्त्रांत राजा हा **श्रीमहाविष्णुसमान** मानिला आहे ना ?

**प्रधान**—होय सरकार.

**राजा**—मग त्याची **पत्नी** कोण झाली ?

**प्रधान**—श्रीमहालक्ष्मी, सरकार !

**राजा**—त्या **श्रीमहालक्ष्मीशीं** संबंध ? शिव ! शिव ! शिव ! धिःकार असो तुला ! या तुझ्या पापामुळें, तुझ्या स्पर्शानें साक्षात् जगत्पावनी भागीरथीसही भ्रष्टकार होईल ! !

**प्रधान**—चूक झाली सरकार ! ( सा० न० घालतो. **राणीचेही** पाय धरतो. ) आई, क्षमा कर ! हा पहा तुझा बालक आहे ! पदरीं लहान लहान मुलें आहेत ! महाराज, क्षमा करा ! !

**राजा**—तुझे राई राई एवढे तुकडे तुकडे करून, ते काय करावेत, तेंच मला समजेना ! कारण, जाळावें, तर अग्नि भ्रष्ट होईल ! जमिनींत पुरावे, तर भूमाता भ्रष्ट होईल ! पशुपक्षांस घालावे, तर तेही जन्मोजन्मीं नर्कवास भोगतील ! पण तुझे तुकडे तुकडे करावे, हीच तुला क्षमा !

**प्रधान**—( लटलट कांपतो, व पुनः लोटांगण घालतो. )

**राजा**—( जरा शांत होऊन ) आतां जर तुला तुझा जीव पाहिजे असेल, तर असें कर. ऊठ मधून ! ( उठून हात जोडतो. ) आतांच्या आतां, गांवांतून आपलीं मुलें माणसें घेऊन बाहेर पड. उजाडण्यापूर्वी मीं तुझा वाडा जाळून टाकणार ! तूं शरण आलास, म्हणून हीच तुजवर मेहेरबानी !

**प्रधान**—( हात जोडून ) क्ष–क्ष–क्ष–मा सरकार !

**राजा**—निघतोस कीं नाहीं ? कीं शंभर वर्षे येथेंच भरून घेणार ? आणि यानंतर, तूं किंवा तुझ्या कोणत्याहि संततीनें या राज्यांत येतां कामा नये. आल्यास देहांत प्रायश्चित्त होईल. चल निघ !!

**प्रधान**—( जातो. )

**राजा**—प्रिये !

**राणी**—( थर थर कांपते. )

**राजा**—प्रिये ! भिऊं नको. तुला तुझ्या ह्या पापाबद्दल क्षमा केली आहे ! कारण, तूं बोलून चालून अज्ञान **अबला** ! केवळ मा-

ह्या आज्ञेवरून, तूं या पापकर्मांत पडलीस. वास्तविक तूं निष्पाप आहेस, याबद्दल माझी खात्री झाली.

**राणी**—महाराज! मलाही कृतकर्माचा भारी पश्चात्ताप होत आहे! क्षमा असावी सरकार!

**राजा**—प्रिये, तूं निर्दोषी आहेस, ह्मणून सांगितलें ना? शिवाय, तूं दुसरा असा विचार पहा! **दुष्कर्म** हें ईश्वरास कधींही संमत नाहीं. तुला **दुष्कर्मा**पासून दोन **अपत्यें** झालीं, पण दोहोंचाही कसा परिणाम झाला पाहिलास ना ?

**राणी**—महाराज! बरोबर आहे!

**राजा**—जर, भ्रष्ट बीजोत्पन्न राजपुत्राचा, या पवित्र राज्यासनाला नुसता स्पर्श झाला असता, तर हें राज्य, अल्पावकाशांतच नष्ट झालें असतें! परंतु, ही **राज्यलक्ष्मी** आणखी कांहीं काळ टिकावी, असा ईश्वरी हेतु आहेसें वाटतें! ह्मणूनच त्या दोन्ही पुत्रांचा दोन प्रकारें अंत झाला! हें तूं खास समज.

**राणी**—खरें आहे सरकार! पण प्राणनाथ! एक गोष्ट आपल्याला विचारावयाची आहे, त्याची क्षमा असावी.

**राजा**—विचार, क्षमा कशाची त्यांत ?

**राणी**—ते दिवशीं, माझ्या प्रसूतिसमयीं मोठमोठ्या सुईणी व शस्त्रवैद्य यांचेंही कांहीं शहाणपण न चालल्यामुळें, मी त्याक्षणींच मृत्युमुखीं पडावयाची; परंतु सुदैवानें ज्या **एकीनें** मृत्यूच्या जाभाड्यांतून मला ओढून काढिलें, ती कोणी मानवी स्त्री आहे, कीं दैवी? मी तिला परत पहाणार व तिच्याशीं दोन शब्द बोलणार ह्मणत्यें तों, त्या वेळच्या मूर्च्छेमुळें, तें तसेंच राहिलें! बिचारीबरोबर मी एक शब्दही बोललें नाहीं! ती मला परत पाहावयास मिळेल का ?

**राजा**—हो! आतांच तिला बोलावून आणवितों! कोण आहे रे तिकडे ?

**शि०**—सरकार!

**राजा**—आणखी एका शिपायास घेऊन ये.

( दोन शिपाई येतात, )

**राजा**—( एकाच्या कानांत कांहीं सांगून, त्यास कोठेंसें पाठवितो व दुसऱ्यास ) जा, व **तारांगनेस** आतांच बोलाविलें आहे, ह्मणून सांगून घेऊन ये.

**राणी**—महाराज ! ती कोणी मानवीच का स्त्री ?

**राजा**—अग, ती एक आपल्या या राजधानींत राहणारी **वारांगना** आहे.

**राणी**—कोण **वारांगना** ! आणि ती इतक्या योग्यतेची !

**राजा**—पहा आतां ! ( तोंच )—

**शिपाई**—सरकार ! **तारांगना**बाईसाहेब बाहेर येऊन उभ्या आहेत.

**राजा**—अरे, बाहेर कां ? आंत येऊंद्या.

( **तारा** येते व उभयतांस नमस्कार करिते ).

**राजा**—**तारे**, तुझ्या सद्गुणभांडारास लुब्ध होऊन, स्वतः **राणीसाहेबांनीं** तुला आज बोलावून आणिलें आहे.

**तारा**—महाराज ! मज यःकश्चित् स्त्रीचें सद्गुणभांडार कसलें ? किती झालें, तरी मी **वारांगना** !

**राजा**—**तारे** ! तूं **वारांगना** असूनही, मोठमोठ्या कुलीन ह्मणविणाऱ्या गृहिणींसही लाजविलेंस, आणि याच तुझ्या सद्गुणांमुळें, त्या दिवशीं या माझ्या प्रियतमेचे प्राण तूंच वाचविलेस !

**तारा**—असो, आतां पुरे सरकार ! कसल्या क्षुद्र गुणांची किती ह्मणून स्तुति करावयाची ! मला आतां काय आज्ञा व्हावयाची ती व्हावी.

**राजा**—प्रिये ! आज्ञा कसली ? राणीसाहेबांच्या मनांत तुझें कांहीं कल्याण करावें, असें आहे.

**राणी**—ये बये, इकडे ये ! उभी कां ! ( तिला जवळ बसवून

घेते. ) ज्या अर्थी, तूं आपल्या अमूल्य सद्गुणांच्यायोगें माझे प्राण रक्षण केले आहेस, त्याअर्थी, मी जन्मोजन्मीं तुझी उतराई होणार नाहींच, परंतु मी कृतघ्न नाहीं, एवढ्याच गोष्टीच्या द्योतकतेप्रीत्यर्थ अंशतः तरी उतराई होण्याचा प्रयत्न करावा, अशी माझी फार फार इच्छा आहे.

**तारा०**—बाईसाहेब ! मला आतां कोणत्याही गोष्टीची अवश्यकता नाहीं ! कारण, मला या दुनयेचा भारी वीट आला आहे !

**राणी**—बाई ! तूंही अशी उदास कां बरें ? मी ह्मणत्ये," जगांत दुःखी काय ती मीच " पण, तुझेंही बोलणें, त्याचसारखें दिसतें ! बाई ! तूं कां बरें दुःखी ? मजकडून तुझें दुःख कांहीं कमी होण्यासारखें आहे का ? असल्यास सांग मी पाहिजे ती तुझी कामगिरी करण्यास कबूल आहें.

**तारा**—माझें दुःख, या जगांत, व या जन्मीं, आतां कोणाच्यानेंही कमी होण्यासारखें नाहीं. याकरितां, बाईसाहेब ! तें न सांगितल्याबद्दल क्षमा करा ! पण या गरीब दासीची एक विनंति आहे बाईसाहेब !

**राणी**—काय बरें कामगिरी आहे ?

**तारा**—आपण सार्वभौम राजाची **पट्टराणी** असतां, आपण आपल्याला **दुःखी** ह्मणतां, हें मोठेंच आश्चर्य वाटतें ! करितां, तें मला सांगितल्यास, मी तें निवारणार्थ शक्त्यनुसार प्रयत्न करीन ह्मणत्यें !

**राणी**—शाबास बाई ! काय, तुझी ही उदार बुद्धि !

**तारा**—तें परत परत नको ! पण बाईसाहेब ! काय बरें आपल्याला दुःख आहे ?

**राणी**—बाई ! तुझ्या अप्रतिम प्रेमाबद्दल मी तुला काय मोबदला देऊं ? मला कांहींच सुचेना ! पण मी तुला आपली सख्खी **बहीण** मानणार ! मानूंना ?

**तारा**—बाईसाहेब ! मी एवढ्या मोठ्या मानास पात्र नाहीं ! पण

आपण जर तो मान मला प्रेमबुद्धीनें देणार असाल, तर मी तो आदरपूर्वक स्वीकारीन !

**राणी**—माझ्या प्रिय **भगिनी** ! ( गळ्यास मिठी घालून ) ज्या प्रमाणें तुझें दुःख, या जगांत व या जन्मीं आतां कोणीही कमी करण्यास समर्थ नाहीं, त्याचप्रमाणें, बाई ! माझें दुःखही या जगांत व या जन्मीं, आतां कोणाच्यानेंही कमी होण्यासारखें नाहीं.

**तारा**—यावरून, बाईसाहेब, आपण व मी **समदुःखी** आहों !

**राणी**—पण **ताराबाई** ! आपण जर आतां परस्परांशीं बहिणीच्या नात्यानें वागण्याचें ठरविलें आहे. तर तुमचें दुःख मला व माझें दुःख तुह्माला समजणें जरूर आहे !

**तारा**—बाईसाहेब ! आपल्या व माझ्या दुःखांत बरेंच साम्य दिसतें ! कारण, आपलें दुःख कमी करण्याला याजगांत कोणी नाहीं, तसाच माझेंही दुःख कमी करणारा, या जगांत कोणी नाहीं ! व आपलें दुःख याजन्मीं कमी होण्यासारखें नाहीं, व माझेंही दुःख याजन्मीं कमी होण्यासारखें नाहीं ! यावरून, आपलें व माझें दुःख एकच नव्हेना ? मला असा भास होतो !

**राजा**—याचा खुलासा, परस्परांच्या वृत्तनिवेदनानें सहज होणार आहे ! मीं पाहिजे तर जरा बाहेर जातों !

( बाहेर येऊन स्वगत )

काय हा चमत्कारिक घोंटाळा उडाला आहे पहा ! **तारा**, ज्या दुःखांत आहे, त्याच दुःखांत **राणी**ही आहे ! अर्थात् दोघींचें दुःख अगदीं एक आहे ! आणि त्या दुःखास कारण, **मी** एकटा आहें, बरें मी तरी कारण कसा ? आतां, मी अविचार करून, या राजदेहांत सुखाच्या लालसेनें आलों, ही माझी चूक आहे. पण कदाचित् मी या देहांत आलों नसतों, तरी काय झालें असतें ? हेंच ! तेव्हां, मी यास दुःख देण्यास कारण ह्मणण्यापेक्षां, यांचें लवमात्र तरी, सुख वाढविण्यास मी कारण आहें, असें कां ह्मणूं नये? ह्मणजे, **कुंकवास** तरी, थोडे दिवस आधार झालों कीं नाहीं ?

असो. आतां आपल्या मुदतीपैकीं, हां हां म्हणतां, आज **वीस** दिवस तर निघून गेलेच ! आतां फक्त **पांच दिवस** राहिले आहेत ! ते भरण्यापूर्वी, आपण आपल्या स्वस्थळीं जाणें योग्य होतें. कारण या जगांत **मोठें सुख** प्राप्त होईल, म्हणून जी मला जबरदस्त आशा होती, ती तर साफ विरघळून गेली ! मला तर आतां येथील प्रत्येक ऐहिक गोष्टीची अगदीं **ओकारी** येत आहे.

मी आतां येथल्या येथें माझ्या प्रियबंधूचें स्मरण करून, या देहांतून मोकळा होईन सुद्धां ! पण विचाऱ्या निरपराध **दोघी स्त्रिया,** हें सर्व **राज्य** व **दौलतराव,** यांची व्यवस्था मी जर न केली, तर मी अपराधी होईन. करितां, तेवढें कार्य करून आपण स्वस्थळीं जावें हेंच उत्तम ! मला नको आतां हें दुःख !

**राणी**—( आपापली हकीगत परस्परांस सांगितल्यावर ) या सरकार ! आंत या. आपण बाहेर कां ?

**राजा**—म्हटलें, आपल्या गुप्त गोष्टींत मी आणखी मध्यें नको ?

**तारा**—अहाहा ! ( हंसत ) जणुं काय आपण त्या गांवचेच नव्हों !

**राजा**—काय? तुमच्या या गोष्टीसंबंधीं **मला** काय माहित आहे?

**राणी**—( हंसत ) सरकार ! देवपूजा करतांना, देवाला वाहायला प्रत्यक्ष अलंकार असले, म्हणजे " अलंकरणार्थे अक्षतां समर्पयामि " असें म्हणण्याचें कारण नसतें.

**राजा**—म्हणजे ?

**राणी**—महाराज ! म्हणजे काय ? ज्या कारणानें **मी** दुःखी आहें, त्याच कारणानें ही माझी **प्रियसखी** दुःखी आहे. आणि त्यास कारणीभूत दुसरा कोणी नसून, सरकार **आपणच** आहां बरें ! आपण आहां म्हणजे, आपण आम्हांस दुखविलें असें मी मुळींच म्हणत नाहीं. दैवयोगानें आपल्याला दोष येतो इतकेंच ! पण तो केवळ निरुपायानें येत आहे. पण वास्तविक आपण आमचें यत्किंचितही वाईट केलेलें नाहीं. इतकेंच नव्हे, पण आमचें कल्याण करण्या-

विषयीं, आपण मनापासून प्रयत्न करित आहां. याबद्दल आह्मीं उभयतां आपल्या **दासी**, आपले अनन्यभावें आभार मानितों.

**राजा**—झाली, आपली उभयतांची समजूत ? काय, प्रिये **तारे**! तुझीही समजूत झाली ? मग मघांशीं आपल्या त्या अंतरर्गृहांत उगीच कां बरें रडत बसली होतीस ? मी त्यांत कांहीं अपराधी आहे काय ?

**तारा**—नाहीं नाहीं महाराज ! आपण यत्किंचितही या कामीं आमच्या दुःखास कारणीभूत नाहीं. फक्त आमचें **पूर्वकर्म** कारणीभूत आहे !

**राजा**—तर मग मलाही असें ह्मणण्याचा अधिकार पोंचतो.

**राणी**—कसें ?

**राजा**—माझेंही दुःख, या जगांत व याजन्मीं, कमी करण्यास कोणीही समर्थ नाहीं !

**राणी**—( गळ्यांत हात घालून ) सरकार ! अगदीं खरें !

**तारा**—( दुसरीकडून गळ्यांत हात घालून ) महाराज ! आह्मी तिघेंही अगदीं समदुःखी आहों ! व चमत्कार हा कीं, ज्याप्रमाणें एकाद्या छत्राच्या प्रत्येक भागास आधार, फक्त मधील एक **यष्टि**, त्याचप्रमाणें, आपल्या तिघांच्याही दुःखास कारण, अगदीं एक ! आणि तें दुसरें कांहीं नसून फक्त—

**राजा**—( **तारा** व **राणी** या उभयतांचा उजवा हात एकावर एक ठेवून, त्या दोन्ही हातांवर आपल्या उजव्या हातानें टाळी मारतां मारतां ह्मणतो ) तेवढें तें **व्यंग** ! ! !

**तिघें**—( मंदस्मित )

**तारा**—बाईसाहेब ! मला कि नाहीं येथें हंसावें कीं रडावें, तेंच समजत नाहीं !

**राणी**—आणि समजतें आहे कोणाला ?

**राजा**—आणि माझी तरी स्थिति काय ? तीच. मिळून तात्पर्य हेंच कीं, आपण तिघेंही, आतां एकजीव व एकरूप बनलों आहों !

**राणी**—महाराज ! मी तर असें ह्मणतें, आपले हे तीन देह

मात्र वेगवेगळे दिसत आहेत, पण जर का कोणी **दिव्यदृष्ट** असता, तर तो खात्रीनें सांगता कीं, तिघांचें अंतःकरण एक आहे !

**तारा**—महाराज ! मला तर असें वाटतें. ज्याप्रमाणें **श्रीफळ,** ह्मणजे नारळ नांमे फळास ब्राह्यतः तीन शिरा दिसतात मात्र, पण फळ एकच; त्याचप्रमाणें, आपण तीन मूर्ति दिसतों मात्र, पण अंतःकरण निःसंशय अगदीं एक आहे !

**राजा**—अहाहा ! प्रियांनो ! या तुमच्या भाषणानें, मला जो अत्यानंद होत आहे त्याचें वर्णन करण्यास मी खरोखर असमर्थ आहें ! आतां आपणा उभयतांस माझी इतकीच विनंति आहे कीं, आपण उभयतां परस्परांशीं याचप्रमाणें प्रेमभावानें वागावें.

**राणी**—सरकार ! एकवेळ सप्तसमुद्र आटतील, पण मला जीवदान देणाऱ्या साध्वी **तारेला,** मी कधींही अंतर देणार नाहीं ! **तारा** माझा प्राण आहे !

**तारा**—आणि सरकार ! मीही हेंच ह्मणत्यें, "आपणां उभयतां करितां, **मी** माझ्या या देहाचे, तिळातिळा येवढे तुकडे करून देण्यासही तयार आहें !

**राजा**—( स्वगत ) देवा, आतांपर्यंत माझ्या मनाला जितकें दुःख झालें, तितकेंच किंवहुना त्याहून जास्त प्रमाणानें, या दोघींच्या आतांच्या भाषणानें, माझ्या मनाला सुख होत आहे ! पण काय ! हें **सुख** व **दुःख** मिळून दोन्हीही धर्म, एका मनाचेच ! अर्थात् नाशवंत ! असो. पण आतां आपल्या मुख्यकर्तव्यास विलंब करतां नये.

( उघड ) प्रियांनो ! माझ्या दुर्दैवामुळें, तुह्मां उभयतांना सारा जन्म दुःखांत काढावा लागला ! परंतु यांत कोणाचाच उपाय नाहीं ! असें त्रिवर्गांमध्यें, आतांच ठरलें आहे. कारितां, तीच गोष्ट पुनः पुनः बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, यास्तव आतां पुढील व्यवस्थेस लागलें पाहिजे.

**तारा**—महाराज ! कोणती बरें पुढील व्यवस्था ?

**राजा**—**तारे**,या माझ्या **प्रियेची**, पुत्रशोकामुळें कशी स्थिति झाली आहे, हें दिसतच आहे! बरें, ही उणीव पुढें मार्गे भरून येईल, अशी दुर्दैवानें आशाही करावयास नको ! बरें, असेंच स्वस्थ राहावें, तर पुढें **राज्याची** वाट काय ? **कोणी वारस** नसल्यास राज्याची दुर्दशा होईल. आतां कसें करावें, ही मला फार मोठी चिंता लागली आहे.

**राणी**—सरकार ! आपल्या राज्यास मागें कोणी **वारस** तर पाहिजे, आणि रात्रंदिवस माझें हृदय विदारण करणारी **कृत्या**, ती हीच.

**राजा**—पण आतां गतगोष्टीचा शोक करून काय उपयोग ? ईश्वरी संकेतानुरूप सर्व कांहीं घडत असतें. पण पुढें आतां कसें करावें ?

**तारा**—महाराज ! मला या कामीं असें वाटतें कीं, कोणी एखादा चांगला **राजपुत्र** पाहून **दत्तक** घ्यावा.

**राजा**—पण इतक्यांत दत्तक तरी कसा घ्यावा ? लोक म्हणतील इतक्यांत दत्तक घेतला. राजा राणी अगदींच वृद्ध झालीं कीं काय ? आमची आंतली कर्मकथा लोकांना काय ठाऊक ?

**तारा**—महाराज, त्याचें सोडा ! सांगतां येईल कांहीं तरी !

**राजा**—काय ?

**तारा**—घरांत मूलबाळ नाहीं, यामुळें, राणीसाहेबांची प्रकृति दिवसेंदिवस बिघडत चालली. याकरितां घेतला मुलगा **दत्तक.**

**राजा**—हो, ही आहे खरी एक युक्ति ! बरें ! मुलगा दत्तक घ्यावा हें ठरलें. पण आतां तो कोणाचा घ्यावा ?

**तारा**—महाराज, असें काय करितां ? आपले एवढे **मांडलिक** आहेत, त्यांतून कोणाएकाचा चांगला पाहून घ्यावा, झालें. आपण मुलगा घेतां हें समजल्यावर ते उलटे पायां पडतील !

**राणी**—सरकार मला असें वाटतें, आपल्याला योग्य वाटेल

तेंच करा. पण माझ्या मनांत जी कल्पना आली ती महाराजांपुढें मांडित्यें.

**राजा**—ठीक आहे, बोल, हें काम तुह्मां उभयतांच्या संमतीनें होईल तितकें फार चांगलें !

**राणी**—महाराज ! आह्मांला आमच्या दृष्टीनें बरा वाटेल, तो मुलगा आह्मीं घेऊंच, पण त्याचें आयुर्मान व गुण, पुढें कसे निपजतील, तें आपल्याला आज कसें समजणार ? याकरितां, माझ्या मतें, **श्रीजगदंबेवर** भरंवसा ठेवून, एका हत्तीच्या शुंडेंत **रत्नहार** द्यावा ! तो, ज्याच्या गळ्यांत तो घालील, त्यालाच दत्तक घ्यावा, असें मला वाटतें.

**तारा**—वाहवा ! बाईसाहेब, आपली मसलत मला फारच मानवते ! योजना अगदीं नामी आहे! कारण, यांत **श्रीजगदंबेवर** सर्व भरंवसा! ती जें करील, तें योग्यच असणार! कारण तिला सहस्रनेत्र आहेत ! तिजपुढें आमची दृष्टि तुच्छ आहे !

**राजा**—तुह्मां दोघींसही, ही योजना पसंत आहेना ?

**तारा**—हो ! आह्मांस तर हेंच योग्य वाटतें !

**राजा**—बस्स, झालें तर. असेंच करावयाचें ! आणि तें उद्यांच्या उद्यां करावयाचें !

**राणी**—त्याची इतकी घाई कशाला सरकार ?

**तारा**—सवडीनें सावकाश केलें ह्मणून काय हरकत आहे? करावयाचें ह्मणून ठरलें, मग आतां काय ? पाहिजे तेव्हां करितां येईल ! कोणा दुष्ट वेळेवर तो सर्पदंश झाला त्या दिवसापासून, स्वारीच्या जिवास क्षणभर स्वस्थता ह्मणून कशी ती नाहीं ! सरकार ! आपल्याला हल्लींच्या हल्लीं, मानसिक त्रास फारच झालेला आहे, याकरितां हा विचार, माझ्यामतें अमळ स्वस्थपणें करावा. कसें बाईसाहेब ?

**राणी**—**तारे** ! तुझें ह्मणणें रास्त आहे. पण सरकारच्या मर्जीविरुद्ध कसें बोलावें ?

**राजा**—प्रियांनों! मी तुम्हां उभयतांच्या म्हणण्याप्रमाणें तसेंही केलें असतें. पण कांहीं विशेष कारणामुळें, मी तें उद्यांच्या उद्यां करणार.

**राणी**—असें विशेष कारण कोणतें, तें आम्हांस कळविण्यासारखें आहे का?

**राजा**—हो हो! पण प्रिये, तें आजच नाहीं सांगतां येत. तथापि, तुझां उभयतांना मी तें अवश्य सांगेन बरें. दुसरें!

**तारा**—दुसरें आणखी काय?

**राजा**—आणखी एक काम उद्यां आहे. त्या दुष्ट **प्रधाना**ला हुकूम दिल्याप्रमाणें, तो हद्दपार तर झालाच असेल. त्याच्याजागीं कोणाची योजना करावी ?

**राणी**—सरकार! या कचेरीच्या गोष्टींत आह्मांला काय कळतें? आपल्या मर्जीला येईल, त्या योग्य पुरुषाची आपण योजना करावी.

**राजा**—तारे ?

**तारा**—महाराज! यांत मी काय सांगूं? जशी आपली मर्जी! जेणेंकरून राज्यव्यवस्था उत्तम चालेल, असें करावें, ह्मणजे झालें.

**राजा**—शाबास! हें उत्तर सतरा आणे खरें! (हंसत हंसत राणीस) कां, कसें काय आहे **तारेचें** मत ?

**तारा**—(सास्मित) तर बाई, मी आणखी काय सांगूं?

**राजा**—बरें ऐका. आपल्या कचेरींत **दौलतराव सरदेसाई** ह्मणून एक, सरकारी जामदारखान्यावर मीं हल्लींच नेमलेला मनुष्य आहे. ही जागा, मीं त्याला त्याच्या आंगच्या सद्गुणावलोकनावरून दिली आहे. याशिवाय, त्यानें हल्लींच, त्या अग्निप्रलयसमयीं तर आपल्या स्वामिभक्तीची पराकाष्ठा करून दाखविली! त्यास कोणा बोलाविलें नसतांही, ही बातमी लागतांच, आपण होऊन राजवाड्याकडे धांवत आला! व अग्नीचा भडका चालला असतां, ज्याकडे पाहणेंही भयंकर, त्या अग्नीच्या ज्वालांत जिवावर उदार होऊन त्या **तान्ह्या**कारितां आंत शिरला!

**राणी**—काय ह्मणतां ! तर मग, महाराज मला बरोबर आठवतें! "भिऊं नका बाईसाहेब" असें ह्मणून, एक पुरुष गर्दीतून "बाजू, बाजू" ह्मणून ओरडत, आंत शिरला होता खरा. तो हाच नसावा ना ?

**राजा**—हो, तोच तो ! पण आमच्या दैवबलानें, तो **तान्हुला** अग्निनारायणाच्या भक्षस्थानीं पडला ! त्याला तो काय करणार ?

**राणी**—त्याला त्या बिचाऱ्याचा काय इलाज ? पण त्यानें आपली स्वामि-कार्य-दक्षता जिवावर उदार होऊन दाखविली, यांत संशय नाहीं.

**तारा**—तर मग सरकार ! त्याचीच या कामीं योजना करावी. ह्मणजे इतर लोकांसही वाटेल कीं ह्या राज्यांत **सद्गुणाला** किंमत आहे. तेव्हां आपणही सद्गुणसंपन्न झालें पाहिजे !

**राजा**—बरोबर आहे. राज्यांत खऱ्या खोट्याची परीक्षा झाल्या-शिवाय तें चालेल कसें ! शिवाय, सदर **दौलतराव** हे चांगले पोक्त अनुभवी, दूरदर्शी व पक्के पापभिरू आहेत. याकरितां त्यांचीच याजागीं नेमणूक करावी, असें माझें मत आहे. आपणां उभयतांचेंही मत तसेंच आहेना ?

**राणी**—प्राणनाथ ! आतां प्रत्येक काम आमच्याच मतानें का व्हावयाचें ?

**राजा**—हो ! प्रत्येक महत्वाचें काम, मी आपणा **दोघींच्या** मताबाहेर करणार नाहीं !

**राणी**—खचीत ?

**राजा**—खचीत.

**तारा**—द्या वचन !

**राजा**—घ्या. ( दोघींचा हात एकत्र करून ) वचन! मी प्रत्येक महत्वाचें काम, तुह्मां **दोघींच्या** विचारानें करीन ! आतां तुह्मींपण उभयतांनीं मला असेंच वचन दिलें पाहिजे !

**दोघी**—आम्हीं पण प्रत्येक काम आपल्या विचारानेंच करूं! ( वचन देतात. )

**तारा**—बरें महाराज! आतां मला घरीं जाण्याला आज्ञा असावी.

**राणी**—आणि हें नव्हेका घर ? कांहीं नाहीं! यानंतर जन्मभर आपण उभयतांनीं जेवणखाण, बसणें उठणें, निजणें सवरणें वगैरे सर्व **एका** जागीं करावयाचें! महाराजांसमोर सांगतें आहें.

**राजा**—का ? प्रिये **तारे**, यांत तुला काय नड आहे ? मला तुझीच काळजी जास्त वाटत आहे. ही आपली **राणी** आहे! साऱ्या राज्याची मालकीणच आहे! पण मागें पुढें तुझी अव्य-वस्था होण्याचा संभव! म्हणून म्हणतों, तुझी कशी काय सोय करून तुला दिली पाहिजे ? तूं सांगशील त्याप्रमाणें तुझी कायमची सोय करून, त्या हुकुमाचा **सरकार दप्तरींही** दाखला ठेवतों.

**तारा**—( स्वगत ) आई, **जगदंबे**! काय तुझी ही मज-बद्दलची तजवीज! तूं बोलल्याप्रमाणें अक्षरशः घडून येत आहे! आतां तूं सुचविल्याप्रमाणेंच, ह्यांजपाशीं मागून घेतें! बाकी माझ्या अन्नवस्त्राची व्यवस्था, ह्यांजकडून झालीच आहे. ( उघड ) महाराज! मजबद्दल सरकारकागदीं, काय व्यवस्था करून ठेवण्याचा सरकारचा मानस आहे ?

**राजा**—तूं सांगशील ती व्यवस्था करणार.

**तारा**—पण महाराज! आपण उभयतांनीं, माझा सर्वप्रका-रचा भार जन्मभर घेण्याचें आश्वासन दिलें, तर आणखी मला काय पाहिजे ?

**राजा**—तें तर झालेंच! पण त्याबाहेर आणखी तुझी काय इच्छा आहे ?

**तारा**—पण महाराज! आपली काय इच्छा आहे ती तर कळूंद्या.

**राजा**—माझ्या मनांत, तुला एक **गांव** बक्षीस देऊन टाकावा,

असें येतें. हीही देणगी, तुझ्या सत्कृतीस पुरेशी नाहीं, पण उगीच यादगिरीसाठीं !

**राणी**—सरकार ! मला वाटतें, आणि त्या गांवाचें नांव, **तारापूर** असें ठेवावें !

**राजा**—शाबास ! बरोबर आहे ! तर तसेंच करायचें ! काय यावर तुझें ह्मणणें ?

**तारा**—सरकार ! मला ही एवढी मोठी देणगी, माझ्या योग्यतेच्या बाहेर झाली ! तथापि, ज्याअर्थी आपण कृपा करून, ती देण्याचें ठरविलें आहे. त्याअर्थी, मी त्यास संमति देतें.

**राजा**—ठीक, आणखी काय तुझें मत आहे ?

**तारा**—माझी त्या संबंधानें अशी इच्छा आहे:—

१—त्यां गांवाच्या उत्पन्नावर, एक कलाकौशल्याचा, मोठ्या प्रमाणावर **कारखाना** काढावा.

२—व त्या कारखान्याच्या फायद्यावर सर्व गोरगरिबांच्या मुलांस, अन्नवस्त्र देऊन, सक्तीनें **फुकट** सुशिक्षण देण्याची तजवीज करावी.

**राजा**—वाहवा ! ( राणीस ) प्रिये ! पाहिलीसका कशी दूरदर्शीपणाची मागणी आहे ती ? ह्मणजे, याच्यायोगें, आपल्या राज्यांत व्यापार व कला–कौशल्य यांची कधींच वाण न पडतां, सर्व प्रजा सुशिक्षित व्हावी ! शाबास **तारे** ! या तुझ्या मागणीमुळें, मी तुला देणगी दिली, असें न होतां, **तूंच** या राज्याला ही लोकोत्तर **देणगी** दिलीस, असें होत आहे ! असो, **तारे** ! आणखी काय इच्छा आहे ?

**तारा**—महाराज ! सदर उत्पन्नांतील एक अष्टमांश भाग, दरसाल **श्रीदेवीजगदंबेच्या** उत्सवास मिळण्याची तजवीज व्हावी.

**राजा**—शाबास ! ठीक आहे. शिवाय आणखी काय इच्छा आहे?

**तारा**—कांहीं नाहीं.

**राजा**—ठीक आहे. प्रियांनो,तुम्हीं येथेंच असा. मी पुढील तज-वीज पाहतों. ( राजा जातो. )

**राणी**—गडे **तारे**, चल आपणही जाऊं. कारण हें पहा उजाडत आलें. प्रातर्विधि उरकून घेऊं.

**तारा**—चला बाईसाहेब ! ( सर्व जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश १९ वा.

### दौलतरावांचा वाडा.

**विजय**—( रत्नजडित मुक्ताहार घातलेला ) आई ! आई ! हें पहा, माझ्या गळ्यांत काय तें !

**आई**—( चकित होऊन ) अग बाई ! हें काय ! अरे काय बाबा हें कोठून विघ्न आणिलेंस घरीं ?

**दौल०**—( बाहेर येऊन ) अरे, कायरे हें ! ( स्वगत ) **हार** फारच मौल्यवान् दिसतो ! कोठून बरें आणला असावा यानें हा ! ( उघड ) अरे बाबा, कोणाचा चोरून बिरून तर आणला नाहींसना ?

**विजय**—काय ? चोरून ? बाबा असें मला कांहीं तरी बोलूं नका बरें !

**दौल०**—तर कोणीं रे दिला तुला हा ?

**विजय**—कोणी ह्मणजे ? **हत्तीनें** !

**दौल०**—काय ! हत्तीनें ? चल मूर्ख कुठला ! **हत्ती** तुझ्या-बरोबर बोलतो वाटतें ?

**विजय**—बाबा ! खरोखरच, मी सोबत्यांशीं माझ्या तिरकम-ठ्यानें खेळत असतां, एक मोठा हत्ती धांवत धांवत येऊन, त्यानें आपल्या शुंडेनें **हा मुक्ताहार** माझ्या गळ्यांत घातला !

**स्त्री**—प्राणनाथ ! काय म्हणतो आहे हा ?

**दौल०**—काय समजत नाहीं. अरे बाळा ! खरें सांग काय तें !

कोणा सावकाराच्या मुलाच्या गळ्यांतला काढून घेऊन आला आहेस तर सांग. मी आपला त्याचा नेऊन देतों, व त्याच्या वडिलांची क्षमा मागतों.

**विजय**—बाबा ! खरोखरच एका सुंदर श्रृंगारलेल्या हत्तीनें माझ्या गळ्यांत हा **हार** घातला !

**स्त्री**—प्राणनाथ ! हा इतक्या निग्रहानें पुनः पुनः तेंच सांगतों आहे, तेव्हां यांत कांहीं तरी तथ्यांश असला पाहिजे.

**दौ०**—हो; कदाचित् असें संभवतें. बरें, पण **विजया**, तुझे ते सोबती कुठें आहेत ?

**विजय**—बाबा ! ते केव्हांच पार झाले ! मी तो **हत्ती** मजकडेसच येतो आहेसें पहातांच, तो काय करतो हें पहाण्याकरितां तिरकमठा घेऊन तसाच त्याजकडे पहात उभा राहिलों होतों.

**दौल०**—मग, त्यावर तीरबीर कांहीं सोडलास कीं काय ?

**विजय**—बाबा ! तो जर त्वेषानें येता, तर खास त्याचा डोळाच फोडला असता ! पण तो मला फार सौम्य वृत्तीचा वाटल्यावरून मी स्वस्थ उभा होतों.

**स्त्री**—प्राणनाथ! आपल्याला काय संभव वाटतो ?

**दौल०**—मला वाटतें, हा राजवाड्यांतून निघाला असावा. व येतांना, वाटेंत कोणीं **श्रीमति**, आपल्या मुलास श्रृंगारीत असतां, कांहीं खाण्याची वस्तु समजून, तिच्या हातांतला हा हार त्या हत्तीनें पळवून आणला असावा. हत्ती श्रृंगारलेला होता असें हा ह्मणतो, यावरून तो राजवाड्यांतलाच असला पाहिजे. करितां राजवाड्यांतच जाऊन चौकशी करून येतों. तेथें सर्व तपास लागेल.

**स्त्री**—हो, महाराज, मलाही हेंच बरें वाटतें.

**दौल०**—( जाण्यास निघतो. )

( तोंच स्वतः **राजा, मंगल वाद्यें, शिबिका, छत्रचामरादि राजभूषणें, वस्त्रालंकार**, यांसह मोठ्या समारंभानें मंडळीसह येत आहे. त्यास पाहतांच दचकतो, व साश्चर्य स्वगत. )

हे **भक्तकामकल्पद्रुमा** ! हा काय चमत्कार आहे ! मला तर यांत कांहींच समजत नाहीं, परंतु इतकी गोष्ट खरी, कीं तुझी लीला मोठी अगम्य आहे ! तूं क्षणार्धांत **रावाचा रंक** किंवा **रंकाचा राव** बनविण्यास समर्थ आहेस ! **विजयाचें** सांगणें, व या समारंभा-निशीं स्वतः महाराजांचें येणें, यांचा परस्पर कांहीं संबंध आहे कीं काय, तोही तुझा तुला ठाऊक! बरें,पण ही सर्व मंडळी तर आपल्या-कडेसच येण्याच्या रोखांत दिसते ! करितां, अगोदर घरीं जाऊन बैठक वगैरे सिद्ध करवावी ! ( पळत पळत घरीं येतो. ) अग ए ! इकडे ये, इकडे ये, अगोदर ! कोठें आहेत ते नोकर लोक ? गेले कोठें ?

**नोकर**—महाराज ! मागच्या बाजूस कामावर होतों.

**स्त्री**—महाराज ! काय गडबड आहे ?

**दौल०**—अग ! **सरकार स्वारी** स्वतः समारंभानिशीं इक-डेसच येत आहे. करितां, लवकर अगोदर बैठकीची सिद्धता होऊंदे.

**स्त्री**—ठीक आहे. मी सर्व तयारी करून ठेवत्यें. आपण **महा-राजांस** सामोरे चला.

**दौल०**—( गडबडीनें परत जातो. )

**स्त्री**—( नोकर लोंकांकडून बैठकीची सिद्धता करविते. पड-द्याच्या आंत. )

**दौल०**—(सामोरा जाऊन **राजास** नमन करितो, व अत्यादर-पूर्वक सर्व समारंभ आपल्याकडे आणून सर्वांस यथोचित स्थळीं बसवितो. )

**राजा**—**दौलतराव** ?

**दौल०**—( लीनतापूर्वक नमस्कार ) **सरकार** !

**राजा**—मी या संपूर्ण समारंभानिशीं येथें कशाला आलों आहे, समजलें काय ?

**दौल०**—सरकार, तें मला कशानें कळणार ? आजच्या या

समारंभासंबंधी हुकूम वगैरे काल संध्याकाळपर्यंत राजसभेंत कांहींच नाहीं.

**राजा**—तें बरोबर. हा बेतच मुळीं रात्रीं ठरला. बरें, पण आज ही कांहींच गोष्ट तुमच्या कानीं आली नाहीं ?

**दौल०—महाराज** ! नाहीं ह्मणावयाला आज एक अगदीं नवी गोष्ट घडलेली, आतांच माझ्या अवलोकनांत आली ! आणि तिच्या संबंधी खुलाशाकरितांच, मी आतां सरकार कचेरींत निघालों होतों. तों खुद्द **सरकर स्वारीच**, गरिबाच्या झोंपडींत येऊन, तिला आपल्या चरणधूलीनें पावन करित आहे !

**राजा**—बरें पण ती अगदीं नवी गोष्ट ती कोणती ?

**दौल०**—महाराज. जा बाळा, **विजया** ! महाराजांस अगोदर नमन करून ये.

**विजय**—( नमन करून पुन्हां बापाजवळ बसतो. )

**दौल०**—माझा मुलगा हा **विजय**, आपल्या खेळगडी मंडळींतून गळ्यांत हा अमोलिक **मुक्ताहार** घालून, आनंदानें नाचत बागडत घरीं आला ! व " मला हत्तीनें **हार** घातला, " ह्मणून परत परत मोठ्या उल्हासानें, ही एकच गोष्ट आह्मां उभयतांस सांगूं लागला ! पण याच्या या बोलण्याचा अर्थ आह्मांतून एकासही समजेना, ह्मणून राजवाड्यांतील हत्ती कदाचित् मस्त होऊन सुटला असेल, व त्यानें हा **हार**, खाण्याचा पदार्थ समजून, राजवाड्यांतून पळवून आणला असेलसें वाटल्यावरून, खरा प्रकार काय आहे, तो समजून घेण्याकरिता, ह्याच निघालों होतों, सरकार ! **महाराज**, याहून मला कांहींच माहिती नाहीं.

**राजा—दौलतराव** ! सर्व कल्पना ठीक आहेत, पण त्या मस्त हत्तीनें पळवून आणलेला **हार**, बाकी सर्व खेळगड्यांस वगळून टाकून, तुमच्या **विजयाच्याच** गळ्यांत घातला, याच्यावर आपण काय कल्पना बांधली ?

**दौल०**—सरकार ! जनावराचें काय ? खाण्याची वस्तु नव्हे ह्मणून समजतांच, कोठें तरी दिली असावी फेंकून !

**राजा**—तसें मानलें तरी, ती फेंकून दिलेली **रत्नमाला** याच्याच गळ्यांत बरोबर कशी पडली ?

**दौल०**—( मृदुस्मित स्तब्ध होतो. )

**राजा**—**दौलतराव** !

**दौल०**—( नमून ) **सरकार** !

**राजा**—आह्मांवर हल्लींच्या हल्लीं, जे दुःखप्रसंग गुदरले, ते आपल्याला माहितच आहेत. एका प्रसंगीं तर आपण आपल्या धाडसाची कमालच करून दाखविली ! तथापि आह्मांस दुर्दैवानें सोडलें नाहीं ! त्यामुळें आमच्या **राणी**सरकारची तब्यत बिघडत चालली आहे. क्षणोक्षणीं मुलांची आठवण करून, डोळे सुजवून घेत आहे ! याकरितां, मी गेल्यारात्रींच एकदम ठरविलें कीं, मुलगा दत्तक घ्यावयाचा. आणि त्या प्रमाणें, आज प्रातःकाळीं, सर्वांचीं मंगल स्नानें आटोपतांच, **श्रीजगदंबेचें** स्मरण करून, गजशाळेंतून एक शांत स्वभावी हत्ती आणून, तो उत्तम शृंगारविला. व त्याचे शुंडेंत हा रत्नजडित **मुक्ताहार** देऊन त्यास गांवांत सोडून दिलें. मागून **हेर** होतच. हत्तीनें आपल्या **विजयाच्या** कंठांत **रत्नहार** घातलेला पाहतांच, **हेरानें,** आह्मांस तावडतोब वर्दी दिली. राजवाड्यांत सर्व तयारी होतीच. वर्दी पोंचतांच, सर्व समारंभासह हा मी येथें आलों आहें.

**दौल०**—महाराज ! पण इतक्यांतच दत्तक संबंधी विचाराची इतकी घाई कशाला ! देवदयेनें होईल लवकरच पुत्रसंतति !

**राजा**—होईल तेव्हां होईल ! झालीच तर तिला कोणी फेंकून का देणार आहे ? पण होईल, एवढ्याच आशेवर, **राणी**साहेबांना क्षणोक्षणीं दुःखांत असलेल्या पहावत नाहीं. याकरितां, मी हा विचार ठरविला आहे. मग आपलें मत कसें काय ?

**दौल०**—महाराज ! यांत विचार कशाचा ? अशा प्रकारचा

**महद्भाग्य योग** घरीं चालून आला असतां, तो लोटून देणारा, असा जगांत कोणी तरी मूर्ख असेल का? पण **सरकार**! मला जरा घरांत जाऊन येण्याला परवानगी असावी.

**राजा**—हो हो ! अवश्य. घरांतला विचार प्रथम घेतला पाहिजे.

**दौल०**—( घरांत जाऊन ) काय **प्रिये** ! कसें करावयाचें ?

**स्त्री**—महाराज ! यांत विचार करावयाचें काय आहे ? या राजधानींत आपण पहिल्यानें आलों, तेव्हां अन्नवस्त्राचेही हाल होते, पण परमेश्वरानें कृपा करून, आपल्याला राजकचेरींत जागा मिळवून दिल्या दिवसापासून, त्यांतून मुक्तता झाली ! आतां, त्याच्या मनांत आह्मांला याहूनही सौख्यराशीवर बसवावयाचें आहे. तर त्याला आपण होऊन आड येणें, ह्मणजे याहून दुसरा **अविचार** तो कोणता ? पण—

**राजा**—आणखी, पण, तें काय ?

**स्त्री**—पण, आपण पुनः उघडीं, तीं उघडीं !

**दौल०**—हो ! इतक्याच करितां मी तुला विचारावयाला आलों.

**स्त्री**—प्राणनाथ ! आपण आतां या शुष्क मोहांत पडून मुलाचें जें जन्माचें कल्याण होत आहे, त्याला **आह्मीं** आड आलों, असें होईल. अर्थात् आह्मांला याबद्दल **महद्दोष** लागून, शिवाय महाराज सरकारची आपल्यावर अवकृपाही होण्याचा संभव ! याकरितां कबूल करावें हेंच उत्तम.

**दौल०**—बरोबर आहे, मग करूंना कबूल ?

**स्त्री**—हो ! अगदीं बेलाशक.

**दौल०**—( घरांतून राजासन्मुख येतो. )

**राजा**—काय **दौलतराव** ! कसें काय ठरलें ?

**दौल०**—सरकार, ठरवावयाचें काय त्यांत ? जशी महाराजांची इच्छा !

**राजा**—मग इतका वेळ कसा लागला आपल्याला ?

**दौल०**—नाहीं, स्त्रीजातीला मुलाचा मोह विशेष असतो !

**राजा**—**दौलतराव** ! ती गोष्ट माझ्या लक्ष्यांत आहे. तुमच्या व तुमच्या मुलाच्या परस्पर संगतींत, यत्किंचितही व्यत्त्यय होऊं नये, अशी मी बरोबर तजवीज योजिलेली आहे ! त्याबद्दल काळजी नसावी.

**दौल०**—झालें तर ! महाराजांचें प्रत्येक काम, विचारपूर्वक केलेलें असतें, हें मी सरकारच्या आश्रयास राहिल्या पासून पहात आहें. करितां, मला आतां कोणत्याही गोष्टीची काळजी नाहीं. जशी महाराजांची इच्छा, तसें व्हावें.

**राजा**—ठीक, तर मग उभयतांहीं **विजयास** इकडे आणावें.

**दौल०**—( बायकोस ) इकडे बाहेर ये पाहूं !

**दौ० स्त्री०**—( दोघें दोन हातांला धरून ) बाळा ! **विजया** ! हे पहा ! आपले सरकार ! तुला आपल्याकडे नेण्याला, ही **पालखी** घेऊन आले आहेत !

**विजय**—( मुजरा करून ) होय का **सरकार** ? पण मला आपण कसल्या कामावर नेमणार ? मी तुमची ती **जामदारी** आणि **सुभेदारी** नाहीं करणार हो, अगोदरच सांगतों !

**राजा**—तर बाळा ! तूं कसली चाकरी करणार ?

**विजय**—महाराज ! **चाकरी** तर मी मुळींच नाहीं करणार !

**राजा**—तर ?

**विजय**—मी **राजा** होईन पाहिजे तर !

**सर्व**—( तोंडात बोटें घालितात साश्चर्य. )

**राजा**—ये बाळा ! मी तुला **राजाच** करितों. मग तर येशील ना आमच्या इकडे ?

**विज०**—हो, मग येईन. पण माझ्या **आईची** व **बाबांची** कांहीं चांगली सोय कराल ना ?

**सर्व**—( साश्चर्य ! )

**राजा**—बाळा ! काय तुझें हें शहाणपण ! पण हें तुला कोणीं रे शिकवून ठेवलें !

**विज०**—**महाराज** ! यांत शिकवून काय ठेवावयाचें ? मी पुढें **राज-धर्म** कसा पाळीन, हें पुत्रधर्मावरूनच ताडावयाचें !

**राजा**—ठीक. पण आतां तूं जर **राजा** होणार, तर त्यांची पाहिजे तशी सोय, **तूंच** कर.

**विज०**—महाराज ! मी करीन तेव्हां करीन. पण आज ती **आपणच** केली पाहिजे.

**राजा**—शाबास ! बाळा, ठीक आहे. ती ही योजना, मीं पूर्वीच करून ठेविली आहे, आतां तरी झालें ?

**विज०**—हो ! आतां खुशाल मला घेऊन चला !

**राजा**—( त्याला आपल्य मांडीवर बसवून घेतो, व स्वहस्तें **वस्त्रालंकार** घालतो. )

**दौल०**—महाराज ! याचें आपलें जेव्हां तेव्हां हेंच ! मला वारंवार ह्मणावयाचा ! " बाबा, तुह्मीं कसलें हें काम पतकरलें आहे ! मी तर साफ पतकरलें नसतें ! मी **राजा** होणार ! " असें दिवसभर ह्मणायचा !

**राजा**—**दौलतराव** ! त्याचें लक्षण तसेंच आहे. हीं पहा याच्या हातावर सर्व **राजचिन्हें** कशीं स्पष्ट दिसत आहेत ! मग तो **राजा** कसा नाहीं होणार ? त्याचें ह्मणणें बरोबरच होतें. ! शिवाय, त्या **हत्तीला** कोणीं शिकवून का पाठविलें होतें ? पहा ! **ईश्वरी** चमत्कार कसा असतो तो ! बरें, असो ! दुपारीं समारंभास यावयाचें. ( संन्यास ) **मंत्री** ! समारंभाची व्यवस्था बरोबर ठेवावी.)

**मंत्री०**—( आज्ञा सरकार ! )

**राजा**—बरें, ठीक आहे. ये बाळा, चल पालखींत बस !

**विज०**—सरकार थांबा ! अगोदर माझ्या आईला, व बाबांना **नमस्कार** करून येतों. ! (उभयतांच्या चरणीं मस्तक ठेवून) आई ! येतों बरें कां ! बाबा, येतों अँ ! ( डोळे पुसतो. )

**दौ० व स्त्री०**—(त्यास कुरवाळतात, चुंबितात, व डोळे पुसतात) ये बाळ ! परमेश्वर तुझें सर्व प्रकारें कल्याण करो !

**राजा**—ये, बाळा आतां ! बस या पालखींत ! ( त्याला पालखींत बसवितात. )

**मंत्री**—चला, सकळ सेवकजनहो ! लागा आपापल्या कामाला. ( तोंच सर्व समारंभ वाजत-गाजत जाऊं लागतो. )

**विजय**—आई ! येतों, बरंका ! बाबा, येतों. !

( सर्व समारंभ राजवाड्याकडे जातो. )

**दौल०**—**प्रिये** ! पाहिलंस, **हिरा** तो **हिरा** ! तो छपून कसा राहील ? काय पण ! त्या मुलाचें शहाणपण !

**स्त्री**—महाराज ! आमची हो त्याला इतकी काळजी घेण्याला कोणीं सुचविलें ? कोणी ह्मणेल, जसें काय शिकवूनच ठेवलें होतें ! त्यानें, राजे सरकारना बोलण्यांत कसें बांधून घेतलें पाहिलं ?

**दौल०**—प्रिये ! राजे सरकारनीं मजकडे पुष्कळदां बोलून दाखविलं आहे ! शिवाय, आज तर **विजया**कडे कबूलही केलें आहे. यावरून, ते आमचें, याहूनही काहींतरी जास्त कल्याण केल्याशिवाय खाचित राहणार नाहींत ! पाहूं आतां आज काय करितात तें!

**स्त्री**—पण प्राणनाथ ! ही गोष्ट खरी काय ?

**दौल०**—कोणती बरें ?

**स्त्री**—आजच सकाळीं, त्या सरसुभ्यांची बायको ह्मणत होती, कीं **प्रधान**जी कोठें मुलामाणसांसह रात्रींच्या रात्रीं गुप्त झालें ! व त्यांचा वाडा जळून खाक झाला आहे ! हे खरें काय महाराज ?

**दौल०**—होयका ? तेव्हांच, स्वारी कोठें आजच्या समारंभांत दिसली नाहीं ! मी समजलों, कांहीं प्रकृति वगैरे बिघडली असेल, ह्मणून आला नसावा. मग ती बातमी खरी असावी. गेला असेल कांहीं भक्कमशी चोरी करून पळून! तो तसलाच आहे ! जो तो त्याच्या नांवानें खडे फोडितो ! पण, वाडा जळला कसा ह्मणतात ?

**स्त्री**—कोण जाणे ? कोणी 'ह्मणतात **जळला**, कोणी ह्मणतात **जाळला**! पण इतकें खरें, कीं तो किंवा त्याचीं माणसें, आज गांवांत नाहींत !

**दौल**—प्रिये ? हा सर्वच प्रकार मोठ्या विलक्षण योगायोगचा दिसत आहे ! परंतु ह्यांत तूं एक गोष्ट सदैव ध्यानांत ठेव. ती हीच कीं, ही सर्व **परमेश्वरी कृपा** आहे. करितां, **त्यास निरंतर अनन्य भावें शरण जा.** शिवाय, दुसरी हीही एक गोष्ट ध्यानांत धर कीं, या संसारांतील बरी किंवा वाईट ही प्रत्येक स्थिति, **क्षणभंगुर** आहे, त्याचप्रकारें आपलें **आयुर्मानही** क्षणभंगुर आहे. याकरितां, तुला जरी याहूनही वैभव प्राप्त झालें, तरी आपल्या मनाची **समता** कायम ठेव. तें उच्छृंखल होऊं देऊं नको.

**स्त्री**—महाराज, बरोबर आहे ! मी सदैव आपल्या संगतींत असतां, ही गोष्ट कशी विसरेन ? बरं, महाराज ! त्या **जसवतीला** आतां आपल्याकडे आणून ठेवावी.

**दौल०**—मी तिला कालच पुनः भेटलों होतों, व तिनें उद्यांपासून आमच्या इकडे येण्याचें कबूल केलें आहे. बरं, चल आतां, भोजन आटपून राजसभेंत लवकर गेलें पाहिजे.

**स्त्री**—चलावें महाराज ! सर्व तयारी आहे. ( जातात. )

---

## प्रवेश १६ वा.

स्थळ—(**राजसभा.**)

**राजा**—मंत्रीजनहो ! आपण सर्व आपलीं कामें, यथान्याय करित असल्यामुळें, मला फार समाधान वाटत आहे ! याचप्रमाणें तुह्मीं तीं, परमेश्वराची भीति बाळगून, इमानें इतबारें करित चला ! आपण सर्व, या **राज्यप्रासादाचे स्तंभ** आहां ! हल्लींच मजवर जे एकावर एक, दुर्धर प्रसंग आले, ते आपणा सर्वांस माहितच आहेत ! त्यासंबंधानें, माझ्या मनाची कांहींएक निराळीच स्थिति झाली असल्या कारणानें, मी आज जी कांहीं तजवीज करण्याचें ठरविलें आहे, ती आपणा सर्वांस श्रुत करण्यासाठीं, मीं आज हा **दरबार** भरविला आहे. मला, आजच्या प्रसंगीं एक गोष्ट मात्र फारच वाईट वाटतें, ती ही कीं, आपले मुख्य **प्रधान** मुलामाणसांसह, रातोरात

कोठें नाहींतसे झाले आहेत ! शिवाय, त्यांचा वाडाही जळून खाक झाल्याचें समजतें ! त्यांच्या संबंधीं दोन अनुमानें निघतातः—

" एकतर, ते त्या प्रळयाग्नींत मुलांमाणसांसह जळून खाक झाले असावे, नाहीं तर, त्यांनीं सरकारी पैशावर तरी, चांगला हात मारला असला पाहिजे ! "

आसपास बराच तपास केला, तरी पत्ता नाहीं. ते सरकारी पैशाची बरीच अफरातफर करीत असल्याबद्दल, मजकडेही बरेचवेळां कागाळ्या आल्या होत्या. करितां तो जळून मेला असेल, तर योग्यच झालें ! आणि कोठें पळून गेला असेल तर त्यानें सरकारी पैशाची वगैरे अफरातफर केल्यामुळेंच, तो पळून गेला असला पाहिजे, असें मी ठरवितों. आणि ह्मणून मी त्यासंबंधानें ठराव करितों. ( मंत्री यांस ) **मंत्री**, लिहून घ्या.

**राजा—पहिला ठरावः**—या राज्याचे प्रधान, **आबासाहेब** मानकरी, हे सरकारी हुकुमा शिवाय, रातोरात कोठें नाहींतसें झाले आहेत. वरून, ते कांहीं तरी अफरातफर करून पसार झाले असले पाहिजत· असें आह्मांला वाटल्यावरून, त्यांच्या जागीं आमचे परम सन्मान्य, विश्वासू व स्वामिभक्तिपरायण जामदार **दौलतराव**, यांची कायम नेमणूक केली आहे !

( दौलतरावांस ) **दौलतराव** ! या, इकडे या ! हीं घ्या **प्रधानकी**चीं वस्त्रें भूषणें ! व आपल्या जागीं बसा या !

**दौल०**—( साभार स्वीकार करून बसतो. )

**२ दुसरा ठरावः**—मजवरील हल्लींच्या प्रसंगांत माझे दोन्ही **पुत्र** गमावल्यामुळें, पुत्रशोकानें, **राणी**साहेबांची प्रकृति दिवसेंदिवस बिघडत चालली आहे. तिच्या समाधानार्थ, मीं आज हा " **विजय** " नामें या **दौलतरावांचा** मुलगा, **दत्तक** घेतला आहे.

**३ तिसरा ठरावः**—या राजधानींतील **साध्वि तारांगना** हिनें, खरें अप्रतिम **पातिव्रत्य** कसें असलें पाहिजे, हें जगास आपल्या कृतीनें दाखविलें, इतकेंच नव्हे,पण शिकविलें! या तिच्या अमोलि-

क गुणाबद्दल आपल्या राज्यांतील '**मोरवी**' नामक गांव, तिच्यानांवावर निरंतरचा केला आहे. सदर गांवच्या उत्पन्नाचा अष्टमांश **श्रीदेवीजगदंबेच्या** उत्सवास दरसाल खर्च होऊन, बाकी सर्व उत्पन्नावर, एक कलाकौशल्याचा जंगी **कारखाना** काढून, त्याच्या फायद्यावर राज्यांतील सर्व गरीब मुलांस अन्नवस्त्र देऊन फुकट सुशिक्षण द्यावें. असें तिच्या इच्छेनुरूप आह्मीं ठरवितों. " **मोरवी** " गांवास यापुढें **तारापूर** हें नांव चालावें.

**४ चवथा ठरावः**—ज्या अर्थी, मजवर हे एकामागून एक विचित्र प्रसंग येताहेत, त्याअर्थी, मला माझ्या जीवित्वाची क्षणभंगुरता अधिकाधिक भासूं लागली आहे ! याकरितां, मी आजच या माझ्या **सिंहासनावर**, या माझ्या (त्यास जवळ घेऊन) **विजयास** अभिषिक्त करून, त्यास सर्व **राज्याचा** मालक करितों.

( त्यास गादीवर बसवून आपण खालीं बसतो. )

**५ पांचवा ठरावः**—सांप्रतचे बालराजे, **विजयराज महाराज**, हे अद्याप फारच अल्पवयी आहेत. करितां, ते चांगले वयांत येईपर्यंत, त्यास उत्तम राजशिक्षण देणें, व पोक्त विचारें सर्व राज्यकारभार हांकणें या दोन्ही गोष्टींचा पूर्ण अधिकार आह्मीं आमच्या खात्रीचे प्रधान, **दौलतराव** यांस दिला आहे.

झालें ! आजच्या दरबाराचें काम पुरें झालें आहे. आतां, आपणां सर्वांस माझी इतकीच विनंति आहे कीं, या आपल्या **बालराजाचें** उत्तम प्रकारें **संगोपन** करून, आपल्या सुकृतीनें आपलें व आपल्या राज्याचें नांव **अजरामर** करा.

( राजा उठतांच सर्व दरबार खलास होतो. )

( पडदा पडतो )

**तिसरा अंक समाप्त.**



# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—( राणीचामहाल. )

**राजा**—बाळा **विजया** ! झालेंना तुझ्या मनासारखें ?

**विज०**—होय महाराज ! माझ्या बाबांना आपण, चांगल्या प्रकारें **वर** आणिलें, बिचारे फार दगदगले होते !

**राजा**—बाळा ! कोण कोणास कांहींच देत नाहीं ! ज्याचे त्याचे **सद्गुणच** प्रत्येकास वर आणित असतात. आणि ह्मणूनच तुला मी चार शब्द सांगतों यांकडे लक्ष दे.

१—माझे प्रधान,हे तर तुझे वडिलच आहेत. त्यांस योग्य सन्मान देऊन त्यांच्या हितोपदेशाप्रमाणें वागत जा.

२—अद्याप तुझें वय फार लहान आहे. याकरितां, विद्यासंपादनाचें काम लक्षपूर्वक कर.

३—**मधास** जशा आळशी **माशा**, त्याप्रमाणें, **श्रीमंतीच्या** ठिकाणीं, **आपमतलबी** लोकांच्या झुंडीच्या झुंडी यावयाच्याच ! करितां, त्यांपासून सावध राहा.

४—**गरिबी**ही क्षणोक्षणीं किती दुःख देते, हें लक्षांत आणून, गरीब प्रजाजनांवर होईल तितकी **दया** करीत जा.

५—सर्व सृष्टिचक्र,एका **परमेश्वराच्या** इच्छेवर चाललें आहे. हें ध्यानांत ठेवून, कोणत्याही कृतीचा अहंकार न मानतां, सर्वकांहीं कर्ता करविता **तो** आहे, असें निरंतर मनांत ठेवून वागत जा.

या पांच गोष्टींस आपल्या अंतःकरणांत कायमचें स्थळ दे, ह्मणजे तुझें अक्षय **कल्याण** होईल !

**विजय**—महाराज ! आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे ! मी खात्रीनें सांगतों कीं, परमेश्वरी कृपेनें, मी आपलें नांव, सत्कीर्तीनें **उज्वल** करीन !

**तारा**—काय ? **विजयराज महाराज** ! इकडे या पाहूं !

**विजय**—( जवळ जाऊन ) काय सांगतां ?

**तारा**—आह्मां गरीब माणसांवर कृपा असावी !

**विजय**—आई ! कोणग ह्या ? (स्वगत) ओ हो ! चुकलों,(उघड) माझी आई आतां येथें कोठून असणार ?

**तारा**—कोठें आहे तुझी आई ?

**विजय**—ती **आपल्या** घरीं आहे !

**तारा**—आणि, हें घर कोणाचें ?

**विजय**—हें तात महाराजांनीं मला दिलें आहे !

**तारा**—आणि तुझे बाबा कोठें आहेत ?

**विजय**—तेही आपल्या वाड्यांत आहेत. ते उद्यां येतील कचेरींत आपल्या कामावर !

**तारा**—मग ह्या कोण ?

**विजय**—ह्या माझ्या **माईसाहेब** ! माई साहेब, कोण हो ह्या ?

**राणी**—इकडे ये. सांगतें कोण त्या ?

**विजय**—( राणी जवळ जाऊन ) सांगा. कोण हो या, माईसाहेब ?

**राणी**—( राजाकडे बोट करून ) तिकडे विचार जा !

**विजय**—**तातमहाराज** ! कोणहो त्या ?

**राजा**—( त्यास कुरवाळून ) त्या,तुझ्या **मावशी बाईसाहेब.**

**तारा**—मग काय ? राजेसाहेब, आह्मां गरीब माणसांवर मेहरबानी ठेवायची ना ?

**विजय**—लहानांवर वडिलांची **कृपा** असावी लागते ! ह्मणून **आपण, तातमहाराज,** व **माईसाहेब** या त्रिवर्गांची कृपा **मजवर** पाहिजे.

**तारा**—बरें आह्मीं त्रिवर्गांनीं तुजवर कृपा ठेवली, तर तिच्या मोबदला, तूं आह्मांवर काय ठेवणार ?

**विजय**—काय ह्मणजे ? **पूज्यबुद्धि** !

**सर्व**—( साश्चर्य. )

**तारा**—ती तरी ठेवशील का पण ?

**विजय**—महाराज ! या प्रश्नाचें उत्तर मी काय देऊं? पण इतकेंच सांगतों कीं, मी कधीं आपणा त्रिवर्गांच्या आज्ञेबाहेर जाणार नाहींच, पण जर आपल्या मनाविरुद्ध जाणारा दुसरा कोणी आढळला, तर त्यास **कडक** शिक्षा केल्याशिवाय कधींही राहाणार नाहीं!

**तारा**—हें खरें ना पण ?

**विजय**—मी श्रीदाशरथी रामा सारखा, **एकवचनी** होण्याचा प्रयत्न करित आहें !

**तारा**—ये बघूं तर ! मला एक पापा दे !

**विजय**—माईसाहेब देऊं का ?

**राणी**—हो, हो, देऊं ह्मणजे ?

**विजय**—( मुका घेते ) आणखी, आणखी एक, (ह्मणून आणखी एक दोन घेते ! )

**राणी**—आणि मला अगदींच कां विसरलास ?

**विजय**—नाहीं माईसाहेब ! आपल्याला कसा विसरेन ? ( तिजकडे जातो. )

**राणी**—( मुका घेते ! )

**राजा**—बरं बाळा ! चलजा आतां नीज. रात्र फार झाली.

**विजय**—आज्ञा ! ( तिघांसही क्रमानें नमस्कार करून जातो. )

**तारा**—देवा ! माझ्या बाळाचें कल्याण कर !

**राणी**—माझ्या बाळाला उदंड आयुष्य दे !

**राजा**—काय, प्रियांनो ! मुलगा कसा आहे ?

**राणी**—तो मुलगा नव्हे ? एक अमोलिक **रत्न** आहे, **रत्न** !

**तारा**—मला वाटतें, जर सुवर्णास **सुगंध** असता, तर तो सोन्याचाच पुतळा आहे, असें मीं ह्मटलें असतें! फार, फारच चांगला!

**राजा**—बरें प्रिये **तारे**, तुला राजसभेंतील आजची सर्व हकीगत कळलांच असेल !

**तारा**—( राणीस ) काय, बाईसाहेब ! आपल्याला कळली का कांहीं राजसभेंतील खबर !

**राणी**—मला कुठून कळणार ? मी का कचेरींत गेल्यें होतें ? मी येथें तुझ्या जवळ बसलें आहें.

**तारा**—घ्या ! महाराज, मला केलेल्या प्रश्नाचें उत्तर राणीसाहेबच स्वतः देताहेत !

**राजा**—समजलों, तुह्मी उभयतां येथें असल्यामुळें तुह्मांस कचेरींतील खबर कळणें शक्य नाहीं, असें ह्मणतां, होयना ? ठीक आहे. मी सांगतों ऐका.

१—पहिला—ह्या विजयाचे वडील, दौलतराव, ह्यांची प्रधानाच्या जागीं कायम नेमणूक.

२—दुसरा—विजयास दत्तक घेतला आहे.

३—तिसरा—" मोरवी " गांव या आमच्या **तारांगनेच्या** नांवें करून, त्याचें उत्पन्न श्रीदेवी, व कलाकौशल्याचा कारखाना यांस विभागून दिल्याबद्दल.

४—चौथा—**विजय** राजास राज्याभिषेक केल्याबद्दल.

५—पांचवा—**विजय** वयांत येईपर्यंत त्यास सर्व प्रकारचें सुशिक्षण देण्याचा व सर्व राज्यकारभार पहाण्याचा पूर्ण हक्क **दौलतराव** यांस दिल्याबद्दल.

असे पांच ठराव केले आहेत.

**तारा**—महाराज ! एक विनंति आहे.

**राणी**—माझीही एक आहे.

**तारा**—आपली येऊंद्या पुढें अगोदर !

**राणी**—नाहीं तूंच विचार प्रथम.

**तारा**—महाराज! आपले **पहिले** दोन ठराव योग्य आहेत. **तिसऱ्यांत** आपण आपली **उदारबुद्धि** प्रगट करून माझें नांव अजरामर केलें, याबद्दल आपले आभार आहेत. पण **चौथा** व **पांचवा** दोन ठराव मला पसंत नाहींत.

**राणी**—बरोबर; महाराज ! पहिले तीन ठराव अगदीं यथायोग्य आहेत ! पण पुढचे दोन्ही ठराव, **आज** करण्याचें कारण काय ?

**राजा**—कां ?

**राणी**—कां ह्मणजे ! आपण आज तरणेताठे राजे असतां, व **विजय** अद्याप अगदींच अल्पवयी असतां, त्यास एकदम राज्याधिकार देण्याचें कारण काय ? दत्तक घेतला, ठीक आहे.

**राणी**—शिवाय, त्यावर देखरेख ठेवणें, त्यास सुशिक्षण देणें, व त्याचे नांवें सर्व राज्यकारभार हांकणें-वगैरेचा पूर्ण हक्क, आजच प्रधानजीकडे सोंपविण्याचें काय अडून राहिलें होतें ?

**राजा**—माझ्या प्राणप्रियांनों ! आपल्या उभयतांपासून कोणतीही गोष्ट छपवून ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. शिवाय, ज्या अर्थीं, आह्मां त्रिवर्गीचीं परस्परांशीं **अभिवचनेंही** होऊन चुकलीं आहेत, त्या अर्थीं, आपणास खरी गोष्ट सांगणें जरूर आहे.

**राणी**—तर सांगा पाहूं; असें करण्याचें कारण काय ?

**तारा**—हें करणें, एखाद्या **पंचाण्णवद** वर्षांच्या जख्खड राजाला मात्र शोभलें असतें !

**राजा**—प्रिये तारे, मी आपणा उभयतांस इतकेंच सांगतों कीं, मी ही गोष्ट एका **महत्वाचे** कारणानिमित्त **मुद्दामच** केली आहे.

**तारा**—पण, महाराज ! तें कारण इतकें महत्त्वाचें असतां, आह्मांस न समजणें ह्मणजे, आपल्यावर **वचनभ्रष्टतेचा** दोष येऊं पाहणें, होय.

**राणी**—महाराज ! तें कारण आह्मांस समजलेंच पाहिजे. मला तर तारे, आतां **धडकी** भरल्यासारखें होतें आहे !

**तारा**—आणि हें काय ? ( घाम दाखविते. ) घामानें माझें हें सर्वांग भिजून चिंब झालें आहे ! दुर्दैवा ! आणखी का कांहीं पाठ पुरवावयाची राहिली आहे ?

**राणी**—सांगा महाराज ! क्षणाचाही विलंब करूं नका ! मी आपल्याला हात जोडून सांगत्यें !

**राजा**—( उभयतांच्या गळ्यांस मिठ्या घालून रडतो ! )

**दोघी**—( तें पाहून त्याही रडतात ! )

**राणी**—तारे ! खचित कांहीं तरी **दगा** आहे ग दगा !

**तारा**—( भिऊन ) मलाही बाईसाहेब तसेंच कांहीं लक्षण दिसतें हो ! ( रडते ) देवा ! आतां कायरे करूं ?

**राजा**—( उठून आवेशानें स्वगत ) हा मूर्खा ! **जीवराया !** धिक्कार असो तुला! अरे,तुला तुझा सखाबंधु **शिवराज**, यानें मुळापासून इतका उपदेश केला असतां, व तुला नको नको ह्मणत असतां, तूं एका मोहक स्त्रीला भुलून, सुखाच्या लालसेनें, या राजधानींत प्रवेश केलास ! तोही गोरगरिबाच्या स्थितींत नसून, **सार्वभौम** राज्यपदारूढ ! तेथें ही तुला कोणत्या जातीचें कसकसें सुख मिळालें, तें तूं स्वतः सर्व अनुभविलें आहेस. असें असतां मूर्खा ! पुनः मोहपाशांत पडून आपल्या **सर्वस्वाला** मुकणार काय ?

अरे, तूं या राज्यांत नानाप्रकारचे वस्त्रालंकार धारण केलेस, पण तो **रत्नालंकार**,तीं बहुमोल **वस्त्रभूषणें**,तो मनोहर **राजवाडा,** वगैरे सर्व राजलक्ष्मी नाशवंत आहे. या सर्वांची शेवटीं **अशी** राखरांगोळी होणार, ह्मणून प्रत्यक्ष तुला **श्रीअग्निनारायणानें** दाखविलें असतां, पुनः या **नाशवंत** वैभवास भुलणार काय ?

अरे ! तूं, राणी व तारांगना यांच्या हातचीं नानाप्रकारचीं उत्तमोत्तम पक्वान्नें सेवन केलीं, पण तीं आतां आहेत का? तीं सर्व **मळमूत्राच्या** रूपानें नष्ट झालीं नाहींत का? मग, ज्यांचा परिणाम शेवटीं **मळमूत्ररूप**, त्या पक्वान्नांस तूं भुलणार काय !

हें ह्यांचें मनोहर लुसलुसीत **तारुण्य,** व **सौंदर्य** तुला भुरळ घालीत आहे. पण यांत **रक्त,रेत,लाळ,मांस, मळ, मूत्र, अस्थि** व **चर्म** यां शिवाय दुसरें काय बरें आहे ? शिवाय **तारुण्य** ह्मणजे **दुपारची सावली** ! हें तूं विसरलास काय ?

आतां, कदाचित् या सार्वभौम राज्याला तूं भुलत असशील. पण तूंच विचार कर. आजपर्यंत ही भूमि **माझी माझी** म्हणून, कोटयवधि

राजे जमीनदोस्त होऊन गेले असतील! पण त्यांतून एकाच्याही सोबत ही गेलेली नाहीं! ही आपली आहे, तेथेंच आहे! मग ही तुझी कसली?

बरें, तें सौंदर्य व तारुण्य क्षणभर शाश्वत मानिलें, तरी तज्जन्य सुखाचा तुला नुसता गंध तरी आहे का? बरें तेंही असतें, तरी त्यांत पुढें काय काय हाल अपेष्टा आहेत याचा अनुभवध्वनि, नुकताच राणीसाहेबांच्या प्रसूतिकालीं, तुझ्या कर्णरंध्रांत घुसली नाहीं काय? असें असतां, विचारशून्या! पुनः मूढत्व! सावध हो! सावध हो!!

(उघड) प्रियांनो, उठा! रडत काय बसलां आहां! काय तुम्हाला वाटलें? सांगा बरें?

**राणी**—महाराज! आपली वृत्ति, आज कांहीं निराळी दिसत आहे. या वरून मला तर कसेंसेंच वाटत आहे!

**तारा**—सरकार! काय असेल तें खरें कारण सांगा. नाहीं तर ही पहा! मी येथल्या येथें माझ्या देहाची व्यवस्था लावीन!

**राजा**—प्रियांनो! मी सांगतों, पण मला तुम्हां उभयतांचेंही मोठें भय वाटतें.

**तारा**—तें कसलें?

**राजा**—तुम्हीं दोघीही फारच भित्र्या, व कोवळ्या मनाच्या असल्या कारणानें, मला तें कारण सांगवत नाहीं.

**राणी**—बरें, न सांगून तरी परिणाम बरा होईल, अशी आपली खात्री आहेना?

**राजा**—नाहीं. प्रिये, तीही नाहीं!

**तारा**—झालें तर मग! काय ठरतें शेवटीं?

**राजा**—सांगावें, असेंच ठरतें. पण—

**तारा**—पण बिण कांहीं नाहीं. सांगा तुम्ही!

**राजा**—पण तुम्ही अगोदर मला वचन द्या, कीं "आम्ही भिणार नाहीं!"

**तारा**—महाराज! आपण आह्मांकडून जितकी अधिकाधिक

बंदोबस्ती करून घेत आहां, तितकें उघडच ठरत आहे कीं, कांहीं भयंकर प्रसंग आहे.

**राणी**—आणि मलाही तेंच वाटतें. माझीही छाती, आतां नाना दुःखाघातांनीं बरीच टणक झाली आहे! सर्व सुख भरपूर भोगिलें! आतां मीही तेंच पहातें आहे! या जगांत असें राहाण्यापेक्षां, लवकर एकदां डोळे मिटतील, तर फार चांगलें!

**राजा**—ठीक आहे! काय तारे! सांगूंना?

**तारा**—महाराज! मी तर मृत्यूला मुळींच जुमानीत नाहीं!

**राजा**—( स्वगत ) आतां यांची छाती बरीच घट्ट झालेली आहे! ह्मणून आतां सांगण्यास कांहीं हरकत नाहीं. ( उघड ) इकडे या ( आपण मध्यें बसून दोघींच्या कानांत सर्व हकीगत सांगतो- )

**राणी**—( श्वास सोडून स्वगत ) अस्सें काय? तरच! "मी दिली होती परवानगी"? "मीं दिली होती"? "मीं दिली होती?" वगैरे ह्मणण्याचें झालें होतें!!

**तारा**—आणि मीही गांवभर हीच अवाई ऐकतें आहे, कीं, " पूर्वीचा स्वभाव, व हा स्वभाव यांत जमीन अस्मानाचें अंतर "!

**राणी**—पण प्राणनाथ! एवढेंच जर आहे, तर त्याबद्दल आजच इतकी भीति कसली?

**तारा**—तें तर या भूलोकीं, सर्वांच्याच वांटणीस शेवटीं आहे!

**राजा**—होय, पण तें अमुक वेळीं येतें, हें कोणाच्या ध्यानीं मनींहीं नसतें!

**तारा**—कां! ज्योतिषशास्त्रानें प्रत्येकाचें आयुष्य निश्चित समजतें!

**राजा**—होय, पण तशीं शेंपन्नास वर्षें असतीं, ह्मणजे इतकी घाई कोण करता?

**राणी**—काय? ह्मणजे आपण "अमुक काल" असा ठरवूनच का तिकडून आलां आहां?

**राजा**—ह्मणजे? ठरवूनच आलों आहें!

**तारा**—किती काल ठरविला आहे?

**राजा**—सावधतेनें ऐक, फक्त **पंचवीस** दिवस !

**राणी**—काय ? पंचवीस दिवस ! ह्मणजे ? सर्पदंश होऊनच परवां झाले बावीस दिवस ! अर्थात् आज झाले चोवीस दिवस ! ह्मणजे ? ( मूर्च्छित पडते )

**तारा**—काय ? ह्मणजे फक्त एकच दिवस ! पडते. ( मूर्च्छा येते ).

**राजा**—प्रिये ! प्रिये! शुभांगे! **प्रिये तारे**! सावध व्हा सावध व्हा! तुह्मांस पहिल्यानेंच मीं सांगितलें होतें ना ? कीं मला तें कारण विचारूं नका ह्मणून ? मग, मला विनाकारण कां बरें आग्रह केला ?

**तारा**—आई **जगदंबे** ! कायग हें? आतां मी कायग करूं? (रडते).

**राणी**—हायरे देवा ! काय कायरे हे माझ्या फुटक्या दैवाचे खेळ होताहेत ! देवा, आतां मी कायरे करूं ? ( रडते ).

**राजा**—बरें प्रियांनो, द्या आतां मला निरोप !

**तारा**—काय आतांच ?

**राजा**—होय प्रिये, मला मुदती पूर्वीं थोडा वेळ तरी, माझ्या मित्राला जाऊन मिळालेंच पाहिजे !

**राणी**—ह्मणजे, आपण आतांच का आमचें सौभाग्य ( कुंकू ) ही घेऊन जाणार ?

**राजा**—होय प्रियांनो ! मला गेलेंच पाहिजे ! आतां, मजकडून तुमचा कांहीं अपराध झाला असल्यास, मला माफ करा! येतों आतां. (जाऊं लागतो. )

**दोघी**—( पायांस विळखा घालून ) महाराज! नाहीं! नाहीं ! आपल्यास आह्मीं मुळींच जाऊं देणार नाहीं ! आपल्या बरोबर आह्मींही येणार ! आह्मांस तरी आतां येथें राहून काय करावयाचें आहे !

**राजा**—प्रियांनों ! मला माझ्या स्थळीं जाऊंद्या. मुदतीच्या आंत मी माझ्या स्थानीं न गेलों, तर मी माझ्या शिवरायाचा महान् अपराधी होईन. सोडा, सोडा, मला !

**दोघी**—नाहीं ! प्राण गेला तरी हे पाय सोडणार नाहीं. एक तर आपण आणखी कांहीं वर्षें येथें रहा; अथवा आह्मांस तरी,

आतांच आपल्या सोबत घेऊन चला! आपणा एकट्यास, आह्मी कधींहीं सोडणार नाहीं!

**राजा**—( स्वगत ) देवा, आतां मीं काय करूं! मजवर हें मोठें संकट आलें! ज्यांनीं आपलें अपरिहार्य दुःख, सुविचारानें गटकन गिळून टाकून, ज्या, केवळ माझ्या संगतीच्याच लोभांत संतुष्टचित्त होऊन राहिल्या, इतकेंच नव्हे, तर ज्यांनीं आपलें अंतः-करण माझ्या अंतःकरणाशीं अगदीं एकरूप केलें, त्यांस येथें टाकून तरी कसें जावें? बरें, बरोबर न्यावें, तर तो तरी अधिकार मला कोठला? मिळून दोन्हीं बाजूंनीं मला हा मोठा पेंचच पडला आहे! आतां येथें काय करावें, मला बिलकूल समजत नाहीं! ( आठवण करून ) अरे! पण मी इतका काळजींत कशाला पडलों? माझ्या **शिवरायानें** मला " संकट समयीं पाहिजे तेथून हाक मार, मी तुला तेथें येऊन भेटेन" असें आश्वासन दिलें आहे! मग मला भय कसलें? तोच येऊन या गोष्टीचा कायतो निकाल करील! मी तर आपली सर्व बांधाबांध करून, हा तयार आहें! करितां, आतां तसेंच करूं! [ ध्यानस्थ बसतो व स्वगत ] तर, हे परम दयाळ शिवराया! आतां क्षणाचाही विलंब न करितां त्वरित दर्शन दे! हा मी तुला अनन्य शरण आहें. [ नमस्कार घालतो, तोंच **शिव-राज** प्रगट होतात. ]

**शिव**—राजा! ऊठ, ऊठ, हा मी आलों आहें, पहा!

**राजा**—काय शिवराया! शब्द तर ओळखीचा दिसतो, पण कोठें दिसत नाहींत! सद्गुरो! असें नकाहो करूं. द्या, मज पाप्याला दर्शन द्या! मी आपला महान् अपराधी आहें! मूल हें, आईचे अपराध थोडेका करितें? शिवराया, तूं माझी **आईना**?

**शिव**—राजा! तूं सांप्रत जड देहांत असल्यामुळें, मी तुला दिसत नाहीं!

**राजा**—पण महाराज! मला आपलें दर्शन पाहिजे!

**शिव**—राजा, तुला आतां पुनः **दिव्यदेह** दिल्याशिवाय मी तुला दिसणार नाहीं ! याकरितां, चल ये मजबरोबर !

**राजा**—शिवराय ! हा पहा मीं अगदीं तयार आहें ! **सद्गुरो** ! आपल्यास येथवर येण्यासी तसदी पडूंनये, म्हणून, मीच आपल्या स्थळीं येणार होतों, पण मी अडकून पडलों हो !

**शिव**—काय ! अडकून पडलास ? अरे हो ! या कोण ? तुझ्या दोन्ही पायांस चिकटून राहिल्या आहेत ?

**राजा**—महाराज ! ह्याच त्या दोन बिज्या ! ह्यांच्यामुळेंच हा मी अडकून राहिलों! ह्या कांहीं केल्या मुळींच मला सोडीनात! यामुळें मीं आतां काय करूं, तें मला मुळींच समजत नाहीं ! आणि म्हणूनच, शिवराया ! आपलें स्मरण केलें आहे. करितां, कृपा करून याचा योग्य न्याय व्हावा !

**तारा**—महाराज ! आपण कोणाशीं बरें बोलतां आहां ?

**राणी**—मीही मघांपासून ऐकत्यें आहे ! पण येथें तर, आपणा तिघांशिवाय दुसरें कोणीच दिसत नाहीं ! का महाराज ! आपण एवढा वेळ कोणाशीं बरें बोलत आहां !

**राजा**—प्रियांनो ! माझे बंधु **शिवराज**, येथें आले आहेत !

**तारा**—काय ! शिवराज आले आहेत ? तर अगोदर कोठें आहेत ते मला दाखवा ! मीं आपली विनंति त्यांच्या चरणीं प्रविष्ट करणार !

**राणी**—प्राणनाथ ! मला सोडून नकाहो जाऊं ! मी आपल्यास मुळींस जाऊं देणार नाहीं. ही माझी विनंति पाहिजे तर आपल्या शिवरायाच्या कानीं घाला ! पण मला सोडून जाऊं नका ! कोठें आहेत शिवराय ? किंवा मीच जाऊन त्यांच्या चरणीं नाक घासत्यें.

**राजा**—प्रियांनो ! ते येथें प्रगट झाले आहेत खरे ! पण आपण या जड देहांत असल्यामुळें, मलाही ते दिसत नाहींत ! मग मीं तुह्मांस कोठून दाखवूं ?

**तारा**—पण महाराज ! ते येथें आहेत खरे ना ?

**राजा**—होय, तारे ! येथें आहेत खचित.

**तारा**—तर मग, मीच त्यांची अनन्य भावें प्रार्थना करित्यें. हे प्रभो, **शिवराया** ! मीं आपलें स्वरूप कोठून जाणणार? मी यःकश्चित् पापी अबला ! माझी योग्यता ती काय ! मला आपलें **अस्तित्वाहि** माहित नाहीं. मग **महत्व** कोठून ! या करितां; काया वाचा मनें करून, मी आपल्यास शरण आहें! मला दर्शन द्यावें !

**शिव**—मुली, तारे ! तुला जें काय बोलावयाचें आहे, तें तूं खुशाल बोल ! श्रीजगदंबेच्या देवळांत तूं जो आपल्या मनाचा मोठेपणा दाखविलास, तो सर्व मला माहित आहे! यावरून, मीही समजतों कीं, तुझी योग्यता निराळी आहे !

**राणी**—महाराज ! **शिवराय**! मीही आपल्या चरणीं लीन आहें! मला या नरककुंडांतून बाहेर काढा ! मला नको हा जन्म ! ही पहा, मी आपल्याला शरण आहें ! ( सा. न. घालते )

**शिव**—( राजास ) तुझें आतां काय ह्मणणें आहे ?

**राजा**—महाराज, मी तर तयार आहें ! **फक्त** अडचण काय ती, हीच. ( दोघींकडे बोट दाखवून )

**शिव**—राजा ! तुला आमच्या **महामायेच्या** या क्रीडाभुवनांत "शिरूं नको" ह्मणून मी अनेकवेळां सांगितलें असतां, तूं त्यावेळीं माझें ऐकिलें नाहींस ! यामुळें, मला तुझ्यासाठीं केवढी तरी पंचाईत करावी लागली! बरें, तेवढी करूनही, तूं मला मोकळा सोडीत नाहींस! ही आणखी दुसरी एक **ब्याद** माझ्या मागें लावलीस !

**राजा**—**शिवराया** ! मी बोलून चालून खुळा भोळा असून, तुझा **कनिष्ट** बंधु, **ज्येष्ट** नव्हें ! तेव्हां मजकडून अज्ञानपणामुळें कांहीं विपरीत चुका व्हवयाच्याच. पण, मी ह्मणतों, अंधःकारानें कितीही उग्रस्वरूप धारण केलें, तरी त्याची धास्ती, **सूर्याला** कशाला पाहिजे ?

**शिव**—( स्वगत ) शाबास ! माझ्या प्रियबंधो ! **जीवराया** ! तुला बरीच जागृति आहे. शिवाय, तूं हें राज्यवैभव सोडून मजबरोबर स्वसंतोषानें यावयाला सिद्ध झालास, हाच, वरील अनुमान खरें ठर-

ण्यास बळकट पुरावा आहे. त्याचप्रमाणें, या दोन्ही मुलीही, बऱ्याच अधिकारी दिसतात. तसें नसतें तर,त्यांनीं या राजाच्या पायांस विळखे घालून इतका अट्टहास केला नसता. तथापि, सुसंगति नसल्यामुळें, त्यांच्या ठायीं अद्याप बरेंच **अज्ञान**ही आहे. तें घालविणें असेल,तर त्यांच्या ठायीं **वैराग्य** कितीसें बिंबलें आहे, याची परीक्षा प्रथम करणें जरूर आहे. आणि जर ह्या, त्या कसास उतरल्या, तर त्यांनांही या **जीवराया** बरोबर स्वस्थळ कां मिळूं नये ? वास्तविक मिळालें पाहिजे. या करितां, त्यास प्रथम या जड देहांतच ठेवून, फक्त **दिव्य दृष्टिच** द्यावी, ह्मणजे समक्षासमक्ष बोलाचाली करण्याला बरें पडून, शिवाय त्यांनींही मनोभावें केलेली एक विनंति, आपण ऐकिल्यासा-रखी होईल. ( उघड ) बरें, **राजा**, तुझें आतां काय ह्मणणें आहे ?

**राजा**—महाराज ! मी अज्ञानामुळें, आपल्याला जी तसदी दिली, तिजबद्दल मला क्षमा करून, अगोदर आपलें रूप मला दाखवावें, एवढी विनंति आहे.

**शिव**—( दोघींस ) आणि **मुलींनो**, तुमचें ह्मणणें काय आहे ?

**तारा**—महाराज! हे पहा मी आपल्याला ( नमस्कार करून ) अनंत नमस्कार करित्यें. हें पहा पुनः पुनः नाक घांसत्यें, पदर पस-रत्यें ! मी आपल्याला अनन्यभावें शरण आहें. मजवर कृपादृष्टि करा, व मला अगोदर आपलें **प्रत्यक्ष** दर्शन होईल असें करा !

**राणी**—आणि दयानिधे ! **शिवराया** ! मीही आपल्याला मनोभावें शरण आहें. करितां, मला प्रथम **दर्शनलाभानें** कृतार्थ करावें !

**शिव**—ठीक आहे. माझ्या बंधूभगिनींनों ! तुमचा फक्त **भाव** पाहून, तूर्त तुह्मां त्रिवर्गीस फक्त **दिव्यदृष्टि** देतों. याच्यायोगें, तुह्मांस मी दिसूं लागेन.

**तिघें**—( घाईनें ) ठीक आहे महाराज ! करा कृपा लवकर !

**शिव**—( तिघांच्या नेत्रांस हस्तस्पर्श करितो. ) पहा आतां !

**तिघे**— अहाहा ! प्रभो **शिवराया** ! आह्मांस कृतार्थ केलें !
( पायांवर गडबडां लोळतात ).

**शिव**—( तिघांच्या पाठीवरून हात फिरवून ) परमेश्वर तुमचें कल्याण करो! उठा,उठा आतां.(**जीव** उठून,हात जोडून उभा राहातो.)

**दोघी**—नाहीं, नाहीं महाराज ! आमच्या यजमानाबरोबर आह्मांलाही आपल्या सान्निध्यास नेण्याबद्दल, अभिवचन दिल्या-शिवाय, आह्मी हे आपले चरण कधींही सोडणार नाहीं!

**शिव**—( स्वगत ) शाबास ! काय यांचा हा दृढभाव ! ( उघड ) बरें आहे, मुलींनो, तुह्मां संबंधी अंतर्दृष्टीनें, मी कांही विचार करून, थोड्याच वेळानें तुह्मांला या प्रश्नाचें उत्तर देतों, तों पर्यंत जीवराया, तूं असें कर.

**राजा**—**प्रभो**, काय आज्ञा आहे ?

**शिव**—आपण स्वस्थळ सोडल्यापासून तुला पंचमहाभूतें व त्रिगुण संबंधी वगैरे जें ज्ञान **मी** करून दिलें आहे, तें तूं यांस तोंपर्यंत करून दे. कारण जर, विचारा अंतीं, यांनाही स्वस्थळीं घेऊन जाण्याचें ठरलें, तर यांच्या तयार करून ठेविलेल्या मनोभूमीवर, ज्ञानाचें बीजारोपण त्वरित करितां येईल.

**राजा**—पण **शिवराया** ! मला एवढा अधिकार—

**शिव**—तुला जितकी माहिती मी प्रत्यक्ष करून दिली आहे, तितकीच तूं सांग. शिवाय, तूं यांचा पति असल्यामुळें, यांस गुरुस्था-नींच आहेस.

**राजा**—बरें आहे, आज्ञेप्रमाणें करतों.

**शिव**—बरें, मुलींनो ! हे तुमचे **यजमान**, ज्या चार गोष्टी तुम्हांस सांगतील, त्या नीट लक्षांत ठेवा. तोंपर्यंत मी थोडा विचार करून येतों.

**तारा**—महाराज ! कृपा करून आतां कोठेंही जाऊं नये एथेंच मी आपल्याला एकांतस्थळीं आसन घालून देत्यें. तेथें आपण

शांतपणें विचार करावा. (त्यांस तेथेंच जरा पुढें आसन घालून देत्ये) या, महाराज ! येथें बसा.

**शिव**—ठीक आहे. तोंपर्यंत तुम्ही आपलें काम करा.

**दोघी**—आज्ञा महाराज !

**शिव**—(समाधी लावून ध्यानस्थ होतो.)

**राजा**—प्रियांनो, तुम्ही आतां इकडे या. नीट लक्षपूर्वक पुढील विवरण ऐका. तुम्हांला **गुरुमहाराजांचें** प्रथम **प्रत्यक्षदर्शन** झालें, हाच अगोदर एक महल्लाभ व शुभशकुन आहे!

**दोघी**—खरं आहे महाराज ! बरं आतां सांगा. **शिवगुरु** समाधींतून उठण्यापूर्वी, आपलें विवरण झालें पाहिजे.

**राजा**—हो. ऐकातर एकाग्रतेनें. ( त्यांस पांच मिनिटें समजूत देतो. ) काय, प्रियांनो, आतां आलें लक्षांत ?

**राणी**—होये समजलें. ही सर्व दृश्य सृष्टि, म्हणजे फक्त पंच-महाभूतांचा खेळ आहे.

**तारा—पंचमहाभूतें व त्रिगुण,** यांचा खेळ आहे. असेंचना महाराज ?

**राजा**—होय. हीं आठ **तत्वें,** सृष्टींतील प्रत्येक वस्तूंत आहेत. पहा, हें झाडाचें पान.

**तारा**—महाराज, यांतलीं **पंचभूतें** समजलीं. पण यांत **त्रिगुण** कोठें दिसत नाहींत.

**राजा**—या वनस्पतीमध्यें औषधादि जो **उत्तम गुण,** तो **सत्वगुण. विषारी** किंवा **कट्वादि** जो गुण, जो **तमोगुण** व याच्या स्पर्शानें वगैरे विशेष **फायदा** नाहीं, व **तोटाही** नाहीं, असा जो गुण, तोच **रजोगुण.**

**राणी**—म्हणजे प्रत्येक वस्तूंत हे गुणही आहेत.

**राजा**—म्हणूनच ही सगळी **अष्टधाप्रकृति**! आतां आलें लक्षांत ?

**दोघी**—हो महाराज ! आतां समजलें !

**राजा**—करा तर, याचा विचार करीत बसा! आतां पुढें **शिवराज** काय आज्ञा करतात पाहूं.

**शिव**—( समाधि उतरून ) अहाहा! परमेश्वरी सूत्र काय अगाध आहे! मी या **जीवराया**करितां, जी **तीस** दिवसांची मुदत ठरवून घेतली होती, ती या एकट्या **जीवराया**करितां नसून, या **तिघांही** करितां आहे! कारण, आतांच्या ध्यानधारणेवरून असें दिसून आलें कीं, या **जीवराया**प्रमाणेंच या **दोघींचेंही** आयुष्य, आणखी पांच पांच दिवसच आहे! इतकेंच नव्हे पण, तिघांच्या मृत्यूचा **काल** अगदीं **एकाक्षणीं** आहे! याकरितां, जर या तिघांनाही खरें वैराग्य वाणलें असेल, तर यांजवरही कृपा करावी, आणि यदाकदाचित्, राज्यवैभवाच्या लोभामुळें वगैरे दुर्दैवानें यांस पुन; संसार करावासा वाटल्यास, कांहीं काल यांस स्वसामर्थ्यप्रभावानें प्रपंचसुख द्यावें. कारण, त्यांचा शुद्धभाव पाहून, माझें अंतःकरण प्रसन्न झालें आहे! पाहूं आतां काय घडतें तें! ( उघड राजास ) **राजा**, पहिल्यानें तूं इकडे ये.

**राजा**—( चरणीं मस्तक ठेवून हात जोडून समोर बसतो. )

**शिव**—राजा! तुला एवढें हें **सार्वभौम राज्य** प्राप्त झालें असतां, तूं मजबरोबर यावयास इतका उत्सुक कां?

**राजा**—मला या गोष्टीची पुनः आठवण करूं नका, अशी विनंति आहे!

**शिव**—अरे, पण तुला या अपार **वैभवाचा** इतका वीट कां आला?

**राजा**—महाराज, हें **वैभव** अपार आहे, ही गोष्ट तर खरीच. पण हें सर्व **निःसार** व **नाशवंत** आहे, अशी माझी खात्री होऊन चुकली आहे. आणि, ती प्रत्यक्ष **अग्निनारायणानें** करून दिली आहे!

**शिव**—कोणीं? अग्निनारायणानें? ती कशी?

**राजा**—महाराज! थोड्यादिवसां पूर्वीं, या वाड्याचा कांहीं भाग

जळून त्यांत वस्त्रालंकारादि असंख्य बहुमोल वस्तूंची, नुसती राख झाली, राख !

**शिव**—अरे, गेलें तें गेलें ! पण बाकी तर आहे कीं नाहीं ?

**राजा**—महाराज, त्याचीही एक दिवस तीच गति ! शिवाय या देहाचीही एक दिवस तीच दशा होणार, हेंही मला त्या दुर्धर प्रसंगामुळें, चांगलें समजून आलें आहे.

**शिव**—बरें, पण या तुझ्या अत्यंत रूपवति दोघी तरुण स्त्रिया असतां—

**राजा**—( आठवण करतांच मूर्च्छित होतो. )

**शिव**— ( त्याला सावध करून ) स्त्रियांचें नांव काढतांच तुला मूर्च्छा येण्याचें कारण काय ?

**राजा**—तें मी सांगूं इच्छित नाहीं, महाराज !

**शिव**—बरें, तूं जा. तिकडे बस. मुली राणी! आतां,तूं इकडे ये पाहूं!

**राणी**— ( नमस्कार करून, हात जोडून उभी राहते ).

**शिव**—बस. खालीं बस.

**राणी**— ( खालीं बसून हात जोडते. )

**शिव**—मुली, तूं एवढी मोठी **सार्वभौमिणी** असतां, हें अपार **वैभवसुख** सोडून यजमानाबरोबर येणार म्हणतेस, तेव्हां तूं किती वेडी !

**राणी**—महाराज ! हें राज्यवैभव बाह्यतः जितकें **सुखकर** वाटतें, तितकेंच किंबहुना जास्त, तें आंतून **दुःखकारक**ही आहे. अशी माझी पुष्कळ गोष्टीवरून खात्री झाली आहे !

**शिव**—ह्या मौल्यवान् वस्त्रालंकारांविषयीं, तुझी काय खात्री झाली आहे ?

**राणी**—महाराज ! ते सर्व नाशवंत आहेत, असें खुद्द **अग्नि-नारायणानें** मला शिकविलें आहे !

**शिव**—पण, तूं एवढ्या मोठ्या विस्तीर्ण भूमीची मालकीण तर आहेसना ?

**राणी**—महाराज! आजपर्यंत कोटयवधि राजे हिला **माझी माझी** ह्मणून, आपणच निघून गेले! हिला आपल्याबरोबर एकानेहीं नेलेली नाहीं! ही आहे, तेथेंच आहे!

**शिव**—पण तुला, मुलाबाळांच्या सुखाची कांहींच **महति** वाटत नाहीं? लोक तर त्याकारितां नवसहि करितात!

**राणी**—त्याचाही मला अनुभव आला आहे. दोघांच्या दोन तऱ्हा झाल्या!

**शिव**—ह्मणजे?

**राणी**—महाराज! हल्लींच, थोड्या दिवसांपूर्वीं, मी ठारच मरायची; पण सुदैवानें, ही माझी **तारा** होती, म्हणूनच वांचल्यें. व वांचल्यें, म्हणूनच हे पाय दृष्टीस पडले!

**शिव**—समजलों. हल्लींच्या प्रसूतिसमयीं?

**राणी**—होय महाराज. त्याचा तसा नाश झाला, दुसरा मोठा मुलगा होता, तो त्या अग्निप्रळयांत सांपडला! (रडूं लागते).

**शिव**—पण, तूं ही रडत्येस काय? उगी! **संतती** करितांच रडत असलीस, तर तुझें तें रोदन व्यर्थ आहे. कारण, यापुढें ती आणखी होणार नाहीं, ह्मणून कशावरून?

**राणी**—महाराज! झाली तरी तिचा परिणाम हाच! कदाचित् संतति **दीर्घायु** झाली, तरी कधीं तरी एकाकाळीं, तिच्यापूर्वीं मला गेलें पाहिजे! मिळून **वियोग** आहेच. अर्थात्, दुःखच! शिवाय, मला त्या प्रसूतिवेदनांची आठवणही नको. हे पहा! माझ्या आंगावर शहारे!

**शिव**—छे, त्याचें काय? तें दुःख का दर खेपेस होतें?

**राणी**—नाहीं. पहिल्या खेपेस तर मला समजलेंही नाहीं!

**शिव**—होय ना! मग तितक्याच करितां, तूं हें **राज्य**, अपार **वैभव** व **पतिपुत्र**सुख सोडण्याचा अविचार कां करित्येस?

**राणी**—महाराज! माझ्या यजमानास तर आपण घेऊन चाललां, आणि मला **पतिसुख** कोठलें ह्मणतां?

**शिव**—पण तुझी जर राहण्याची इच्छा असेल, तर तुजकरितां कांहीं दिवस त्याला ठेवतों. मग तर, माझे **वरील** शब्द खरे आहेत कीं नाहींत ?

**राणी**—महाराज ! तसें झालें तरी, पुत्रसुख नाहींच माझ्या कपाळीं. फक्त पतिसंगति मात्र थोडे दिवस मिळल !

**शिव**—मुली राज्ञी ! मी " **पतिसुख** " ह्मटलें असतां, तूं " **पतिसंगति** " ह्मणत्येस, व पुत्रसुख तर मुळींच नाहीं ह्मणत्येस, यांतली मख्खी काय ?

**राणी**—महाराज ! ( कपाळास आठ्या घालून ) तें मला विचारूं नका. मी महापापिणी आहे. मला क्षमा करा. मला या नरकांतून सोडवा. नको हो मला हें **राज्यसौख्य** ! यांत राहून, मला एका क्षणाचीही **शांति** मिळणार नाहीं !

**शिव**—बरें, तूं जा. तिकडे राजा जवळ जाऊन बैस. (तारेस ) बरें मुली, तूं इकडे ये पाहूं !

**तारा**—( येऊन नमस्कार करून हात जोडून उभी राहते. )

**शिव**—तारे ! बस, उभी कां ?

**तारा**—( हात जोडून बसत्ये ) काय आज्ञा आहे महाराज ?

**शिव—तारे !** तूं आपल्या **साध्विप्रभावानें** सर्व जगास थक्क करून सोडलेंस ! **धन्य** आहे तुझी !

**तारा**—महाराज ! मी यःकिंश्चित् पापिणी, मी स्तुतीस **पात्र** नाहीं !

**शिव**—पण तारे, तुझी एवढी सत्कीर्ति झाली असतां व राजाश्रयामुळें तुला **कोणत्याहि** गोष्टीची उणीव नसतां, शिवाय, तूं एवढी रूपसंपन्न **तरुणी** असतां, तुला इतक्यांतच या जगाचा इतका वीट कां आला ?

**तारा**—महाराज ! मला तें कांहीं एक विचारूं नका, एवढीच कृपा करा ! महाराज, यजमानाशिवाय, नुसत्या वैभवसुखास घेऊन काय करावयाचें आहे ? शिवाय, वैभव तरी नाशवंतच ना ?

**शिव**—कसें ?

**तारा**—कसें, तें अग्निनारायणानें स्पष्ट दाखविलें आहे ! शिवाय, हें **जीवित्वहि** किती क्षणभंगुर आहे, तेंही त्यानें राणीसाहेबांचा ज्येष्ठ पुत्र भक्ष्यस्थानीं घालून, उत्तम शिकविलें आहे !

**शिव**—पण तारे, असले अपघात रोजरोज कां कोठें होत असतात ? कधीं काळीं एखादा, ज्याच्या त्याच्या पूर्वकर्मानुसार होत असतो. तितक्याच एखाद्या आकस्मिक गोष्टीची भीति धरून, प्रपंच-सुखास सर्वस्वीच आचवणें, हें कांहीं शहाणपण नव्हे.

**तारा**—महाराज ! आपण **सौख्य** ह्मणतां, पण तें माझ्या नशिबीं, निदान या **जन्मीं** तरी नाहीं.

**शिव**—तारे, कां बरें ! तूं ऐन तारुण्यांत असून, रूपगुणानेंही अप्रतिम आहेस, मग तुला सौख्यास काय कमी आहे? छानदार बरा **राजाश्रय** आहे ! पाहिजे तें खावें, प्यावें, ल्यावें, चैन करावी! तें सोडून, ही तुला **दुर्बुद्धि** कोठून उद्भवली ?

**तारा**—ज्याप्रमाणें, एखाद्या कारागिरानें,एखाद्या चित्रास त्याच्या अंगा खांद्यावर भरपूर सुंदर वस्त्रालंकार घालून, शेवटीं **शिरोभूषण** घालण्याच्या वेळीं तें न घालतां, त्या चित्राचा **शिरच्छेद** करावा, त्या प्रमाणेंच माझ्या सर्व सुखाची तंतोतंत स्थिति आहे !

**शिव**—कां बरें ? राजा तुला प्रेमानें वागवीत नाहीं ?

**तारा**—महाराज ! मजवर त्यांचें अप्रतिम प्रेम आहे. माझ्या नांवें त्यांनीं एक गांवचा गांव सोडला आहे. मला पाहिजे ती **दुर्मिळ** वस्तुहि ते आणून देतात. शिवाय, मजशीं सुखासंतोषानें वागतात. पण—

**शिव**—तारे, " मला कोणत्याहि गोष्टीची कमताई नाहीं" असें तूंच स्वमुखानें सांगत असून, पुनः पुनः आणखी **पण** काय ?

**तारा**—महाराज, तें काय सांगूं ? नको, नको, त्याची आठवण नको ! ( मूर्च्छित होते. )

**शिव**—( तिला सावध करून, त्यांच्याजवळ नेऊन बसावितो. ) ( स्वगत ) हा काय चमत्कार आहे ? या तिहींतून प्रत्येक जणाचें शेवटीं ह्मणणें हेंच " **तें मला विचारूं नका** " तर तें न सांगण्यासारखें कारण, खाचित कांहीं तरी **गुह्य** असलें पाहिजे. मग तें काय बरें असावें ? ( विचार करून ) हो, तेंच. अगदीं तेंच. कारण ह्याशीं सर्व गोष्टी बरोबर जुळतात. हा **स्त्रीपुरुषसंभोग**, जरी सर्व दुःखांचा **कंद** आहे, तरी लोकदृष्ट्या विचार केला असतां, तो सर्व सुखांत **श्रेष्ठ** मानला गेला आहे ! आणि ह्मणूनच माझें अनुमान खरें आहे ! या त्रिवर्गास इतकें जें हें औदासिन्य प्राप्त झालेलें आहे, तें त्यामुळेंच आहे ! याकरितां, यांचें **वैराग्य**, पुनः आणखी कसास लावून पाहूं ! माझ्या प्रियबंधु भगिनींनो !

**तिघे**—( हात जोडून उभे राहून ) महाराज !

**शिव**—आपण तिघांनींही, आपापल्या दुःखाचें खरें कारण स्वमुखानें सांगितलेलें नाहीं, तरी, तें सर्व माझ्या लक्षांत येऊन चुकलेलें आहे ! त्यावरून मलाही वाटतें कीं, तुमचें दुःख रास्त आहे! शिवाय, तुह्मां तिघांचाही शुद्धभाव पाहून, मला तुमच्याबद्दल अशी करुणा उद्भवते कीं, तुह्मां तिघांच्याहि दुःखाचें जें **एकच** कारण आहे. तें नष्ट करून, तुह्मां त्रिवर्गास सुखी करावें ! यास तुमची कांहीं हरकत आहे काय ?

**राजा**—( दोघींकडे पाहतो ) कसा काय विचार आहे ?

**तारा**—( राणीस ) काय बाईसाहेब, आपला काय विचार ?

**राणी**—( दोघांकडे पाहते. )

**शिव**—अरे सर्वच भयचकित होऊन, एकमेकांकडे पहात काय राहिलां आहां ? **राजा** ! काय हें ?

**राजा**—महाराज ! माझें कांहीं नाहीं. मी आपला—

**शिव**—सांग तर मग ! तुझ्याठायीं जें शारिरिक **व्यंग** आहे, तें नष्ट केलें असतां, या एकाहून एक सुंदर **तरुणी**, हें सार्वभौम

**राज्य**, मौल्यवान् **वस्त्रालंकार**, व उत्तमोत्तम मधुर **पक्कान्नें**, यांचा, सुखानें यथेच्छ उपभोग घेण्यास तूं कबूल आहेस काय ?

**राजा**—( विचार करून ) **शिवराया** ! या प्रश्नाचें उत्तर मी या पूर्वीं दिलेलें आहे. ह्या सारखीं, **पंचवीस** सार्वभौमराज्यें मला मिळालीं, तरी मी यांत राहाण्यास मुळींच खुषी नाहीं! कारण, **जितका व्याप तितका संताप** ! ह्मणून ह्मणतों, महाराजांनी अशा प्रकारचे प्रश्न मला पुनः पुनः करून, आपला अमोल्य वेळ व्यर्थ घालवूं नये!

**शिव**—पण राजा ! तुझें **व्यंग** नष्ट केलें तर ?

**राजा**—आणि **आयुष्य** कोठून आणणार ?

**शिव**—अरे ! ज्याला तुझें शारीरिक **व्यंग** नष्ट करितां येतें., त्याला तुझा **आयुष्यतंतु** नाहीं का वाढवितां येणार ?

**राजा**—( स्वगत ) आतां येथें संभाळिलें पाहिजे ! मोहामुळें घसरण्याचा फार संभव आहे ! ( उघड ) महाराज! मी साफ सांगतों, आपण जरी माझें आयुष्य वाढविलें, तरी तें पुनः कधीं तरी संपणारच! अर्थात, हा देह सोडलाच पाहिजे. तसेंच, माझें जरी आपण व्यंग कमी केलें, व मला विषयसुखाचा मार्ग खुला करून दिला, तरी माझें व या माझ्या स्त्रियांचें तारुण्य **कायम** राहणारें नाहीं! त्यांतूनही, प्राण्याचें **तेज, बल** व **आयुष्य** हीं, तात्काल कमी करणारें जालीम **विष**, संभोगासारखें दुसरें कोणतेंच नाहीं ! आज या स्त्रिया, गुलाबाच्या नुकत्याच फुलत असलेल्या **कळी**प्रमाणें दिसत आहेत, पण आणखी पांच दहा वर्षें गेलीं, तर यांच्याकडे नुसतें पाहवणारही नाहीं ! तसेंच, आज जरी मी **ज्वान** दिसतों आहें, तरी मला लवकरच **वार्धक्य** येईल, व त्या वेळीं हीं सर्व गात्रें अगदीं क्षीण होऊन जातील! व **दशेंद्रियांतून** एकही इंद्रिय धड नाहींसें झाल्यावर तर, क्षणोक्षणीं पश्चात्ताप झाल्याशिवाय रहाणार नाहीं ! याकरितां, मला पुनःपुनः हे प्रश्न न व्हावेत, अशी प्रार्थना आहे.

**शिव**--(राणीस) बरें मुली, तुझें म्हणणें काय ?

**राणी**—महाराज ! आपण स्वसामर्थ्यानें पाहिजे तें करूं शकाल,

हें खरें आहे. आणि तसें केल्यास, मला या लौकिक सुखाचा लाभ होईल, हेंही खरें आहे. पण, मूळ यजमानाचीच जर या गोष्टीस कबुली नाहीं, तर बाकी गोष्टी काय कामाच्या ?

**शिव**—पण मुली ! तुझ्या यजमानास कबूल केल्यावर, मग तर तुझी कबुली आहे कीं नाहीं ?

**राणी**—(बराच वेळ विचार करून) नाहीं महाराज ! या **क्षणिक** सुखास भुलून, **अक्षय** सुखावर लाथ मारण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. आपण जरी मला आतां माझ्या पतिसौख्याचा लाभ करून दिला, तरी **पतिसौख्य पतिसौख्य** तें काय? फक्त **एका किंवा अर्ध्या क्षणापुरतेंच** ! तो क्षण गेल्याबरोबर, जो **झक** मारल्यासारखा प्रकार होतो, त्याचा अनुभव **ज्याचा त्यास** ! संसारांत सर्वांहून श्रेष्ठ मानलेलें जें **संगमसुख**, त्याची ही स्थिति ! तेव्हां बाकी याच्या खालील प्रमाणांतील सौख्याची किंमत उघडच ठरत आहे ! आतां, बाकी **राज्यवैभव**, **पुत्रपौत्र**, व हा आपला स्वतःचा **देह**. हें तर सर्व **क्षणभंगुर** आहे, हें आह्मीं पदोपदीं पहातच आहों ! याकरितां, महाराज ! मी सर्व वैभवापेक्षां, **भगवद्दर्शनाचीच** थोरवी अधिक समजत्यें.

**शिव**—( स्वगत ) शाबास ! काय यांचा हा अधिकार ! (उघड) बरें, मुली तारे ! आतां तुझें ह्मणणें कसें काय ?

**तारा**—स्वामिन् ! आह्मीं आमच्या दुःखाचें खरें कारण सांगत नसतांही, आपण चतुरतेनें तें शोधून काढून, शिवाय परम कृपाळूपणानें, आह्मां त्रिवर्गांचेंही दुःख कमी करण्यास तयार झालां, हे आपले अनंत उपकार आहेत ! परंतु महाराज ! आपल्यास जर आह्मांवर खरी कृपा करावयाची असेल, तर ती अशी न करितां, जेथें **अखंड सौख्य** असेल, तेथें आह्मांस न्या ! आपल्या कृपेनें, मला येथें कांहीं कमी नाहीं, हें खरें आहे, पण तें सौख्य किती दिवस चालणार ? मी जिवंत असेपर्यंत, हे माझे यजमान, मजसान्निध असतीलच, ह्मणून तरी काय नियम आहे? बरें असले, तरी मजवर त्यांचें

प्रेम असेंच राहील, ह्मणून तरी नेम काय आहे? बरें, प्रेमही असलें, तरी शेवटीं कधीं तरी **वार्धक्य** हें येणारच कीं नाहीं? व तें आल्यावर मग तरी गेलें पाहिजेचना?

**शिव**—पण, जी गोष्ट पुढें **कधीं काळीं** येणार, तिजबद्दल आतांपासूनच भीति बाळगून, हातांत आलेल्या सौख्यास झुगारून देणें, हें वेडेपण नव्हे काय?

**तारा**—महाराज! ज्या कोणा प्रापंचिकास हें माझें म्हणणें गैर वाटत असेल, त्यानें पाहिजे तितकीं वर्षें हें नश्वर संसारसुख भोगून, खुशाल जन्ममरणाच्या चक्रांत यावें! महाराज! आपण **मुली** म्हणून हाक मारितां, या वरून आपणच माझे **तात** आहां! माझ्या मनांत यावेळीं जे विचार आले आहेत, ते आपल्या चरणीं बोलून दाखविले. यांत, माझ्या स्त्रीजातीस न शोभण्यासारखें, असें मी काहीं भाषण करित आहें. तरी याजबद्दल क्षमा करणार, तात महाराज समर्थ आहेत!

महाराज! या **संगमसुखाच्या** अभिलाषानें तरी,मी येथें राहाण्यास कबूल होतें कीं काय, म्हणून मला पुनः आपण कसोटीस लावून पहात आहां! परंतु महाराज! "**संगम**" हें खरोखर **सौख्य** नसून **महदुःख** आहे! कसें तें पहा!

प्रथम आपला **पवित्र देह**,दुसऱ्या कसल्या तरी देहाशीं **बाटवावयाचा**! शिवाय, तो दुसरा देह, कधीं **नासका, कुजका, दुर्गंधयुक्त**, व कधीं **रक्तपूव्रणयुक्त** ही असण्याचा संभव!!! अर्थात्, तत्स्पर्शानें, आपल्या देहाची नासाडी! बरें, तो दुसरा देह कदाचित् तसा नसला, तरी त्या चांडाळ **संगमाच्या** योगें, उभयतांस जो अतोनात **श्वास** लागतो, त्यामुळें व शरीरांतील **सर्व तेज नष्ट** झाल्यामुळें, देह दिवसेंदिवस **क्षीण, निस्तेज,** व **अल्पायु** होत जातो!

बरें, तसाही न झाला, तरी पुढें संततीचा त्रास आहेच? हल्लींच आमच्या राणीसाहेब, त्या दिवशीं ठारच व्हावयाच्या! पण आई

जगदंबेनें कृपा केली ! पण ती जर केली नसती, तर तें दुःख किती भयंकर होतें ? शिवाय, प्रसूति नीट झाली तर बरें, नाहीं तर, शस्त्रवैद्य आंतील गर्भाचे तुकडे तुकडे करून टाकतो ना ?

शिव शिव ! त्यावेळीं त्या जिवंत पिंडास काय वाटत असेल बरें ? मी आतां विषयसुख सेवन करावयाचें, म्हणजे तशा प्रकारें पांच चार बालहत्या करविण्यास कारणीभूत व्हावयाचें ! असेंच नव्हे का ? अथवा, आपण पुनः तशा जन्मास आलों, तर आपल्या स्वतःच्या देहाचे तुकडे तुकडे करून घ्यावयाचे ! हेंच ना येथें राहून संपादावयाचें ?

बरें, तेंही असो. मुलेंबाळें झालीं, तरी तीं चांगलीं खातींपितीं होईपर्यंत मीं जगेन, म्हणून तरी नियम काय ? बरें, माझ्यापूर्वी तीं गेलीं, तरी रडत बसण्याचा प्रसंग आहेच ! बरें, दोघें कांहीं दिवस चांचलों, पण तीं आजारी वगैरे पडलीं, तरी, धांवपळ करितां पुरे-वाट ! बरें, तीं निरोगी व दीर्घायु झालीं असें मानलें, तरी तीं चांगलीं सद्गुणी निघालीं पाहिजेत. तशीं तीं निपजतीलच, म्हणून तरी काय प्रमाण ? मुलें दुर्व्यसनी निघाल्यानें, मातापितरांस काय काय सोहाळे करून घेण्याचा प्रसंग येतो, तो **सर्वानुभव-सिद्धच** आहे !

मिळून, या संगमसुखास संगमसुख हें नांव कोणा विषयलंपट पुरुषानें दिलें असेल तें असो. विचार दृष्ट्या, त्यास **"संगम दुःख"** हें नांव यथार्थ शोभेल !

आतां, हें सर्व संगमसौख्या बद्दल झालें. बाकी **राज्य, वैभव, वस्त्रालंकार**, व हें सौंदर्यपूर्ण **तारुण्य**, हीं प्रत्येक क्षणाक्षणाच्या ठिकाणीं **जीर्ण** होत चाललीं आहेत ! नदींचें पाणी जसें सहजदृष्ट्या पहातां, स्थिर आहेसें वाटतें मात्र, पण वस्तुतः तें एकसारखें खालीं वाहत जाऊन, त्या जागीं नवीन नवीन येत असतें, त्याचप्रमाणें, वरील सर्व संपत्तीची स्थिति आहे !

महाराज ! या प्रमाणें माझ्या मनांत अनंत विचार तरंग येत

आहेत. ते मी निर्मलांतःकरणानें चरणा पुढें मांडिले आहेत! याकरितां, मला हें लौकिक सौख्य नको आहे ! मजवर जर आपली खरी कृपा असेल, तर **ज्या सुखाचा कधींही नाश नाहीं**, असें सुख मला द्या.

आपण मला येथें राहण्यास सांगतां, ठीक आहे. मी राहात्ये. पण मला येथें कधींही आधि व्याधि प्राप्त होतां नये ! असें ठेवावयाचें असेल तर खुशाल ठेवा. मी तयार आहें, रहात्यें !

**शिव**—शाबास ! धन्य आहे तुह्मां तिघांची ! तुह्मी खरोखर महाभाग्यशाली असून, अक्षय सुखाचे खरे हक्कदार आहां !

**राजा**—तर मग महाराज ! आह्मांस तें लवकर प्राप्त होईल, अशी कृपा करावी !

**शिव**—ठीक आहे. राजा ! तुह्मांस तें येथेंच प्राप्त करून दिलें असतें, परंतु तसें करण्यास दोन अडचणी आहेत.

**पहिली**-ही कीं, जेथें अनंत प्रकारच्या अनंत उलाढाली चालल्या आहेत, अशा राजधानी सारख्या गजबजाच्या ठिकाणीं, मनाची एकाग्रता होणें नाहीं. व **दुसरी**-अडचण ही कीं, तुह्मां तिघांनाही आपापले देह लवकरच सोडावे लागणार आहेत, ते एकदम येथें ठेविल्यास, राजवाड्यांत मोठा हाहाःकार होईल ! या करितां, आपण एखाद्या पवित्र, एकांत स्थळीं जाऊं. ह्मणजे सर्व ठीक होईल !

**राजा**—( दोघींस ) कसें काय ?

**तारा**—हो ! ही मी तयार आहें !

**राजा**—( राणीस ) तुमचें ?

**राणी**—मी तर केव्हांपासून आपली वाट पहात आहें !

**राजा**—ठीक आहे. महाराज ! बोलतां बोलतां सर्व रात्र निघून गेली ! चांगलें दिसूं ही लागलें ! कोणास न सांगतां जाणें, बरोबर नाहीं. करितां " तीर्थयात्रेस जातों " ह्मणून सर्वांस सांगून जाणें, जरूर आहे.

**शि०**—हो हो. बरोबर आहे ! एकाएकीं येथून नाहींसें झाल्यास, राज्यांत अव्यवस्था होण्याचा संभव आहे.

**राणी**—मग **प्रधान, सेनापति** वगैरे यांस, इकडेसच पुढील दिवाणखान्यांत बोलवावें.

**राजा**—होय, तसेंच करूं. कोण आहेरे !

**शिपाई**—जी सरकार !

**राजा**—जा, **प्रधानजी, सेनापति, सुमंत** वगैरे सर्व प्रमुख कामगार मंडळीस जरूर आतांचे आतां बोलावून आण. **प्रधानजींस** मात्र, सहकुटुंब येण्यास सांग.

**शिपाई**—आज्ञा सरकार ! ( जातो ).

**शिव**—शाबास ! राजा, तुम्हां **तिघांचीही** धन्य आहे ! "तुम्हां तिघांसही आतां आपापले देह लवकरच ठेवावे लागणार" म्हणून मी सांगितलें असतां ही, यत्किंचित् सुद्धां न डगमगतां, तुम्हीं तिघांनीं आपल्या मनाची **समता** स्थिर राखली; हें पाहून, मला फारच समाधान होत आहे ! प्रापंचिक जनांत, असा प्रकार कोठें ही दिसून येण्याचा संभव नाहीं ! कधीं कोणी त्रासानें "मला मरण येवो" म्हणत असेल, पण तें, " आतां जवळ येऊन ठेपलें," असें कळतांच, घाबरगुंडी झाल्याशिवाय रहात नसते !

**तारा**—महाराज ! जगांत, ही उलटी समजूत होऊन बसली आहे ! जें खरोखर दुःसह **दुःख**, त्यास म्हणतात **सुख**; व जें अक्षय अनंत **सुख**, त्यास म्हणतात **दुःख** !

**राणी**—अखंड सुखप्राप्त्यर्थ जात असतां, भीति बाळगण्याचें कारण काय ?

( तोंच, दिवाणखान्यांत, प्रधान वगैरे मंडळी येऊन बसल्याचें शिपाई कळवितो. )

**राजा**—ठीक आहे ! जा, **विजयराज** महाराजांस दिवाणखान्यांत घेऊन ये.

**शिपाई**—आज्ञा ! ( जातो ).

**राजा**—चला तर, आपण सर्व तिकडेसच जाऊं. महाराज ! आपणही क्षणभर तेथेंच चला बसा.

**शिव**—ठीक आहे चला. ( सर्व जातात ).

---

## प्रवेश २ रा.

( **स्थळ**—दिवाणखाना ).

**राजा**—माझे विश्वासू प्रधान **दौलतरावजी** ! मीं काल केलेला ठराव, आपणा सर्वांस माहितच आहे ! त्याप्रमाणें या राज्याचे मुख्य प्रधान आपण असून, शिवाय, या बालराजाचे शिक्षक व संरक्षकही आपणच आहां ! करितां, तें काम फारच उत्तम प्रकारें करावें !

**प्रधान**—( हात जोडून ) महाराज ! आपली आज्ञा शिरसा-मान्य आहे !

**राजा**—तसेंच, **सेनापति** !

**सेना०**—( हात जोडून उभा रहातो ).

**राजा**—आपणही आपलें काम फार दक्षतेनें चालवावें. सर्व रा-ज्याचें संरक्षण आपल्या हातीं आहे. तेव्हां तें काम किती जबाबदारीचें आहे, तें आपण जाणतच आहां. सर्व प्रजाजनांचे प्राण, आपल्या हातीं आहेत, असें ह्मटलें तरी चालेल.

**सेना०**—महाराज ! मी स्वतःचें काम किती काळजीपूर्वक करित आहें, त्याची साक्ष, राज्यांतील सांप्रतची स्वस्थताच देत आहे !

**राजा**—तसेंच, आपण **सुमंत** !

**सुमंत**—( हात जोडून उभा रहातो ).

**राजा**—प्रधानजी व सेनापती हे जरी राज्याचे मुख्य **स्तंभ** आहेत, तरी राज्यशकट चालविण्याच्या कामीं, आपलें महत्व कमी आहे असें नाहीं. याकरितां, त्या उभयतांस आपण चांगल्या प्रकारें सहाय करावें.

**सुमंत**—सरकार ! आपले एकूण एक मांडलिक आपआपली खंडणी सालोसाल बिनतक्रार देत असून, सरकारवर पूज्यभावना ठेवित आहेत. हीच माझ्या कामाची साक्ष आहे !

**राजा**—त्याचप्रमाणें बाळा, **विजया** !

**विजय**—( हात जोडून उभा )

**राजा**—तुझे सद्गुण पाहून, मी पराकाष्ठेचा खुषी आहें! सुदैवानें, प्रधान, सेनापति, व सुमंत आदि मंत्री मंडळही फारच योग्य आहे ! करितां, त्यांपासून घ्यावयाचें तें योग्य शिक्षण घेत जा. त्यांवर दयादृष्टि ठेव ! त्यांस चांगल्या कामगिरीबद्दल वरचेवर बक्षीस देत जा. ! तसेंच, सर्व प्रजाजनांस पुत्रप्रेमानें वागवीत जा !

**विजय**—महाराज ! सरकारची आज्ञा शिरसावंद्य आहे. पण **तात महाराज** ! आज हा अगदीं प्रातःकाळींच दरबार भरविण्याचें कारण कांहीं लक्षांत येत नाहीं.

**प्रधान**—सरकार ! मीही हाच प्रश्न करणार होतों, पण **बालमहाराजां**नींच केला, बरें झालें !

**राजा**—माझ्या **विजया** ! त्याचप्रमाणें, **प्रधानादि** सर्व मंत्री मंडळहो ! आज आपणा सर्वांस अवेळीं येण्याची तसदी इतक्याच करितां दिली कीं, मी आजच एक विशेष प्रकारची ठरविलली गोष्ट, आपणा सर्वांस कळवावयाची आहे !

**विजय**—कोणती बरें, तात महाराज ?

**राजा**—ती ही. घरांत **राणी**साहेबांची प्रकृति पुत्रशोकानें दिवसें दिवस अधिकाधिक बिघडत चालली आहे. पुत्रसुखाची उणीव, ( विजयाच्या हनुवटीस हात लावून ) बाळा ! तुझ्या मधुर भाषणानें बहुतेक सर्व भरून आलीच आहे ! पण, त्यांच्या मनास बसलेला धक्का, कांहीं केल्या अद्याप कमी होईना ! याकरितां, थोडे दिवस कोठें तरी एखाद्या पवित्र तीर्थक्षेत्रास जावें, म्हणजे त्या एकांतस्थळीं, त्यांच्या जिवास समाधान वाटेल, असें वाटल्यावरून, वरील बेत निश्चित केला आहे.

**विजय**—जशी महाराजांची इच्छा ! पण इतक्याच गोष्टीकरितां एवढ्या सकाळींच दरबार भरविला ?

**राजा**—होय बाळा ! इतक्याचसाठीं.

**विजय**—म्हणजे ? निघायचें कधीं ?

**राजा**—आतां हे निघालोंच ना ? पण, आपणां सर्वांस कळविल्याशिवाय जाणें, नीट नव्हे. असें वाटल्यावरून, हा दरबार भरविला आहे.

**विजय**—पण सरकार ? सोबत पाठवावयाच्या लोकांची, व सामान सुमानाची वगैरे, आतांच्या आतां तयारी कशी होणार ? करितां, मला दोन दिवसांचा तरी अवकाश मिळावा सरकार ! अशी हात जोडून प्रार्थना आहे.

**राजा**—सोबत नोकर चाकर किंवा सामानसुमान कांहींही घ्यावयाचें नाहीं ! फक्त आह्मीं तिघांनींच सडें निघावयाचें. असें राणीसाहेबांचें मत आहे.

**विजय**—तिघे कोण कोण ?

**राजा**—आह्मी दोघें, व तिसऱ्या तुझ्या मावशीबाईसाहेब !

**विजय**—( राणीस मिठी मारून ) **माई**साहेब ! आपण एकाएकीं तीर्थयात्रेस जाण्याचें ठरविलें, हें काय ? मजकडून कांहीं अपराध झाला असल्यास, मला आपल्याशिवाय कोण बरें क्षमा करणार ?

**राणी**—( त्यास कुरवाळून ) बाळा ! नाहींरे नाहीं ! तूं माझा अपराध तर नाहींच केला, पण मला आपल्या सदगुणांनीं वेड लावून सोडिलेंस !

**विजय**—हो! ह्मणूनच वाटतें हें मला सोडून दूर जाण्याचें ठरविलें!

**राणी**—बाळा ! माझ्या छातीस, त्या भयंकर प्रसंगामुळें जो धक्का बसला आहे, तो कांहीं केल्या कमी होत नाहीं. ह्मणून कोठें तरी एकांतस्थळीं जाऊन, त्या दुःखाचा विसर पडतो तर पहावयाचा. फक्त हा एक उपाय आहे.

**विजय**--तर मग, सोबत कांहीं सरंजामही नको ह्मणतां हें काय ?

**राणी**—बाळा, **विजया** ! सोबत लवाजमा घेतला ह्मणजे, जागजागचे मांडलिक प्रजाजन, कोठें उत्सव, कोठें मानपत्रें, कोठें

समारंभ वगैरे करणार, व त्यामुळें त्यांस व आह्मांसही फुकटचा त्रास होणार; करितां,नुसतें साधारण माणसांप्रमाणें सडेंच निघावयाचें ठरविलें आहे. याच्या योगें आपल्यास कोणी ओळखणार नाहीं.

**विजय**—बरें, पण आपण सर्व लवकर यालना ?

**राणी**—प्रकृतीस आराम वाटतांच, आह्मी येथें आहोंच समज !

**विजय**—मग **माईसाहेब** ! माझ्या मावशीबाईला आणखी बरोबर कशाला ?

**राणी**—बाळा ! ती माझी प्राणरक्षक आहे. करितां, मला तिजवांचून मुळींच चैन पडावयाचें नाहीं. म्हणून तिला बरोबर नेत्यें, बरें का ! ( कुरवाळून चुंबन घेत्ये ).

**विजय**—( तिजकडे जाऊन ) काय मावशीबाई साहेब ! आपण ही चाललां ! बरं, लवकर या हँ !

**तारा**—ठीक आहे ! माझ्या बाळा, तूं चांगला शहाणा होऊन, नांवलौकिक मिळव बरं का ?

**विजय**—ठीक आहे, मावशी ! पण तात महाराज! एक विनंति आहे !

**राजा**—बोल, कोणती बरें बाळा !

**विजय**—महाराज ! आपण चाललां, **माईसाहेब** चालल्या, सोबत **तारा**मावशीबाईसही घेऊन जाणार ह्मणत, मग, येथें मजकडे कोण ?

**राजा**—बाळा ! त्याबद्दल पूर्ण तजवीज करून ठेवण्यासाठींच, मी प्रधानजींस सहकुटुंब बोलाविलें आहे.

**विजय**—ह्मणजे ?

**राजा**—ऐक. ( दौलतरावास )**दौलतराव** !

**दौल०**—( हात जोडून उभा राहतो ).

**राजा**—आपल्यास सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. पण सांगतों कीं, आपण सहकुटुंब आतां येथें राजवाड्यांतच रहा ! मुलगा जरी मीं दत्तक घेतलेला आहे, तरी बालपणापासून त्याचें संगोपन आपणच

१४

केलें आहे! करितां, त्याचें सर्व प्रकारें **बरें** करणें, आपल्याकडेसच आहे. अर्थात्, आणखी निराळें सांगणें नको. (तारेस) **तारे,**

**तारा**—सरकार!

**राजा**—यांच्या कुटुंबाचें नांव काय?

**तारा**—(प्रधानस्त्रीस विचारत्ये).

**प्र०स्त्री**—(हळूच) **महालक्ष्मी**बाई!

**तारा**—सरकार! **महालक्ष्मी**बाई!

**राजा**—(तीस) **महामक्ष्मी**बाई! जरा पुढें या!

**म०ल०**—(येऊन नमस्कार करित्ये, व हात जोडून) सरकार!

**राजा**—तुह्मी उभ्या किती वेळ? बसा.

**म०ल०**—(बसत्ये).

**राजा**—सर्व प्रकार तुह्मी ऐकतच आहां! मुलगा तुमचा आहे! घरांत आपल्याशिवाय दुसरें कोणीही जाणतें माणूस नाहीं. करितां, सर्व कांहीं व्यवस्था **तुह्मी** पहावयाची!

**म०ल०**—आज्ञा सरकार!

**राजा**—झालें! आमच्या दरबारचें काम पुरें झालें! आतां सर्वांचा निरोप घेतों!

(प्रधानाशिवाय बाकी सर्व, राजास नमन करून जातांना) परमेश्वर तुमचें सर्वांचें कल्याण करो!

**प्रधान**—(राजास व राणीस नमस्कार करितो) प्रिये, सरकारांस पुनः नमस्कार कर!

**म० ल०**—(उभयतांस नमस्कार करित्ये.)

**प्रधान**—(तारेस नमस्कार करावयास जातो.)

**तारा**—छे! छे! हें काय! ही पहा, मी आपल्यास नमन करित्यें! (नमते).

**प्रधान**—नाहीं, नाहीं, **ताराबाई**! आपण तर साक्षात् **देवीच** आहां! (तिला वंदन करितो) प्रिये, यांनाही वंदन कर, यांची योग्यता तुला माहीतच आहे!

**म०ल०**—होय महाराज ! ( तिला नमस्कार करित्ये ).

**विजय**—( डोळे चोळीत ) बरें,तात महाराज ! सर्वजणें लवकर या बरें ! **माई**साहेब, **मावशी**बाई ! लवकर याहाँ ! ( त्या सर्वांस नमन करितो).

**तिघें**—परमेश्वर तुला **चिरंजीव** करून,सर्व प्रकारें **सुखी** ठेवो !

**राजा**—बरें आतां येतों. चला प्रियांनों !

**दोघी**—( महालक्ष्मीस ) बरं, **महालक्ष्मी**बाई येतों हँ ! **विजयास** सांभाळा ! येतों !

**विजय**—या हँ ! ( डोळे चोळतो. )

**तिघें**—( त्यास हुंगून ) येतों. येतों हँ ! ( जातात. )

( मागून कांहीं मंडळी चार पावलें पोंचवण्यास ह्मणून जाते. त्यांस मार्गस्थ करतात, सर्व पुनः पुनः मार्गे वळून डोळे चोळीत जातात ).

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळ—मार्गक्रमण. )

**राजा**—प्रभो **शिवराया** ! चलावें, आतां !

**शिव**—राजा, चला मुलींनों, चला या! काय? मन घट्ट आहे ना?

**राणी**—महाराज ! त्याबद्दल आपण यत्किंचित्‌ही काळजी करूं नये !

**तारा**—महाराज ! आमच्या मनाची परीक्षा अद्यापहि व्हावयाची आहे का ?

**शिव**—(स्वगत) अहाहा ! मनोभूमीची **कमावशी** तर, फारच उत्तम केलेली आहे! आतां काय,फक्त बीजारोपण करावयाची खोटी! तें होतांच, एकदम जोमदार **ज्ञानांकुर** वर येणार ! ( उघड ) बरें राजा, आपण येथून कोणत्या क्षेत्रीं जावें बरें ?

**राजा**—महाराज, आपण योजना कराल त्याप्रमाणें.

**शिव**—राजा ! मला वाटतें, येथून आपण **हरिद्वार** नामक क्षेत्रीं जावें. कारण, तें पवित्र **त्रिवेणी**काठचें, अत्यंत रम्य आणि

एकांत स्थळ आहे ! त्या ठिकाणीं ज्ञानोपदेशाचें कार्य उत्तम होऊन, शिवाय त्यांत दुसराही एक हेतु साध्य होणार आहे.

**राजा**—तो कोणता बरें ?

**शिव**—अरे, या तुमच्या जड देहाचें खरें सार्थक्य होणार आहे.

**राणी**—महाराज ! आमच्याविषयीं केवढी बरें आपली ही सकरुण बुद्धि !

**तारा**—बाईसाहेब ! आतां आपले मायबाप, व इष्टमित्रबंधु सगळे तेच आहेच ! त्याअर्थी, आमची काळजी दुसरा कोण बरें वाहणार !

**राजा**—बरोबर आहे. चला या जलदी. काय दमलां का ?

**तारा**—नाहीं ! दमतों कशानें ?

**राजा**—प्रियांनो ! चालण्याच्या श्रमानें व उन्हाच्या तापानें तुह्मी अगदीं थकून गेलेल्या दिसतां, तरी बोलण्याची **सफाई** कशी! असो. महाराज ! आमचें **हरिद्वार** क्षेत्र अद्याप बरेंच दूर असेल, नाहीं बरें ?

**शिव**—नाहीं, आतां आपण **हरिद्वारा**च्या अगदीं नजीक आलों. पण राजा ! तूं यांना **अष्टधाप्रकृतीची** माहिती दिली आहेस ना ?

**राजा**—होय महाराज ! मला जितकी होती, तितकी दिली आहे.

**तारा**—ही संपूर्ण सृष्टि, **पंचमहाभूतें** व **त्रिगुण** यांची **प्रत्यक्ष मूर्ति** आहे, ही गोष्ट आह्मांस समजली.

**राणी**—महाराज ! मी तर, निघाल्या पासून मार्गांतील प्रत्येक वस्तु, ह्याच दृष्टीनें पहात चालल्यें आहें !

**शिव**—मुलींनों ! बरोबर आहे. शिकलेल्या विषयाचें **श्रवण** झाल्यावर, लागलेंच त्याचें **मनन** झालें पाहिजे. मनन झालें कीं, **निजध्यास** ठेवलेला. चला, आपण आपल्या विवक्षित स्थळीं आलोंच ! चला, या टेंकडीच्या पलीकडे जाऊं; ह्मणजे झालें. चला.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था.

( **स्थळ**—हरिद्वार. त्रिवेणी तीर. जंगली एकांत स्थळ. )

**शिव**—राजा, पाहिलें काय ? कसें एकांतस्थळ आहे !

**राजा**—अहाहा ! महाराज, फारच रम्य स्थळ खरें !

**राणी**—ही रम्य शोभा पाहून, मनुष्य तहानभूकही विसरून जाईल !

**तारा**—तहान भूकचशी काय? स्वतःच्या **देहाचेंही** भान नाहींसें होईल, असें मला वाटतें. !

**शिव**—शाबास ! **तारे**, बरोबर बोललीस ! या आतां, आपण या पवित्र **त्रिवेणी**चें स्नान करूं. ह्मणजे सर्व श्रम परिहार होऊन, अंतःकरण प्रसन्न होईल !

( सर्व स्नान करून धूतवस्त्र परिधान करून येतात. )

**शिव**—( आसनस्थ ) काय, झालीं स्नानें ? या आतां इकडे मजसमोर बसा.

**तिघे**—( नमस्कार करून हात जोडून बसतात. )

**शिव**—राजा ! ज्याप्रमाणें, या **स्नानानें** बाह्यांगशुद्धि केली, त्याचप्रमाणें एकाग्रचित्तानें **अंतःशुद्धि** करा.

**तिघे**—आज्ञा महाराज !

**शिव**—तुह्मां तिघांनाही **पंचमहाभूतांचें** विवरण समजलेंच आहे.

**राजा**—होय महाराज ! ही सृष्टि, **अष्टधाप्रकृति**युक्त आहे, हें समजलें.

**शिव**—बरें, ही अष्टधाप्रकृति, सृष्टींतील कोणकोणत्या वस्तूंत असते !

**राणी**—काष्टपाषाणादि प्रत्येक वस्तूंत ही आहे.

**शिव**—पशुपक्षादि प्राण्यांत आहे कीं नाहीं ?

**तारा**—महाराज ! पशुपक्षादि प्राणी, काष्टपाषाणादिकांहून पुष्कळ **भिन्न** दिसतात.

**शिव**—कसे ?

**राणी**—महाराज ! काष्ठ पाषाण, **चलनवलन** करीत नाहींत.

**शिव**—मग ? पशुपक्षादि प्राणी, अष्टधाप्रकृतींत मोडतील कीं नाहीं ?

**राजा**—महाराज ! सृष्टींत अष्टधाप्रकृतीशिवाय जर दुसरें कांहींच नाहीं. असें पूर्वीं ठरलेलें आहे, तर हे प्राणीही, तींत असलेच पाहिजेत.

**शिव**—मग तुह्मांस संशय कसला ?

**राजा**—प्राण्यांच्या ठायीं चलनवलनशक्ति आहे. इतकाच विशेषपणा दिसतो.

**शिव**—राजा, तो विशेषपणा ह्मणजे, **त्रिगुण** व **पंचमहाभूतें** यांच्या सप्रमाणतेच्या **न्यूनाधिक्यतेचा** प्रभाव होय ! दुसरें कांहीं नाहीं. याचा खुलासा पुढें होईल. बरें राजा ! आतां मजसमोर बसले आहेत कोण कोण ?

**राजा**—**मी, राणी** व **तारा.**

**शिव**—मुली, आतां तूं सांग. याच प्रश्नाचें उत्तर ?

**राणी**—**मी, सरकार** व **तारा.**

**शिव**—ठीक. तारे, आतां तूं सांग.

**तारा**—**सरकार, बाईसाहेब** व **मी.**

**शिव**—आपण प्रत्येकानें तीन नांवें घेतलीं. ह्मणजे, मजसमोर नऊ व्यक्ति आहेत काय ?

**राणी**—नाहींत. प्रत्येकानें दुसऱ्यांचीं नांवें पुनः पुनः घेतलीं आहेत.

**शिव**—प्रत्येकानें, नांव उच्चारिलें नाहीं कोणाचें ?

**तारा**—**आपलें.**

**शिव**—आपल्या नांवाबद्दल, त्यानें आपल्यास काय ह्मटलें आहे?

**तारा**—**मी. मी. मी.**

**शिव**—शाबास! तर मग सांगा. आपल्यांत जो हा कोणी "**मी**" ह्मणून आहे, तो कोण ?

**राणी**—यांत काय आहे ? सरकारच्या उत्तरांत, **मी** ह्मणजे **सरकार**, तारेच्या उत्तरांत, **मी** ह्मणजे **तारा**, व माझ्या उत्तरांत, **मी** ह्मणजे **मी.**

**शिव**—मुली, **मी ह्मणजे मी,** या म्हणण्यांत अर्थ कांहींच दिसत नाहीं. तो **मी,** प्रत्यक्ष **अमुक** ह्मणून तुला दाखवितां येईल काय ? **राजा** व **तारा** ( फारच विचारांत पडतात ).

**राणी**—महाराज ! हीहीं इतका कसला विचार करीत आहेत कोण जाणे ? मला तर, तो **मी**, सहज दाखवितां येईल.

**शिव**—ठीक आहे. दाखीव पाहूं !

**राणी**—( छातीस हात लावून ) हा पहा !

**शिव**—मुली! या तुझ्या उत्तरांत तीन प्रकारची भ्रांति उत्पन्न होते !

**राणी**—**भ्रांति** ? ती कशी ?

**शिव**—या तुझ्या खुणेनें, हा सगळा **देह**, ही **बोटी**, व ही **छाती**; या तिहींपैकीं, तूं कोणास, " **मी** " ह्मणत आहेस, याचा खुलासा होत नाहीं. तो झाला, ह्मणजे झालें !

**तारा**—नुसत्या **बोटीस** किंवा **छातीसच** " **मी** " ह्मणण्यापेक्षां, त्यांनीं सर्व **देहासच** " **मी** " ह्मटलें असलें पाहिजे, होयना बाईसाहेब ?

**राणी**—होय, महाराज ! हा **सगळा देह**, ह्मणजे **मी**.

**शिव**—तारे, खरें ना ?

**तारा**—होय, सारा देह ह्मणजे **मी**.

**राजा**—होय. दुसरा कोण असणार ! **देहच**.

**शिव**—( टाळी मारून ) बस्स ! मला हेंच पाहिजे होतें ! बंधुभगिनिंनो, चूक ह्मणून काय, ती हीच होत आहे ! सर्वच भ्रांतीचें मूळ, हा " **मी** " आहे. त्याची ओळख नाहीं, हेंच **अज्ञान** आहे. व त्याची ओळख करून घेणें, हेंच **ज्ञान** !

**राजा**—असें का ? ह्मणजे हा "**मी**" शब्द, फारच महत्वाचा आहे तर !

**शिव**—होय. फारच महत्वाचा आहे. अरे, ही सर्व सृष्ट्युत्पत्ति एका "**मी**" वरच उभारली आहे. जर "**मी**" नाहीं, तर ही **सृष्टिच** नाहीं !

**तारा**—तर मग, महाराज! त्वरा करा. आणि आह्मांला तो **"मी"** लवकर दाखवा !

**शिव**—पण, तुह्मांला क्षुधा वगैरे लागली असेल, करितां, कांहीं फलाहार करून घ्या अगोदर.

**तिघे**—महाराज ! आह्मांस क्षुधातृषादिकांची यत्किंचित्‌ही बाधा नाहीं ! प्रकृति छान समाधान आहे ! या **अमृतरसापुढें, अन्नरसाचें** महत्व तें कसलें ? चालूंद्या पुढें, महाराज !

**शिव**—( स्वगत ) काय हा अधिकार पहा ! वाहवा ! यांना क्षुधातृषादिकांची स्मृतिही नाहीं. ! ( उघड ) मुलींनों, तुह्मीं जो हा देह ह्मणजे **"मी"** ह्मणून सांगितलें, तें अगदीं खरें नाहीं !

**तारा**—काय ? हा **देह** ह्मणजे **मी** नाहीं ?

**राणी**—तर काय ? तो **"मी,"** या देहाहून कोणी **निराळा** आहे ?

**राजा**—देह, हा कांहीं **मी** नव्हे, ह्मणून जर महाराज सांगत आहेत, तर तो, या देहाहून **निराळा**, हें उघडच आहे !

**शिव**—ऐका. चित्त एकाग्र करा.

ज्या प्रमाणें, गवाक्षद्वारयुक्त असें एखादें सुंदर मंदीर असतांहीं त्यांत दिवा नसल्यास, अंधकारामुळें तें शून्यवत् होतें; त्याचप्रमाणें हें शरीर परप्रकाशित असें, सुंदर **मंदिर** आहे !

**राजा**—परंतु महाराज ! मंदिराला दरवाजे असतात !

**शिव**—आणि यालाही पूर्व पश्चिम दरवाजे आहेत ! **मुख**, हा पुढील दरवाजा असून, **गुदद्वार**, हा मागील दरवाजा आहे !

**तारा**—( मान डोलावून ) बरोबर ! ह्मणजे, पुढील दरवाजानें घरांत जे जिन्नस येऊन पडतात, त्यांचा टाकाऊ भाग, ह्मणजे केरकचरा, मागच्या दरवाजानें बाहेर टाकून द्यावयाचा !

**सर्व**—( हासतात. )

**राणी**—पण या मंदिरास खिडक्या ?

**शिव**—त्याही आहेत !

**राणी**—कोणत्या ?

**राजा—डोळे !**

**तारा**—आणि **नाक** व **कान!** ह्याही खिडक्या तर काय ?

**शिव**—होय, पहिल्या दोन खिडक्या, बाहेरील सर्व दृश्य सृष्टीचा **देखावा** दाखवितात. दुसऱ्या दोन खिडक्या, घराच्या जवळपास कोणकोणत्या प्रकारचा **गंध** आहे, हें धन्यास समजावतात. व तिसऱ्या दोन खिडक्या, घराच्या आसपास काय **शब्द** होतो आहे, हें मंदिराच्या मालकास कळवितात !

**राणी**—समजल्यें. ह्मणजे, आमच्या मनोऱ्यावरील **पूर्व** बाजूच्या खिडकींतून, जसा **डोंगराचा, पश्चिम** खिडकींतून **समुद्राचा**; व **उत्तर** खिडकींतून जसा **शहराचा** देखावा दिसतो, त्याप्रमाणेंच ! होय ना ?

**शिव**—होय ! मुली बरोबर दृष्टांत योजिलास ! मिळून किती खिडक्या झाल्या ?

**तारा**—सहा. पण महाराज ! मंदिराला **मोरी** असली पाहिजे !

**शिव**—ह्याही आमच्या मंदिराला मोरी आहे !

**सर्व**—( हंसतात )

**शिव**—मिळून, **दोन दरवाजे, सहा खिडक्या** व **एक मोरी**, मिळून या मंदिरास **नऊ द्वारें** आहेत !

**तारा**—पण महाराज! आपण मघांशी, वरील खिडक्या, आपापला विषय, मंदिराच्या मालकास दाखवितात, ह्मणून बोललां. पण या मंदिराला **मालक कोण**, तो नाहीं सांगितला !

**शिव**—शाबास ! तारे, तूं मोटी चाणाक्ष मुलगी आहेस ! बोलणाराच्या मागच्या पुढच्या भाषणाकडे, असें अनुसंधान पाहिजे. ऐक. तुह्मी जो मघां **मी-मी-मी** ह्मणून सांगितला, तोच या मंदिराचा मालक आहे.

**तारा**—पण तो शरीराहून निराळा आहे ह्मणतां ना ?

**शिव**—उघडच ! मंदीर व मंदिराचा मालक, **एकच** का ?

**राणी**—छे! तो **एक** कसा होईल? मंदीर, तर, दगड, चुना, माती, लांकूड वगैरे यांचें! व मालक, हा तर बोलता चालता! मग दोन्ही एक कसे होणार?

**शिव**—शाबास! मुलींनो, तोच प्रकार या शरीराचा आहे.

**तारा**—काय? या शरिरांत दगड, माती, चुना वगैरे आहेत?

**शिव**—होय, अगदीं तोच प्रकार!

**राजा**—तर महाराज! तो प्रकार कृपा करून उघड करून दाखवा.

**शिव**—"**पंचमहाभूतां**शिवाय, जगांत **दुसरें कांहीं** नाहीं, हें तर खरें ना?

**राजा**—होय, **पंचमहाभूतें** व **त्रिगुण** ह्यांशिवाय जगांत कांहींही नाहीं.

**शिव**—गुणांचा समावेश भूतामध्यें आहेच. तरी त्यांचा स्वतंत्र विचार मागाहून करूं. पण अगोदर पंचमहाभूतांबद्दल सांगा.

**तारा**—ठीक आहे. नाहीं, " पंचमहाभूतांशिवाय, जगांत दुसरें कांहीं नाही. "

**शिव**—मग! तीं पंचमहाभूतें प्राण्यांतही आहेत ना?

**तारा**—असलीं तर पाहिजेतच; पण यांत चलनवलनशक्ति, एक जास्त दिसते.

**शिव**—बरें, चलन वलन शक्ति बाजूस ठेविली, असें मानिलें तर?

**राणी**—तर, त्यांत पंचमहाभूतांशिवाय काय असणार?

**शिव**—ज्याप्रमाणें **ओली जमीन** व **सूर्यकिरण**, यांपासून **वाफ**; किंवा, **काष्ठ** व **अग्नि**, यांपासून **धूर**; हें तिसरेंच एक द्रव्य आपोआप उद्भवतें, त्याचप्रमाणें, शरीरांतील या **पंचमहाभूतांच्या** सप्रमाण मिश्रणापासून, ही **अंतःशक्ति** उत्पन्न झाली आहे इतकेंच. वास्तविक, यांत पंचमहाभूतांशिवाय दुसरें कांहींही नाहीं!

**राजा**—पण जमीन आणि पाणी यांच्या मिश्रणावर, **सूर्याचें** किरण जेव्हां पडतील, त्याचवेळेस वाफ उद्भवते. पण सूर्यकिरण न पडले तर, वाफ उद्भवेल काय?

**शिव**—नाहीं.

**राणी**—तर मग, या पंचभूतात्मक देहावर, कोणत्या सूर्याचा प्रकाश पडला आहे ?

**शिव**—त्याच "**मी—मी**" **सूर्याचा** !

**तारा**—महाराज ! आपण केलेलें विवरण अगदीं बरोबर आहे. पण, पुनः "हा **देह** तोच **मी**" असें वाटतें. करितां, ही भ्रांति कृपा करून दूर करावी !

**शिव**—ठीक आहे, ऐका. मन एकाग्र करा. सृष्टींतील एकूण एक **स्थिरचर** पदार्थांत, ज्याप्रमाणें पंचमहाभूतें आहेतच, अशी आपली खात्री झाली आहे, त्याप्रमाणें, या तुमच्या **देहांतही**, पंचमहाभूतें आहेतच, ही खात्री बाळगा. कारण, देह ही कांहीं सृष्टीच्या बाहेरची वस्तु नाहीं.

**तारा**—काय ! आमच्या देहांतही **पंचमहाभूतें** ?

**राणी**—काय बाई, सर्वच आश्चर्य !

**राजा**—महाराज ! तीं क्रमशः ह्या आमच्या देहांत दाखवून देण्याची कृपा व्हावी !

**शिव**—ठीक आहे. राजा ! हीं **पंचमहाभूतें**, या देहांत दोन प्रकारें भरलेलीं आहेत.

**राजा**—कोणत्या ?

**शिव**—या देहांत प्रत्येक तत्व, **स्थूळरूपानें** असून, तेंच पुनः या देहांत **सूक्ष्मरूपानेंही** आहे.

**तारा**—तर मग, आतां हा पंचमहाभूतांचा प्रपंचजाळ, बराच वाढणारसा दिसतो ! याकरितां, सर्वच एकदम सांगून, हा प्रकार धडपणें लक्षांत भरणार नाहीं. आणि ह्मणूनच, अगोदर प्रत्येक तत्व या देहांत स्थूळरूपानें कसें कसें आहे तें सांगून, मग सूक्ष्मरूपाचें विवरण करावें; हें बरेंसें मला वाटतें.

**शिव**—ठीक आहे. तसेंच करितों. कोणताहि दृष्टांत देतांना, अदृश्य वस्तूपेक्षां दृश्य वस्तूचा दाखला, मनावर अधिक बिंबतो.

आणि पंचमहाभूतांमध्यें, **पृथ्वी** ही, पूर्ण जडत्वामुळें चांगली ठसठशीत दृश्य झाली असून, त्यापुढील तत्वें अधिक **विरळ** होत गेलीं आहेत! करितां, आरंभ पृथ्वीपासूनच करितों.

**राणी**—ठीक आहे, महाराज ! पृथ्वीपासूनच आरंभ व्हावा.

**शिव**—राजा, इकडे ये.

**राजा**—( जवळ जातो, व हात जोडून उभा राहतो. )

**शिव**—तूं **पृथ्वी** पाहिली आहेस ?

**राजा**—हो. ही सगळी पृथ्वीच !

**शिव**—बरें, तिचें रूप काय ?

**राजा**—घट्ट, जड वगैरे.

**शिव**—ठीक आहे. तर या शरीरांत तशा रूपाचा कांहीं भाग दिसतो काय ?

**राणी**—आमच्या देहांत दगड, माती, वगैरे कोठें आहे ?

**शिव**—वास्तविक दगड मातीच आहे. रक्तांत तर **लोखंडाचा** अंश आहे! पण, तुला तें मग समजेल, पण दगड, माती जरी प्रत्यक्ष नाहींत, तरी घट्ट जड वगैरे जो पृथ्वीचा धर्म, त्या धर्माचा कांहीं भाग, तुमच्या देहांत तुह्मांस दिसतो काय ?

**तिघे**—( आपआपले देह दाबून पाहतात. )

**राजा**—हो महाराज! मला वाटतें हीं **हाडें**, हा **पृथ्व्यंश** आहे.

**शिव**—शाबास ! याशिवाय आणखी कांहीं ? तारे ?

**तारा**—**मांस.**

**शिव**—हो. बरोबर आहे. आणखी ?

**राणी**—**शिरा, त्वचा** !

**शिव**—शाबास ! बरोबर बोललां ! याशिवाय ?

**राजा**—याशिवाय, आणखी कांहीं नाहीं महाराज दिसत !

**शिव**—आहे. आणखी एक आहे.

**राणी**—**दांत** !

**तारा**—ते तर हाडांत आले ! पुनः **दांत** काय ? मला वाटतें, महाराज ! **केंस** असावेत.

**शिव**—शाबास ! यावरून सांगा आतां, पृथ्वी कोण कोणत्या रूपानें या देहांत आहे ?

**राजा**—**१ अस्थि, २ मांस, ३ स्नायु, ४ त्वचा, ५केंस.** आमच्या देहांत पृथ्वी या **पांच** तत्वांनीं आहे.

**शिव**—बरोबर. पण या पांच तत्वांत, अत्यंत कठीण तत्व कोणतें ?

**राणी**—महाराज ! **अस्थि** हें तत्व, अत्यंत **कठीण** आहे.

**शिव**—त्याच्या खालोखाल ?

**तारा**—त्यापुढील चारी रूपें, दृढतेसंबंधानें कमी कमी होत गेलीं आहेत.

**शिव**—तसेंच, पृथ्वी हें जसें अत्यंत कठीण महाभूत म्हणून सांगितलें, तसेंच, **अत्यंत विरळ** महाभूत कोणतें असतें बरें ?

**राणी**—**आकाश !**

**शिव**—शाबास ! मग सांगा तर. हीं पृथ्वीचीं वरील पांचही रूपें, दृढतेच्या संबंधानें कमी कमी होत गेलीं आहेत, याचें कारण काय ? राजा ! तूं सांग.

**राजा**—कांहीं बरोबर लक्षांत येत नाहीं महाराज !

**राणी**—याला कांहीं विशेष कारण असेलसें वाटत नाहीं. महाराज ! सर्वच सारखीं केल्यास, देहरचना करतां येणार नाहीं, इतक्याच करितां तीं तशीं असावीं !

**शिव**—थोडेंसें समजलीस. पण अद्याप पुरतें नाहीं. **पृथ्वी** ही **पांच रूपांनीं** आमच्या देहांत आहे, **व महाभूतेंही पांचच** आहेत ! इतक्यावरूनच, तुमच्या लक्षांत ही खुबी यावी, पण कशी येत नाहीं, समजत नाहीं. तारे, तूं सांग पाहूं.

**तारा**—महाराज ! ही **पृथ्वी** जरी **एकच महाभूत** आहे, तरी तीही, **पंचमहाभूतात्मकच** आहे; असें सिद्ध करण्याकरितां, हीं पांच रूपें, पृथ्वीनें धारण केलीं असावीं.

**शिव**—शाबास ! समजलीस ! पण याचा नीट खुलासा कर पाहूं !

**तारा**—**आस्थि, मांस, स्नायु, त्वचा, केस,** हीं पांची मिळून एकच पृथ्वी खरी. तरी पण, **अस्थि** ही, **पृथ्वी गुणदर्शक** पृथ्वी. **मांस** ही, **आप गुणदर्शक** पृथ्वी. **स्नायु** ही, **तेजगुण-दर्शक** पृथ्वी. **त्वचा** ही, **वायुगुणदर्शक** पृथ्वी आणि **केश** ही, **आकाश गुणदर्शक** पृथ्वी आहे, असें मला वाटतें, महाराज!

**शिव**—( तिची पाठ थोपटून ) शाबास, तारे! अगदीं बरोबर बोललीस! काय राजा! आलें का लक्षांत?

**राजा**—होय महाराज! आलें लक्षांत. ( राणीस ) पाहिली? आमची **तारा** कशी बुद्धिवान् आहे ती!

**राणी**—( हंसते ) महाराज, माझ्या लक्षांत, आणखी दुसरी एक कल्पना आतां आली आहे.

**राजा**—कोणती बरें?

**राणी**—**त्वचा** ही, **वायु** गुणदर्शक पृथ्वी आहे. म्हणूनच वायूचा स्पर्श त्वचेला कळतो! यावरून, **त्वचा** व **वायु** यांचा सूक्ष्म **संबंध** आहे खरा.

**राजा**—हो, बरोबर! तसेंच, **मांस** यांत **पाणी** आहे, म्हणूनच तें **मऊ** झालें! **स्नायु**मध्यें **तेज** आहे, म्हणूनच किंचित् त्रास होतांच, शरीरांतील सर्व नाड्या **तडातड** उडूं लागतात! **केशांत आकाश** आहे, म्हणूनच, भारशून्य व अत्यंत **विरळ**, असें त्यांचें रूप आहे!

**शिव**—शाबास! ह्या पांच रूपांशिवाय, यादेहांत आणखी कांहीं पृथ्वीरूप आहे काय?

**तिघें**—( विचार करितात ).

**तारा**—नाहीं महाराज! आणखी नाहीं, असें वाटतें!

**शिव**—नाहीं, आणखी नाहीं. पंचमहाभूतांचे पंचगुण दाखविणारीं, हीं पांचच रूपें, पृथ्वीचीं आहेत. करा पाहूं. तर, या पांच रूपांचें पुनः मनन!

**तिघें**—( स्वतःशीं मनन करितात ).

**शिव**—झालें मनन ?

**तिघे**—होय महाराज !

**शिव**—तर सांगा पाहूं आतां. तुह्मी मघां, ' हा सगळा **देह**, ह्मणजे **मी**, ' असें ह्मणत होतां, तें तुह्मी, या पांच तत्वांपैकीं कोण ? **हाडें**, कीं **मांस**, कीं **केंस** ?

**राजा**—महाराज ! " मी " **हाडें, मांस, स्नायु, त्वचा,** किंवा **केंस** यांपैकीं **कोणीही** नाहीं !

**राणी**—हीं पांच रूपें जर मला दिसत आहेत, तर **तींच, 'मी'**. असें कसें होईल ?

**तारा**—मंदिरामध्यें मंदिराचा मालक राहतो, **मंदिर**,हाच मंदिराचा **मालक** कसा होईल ? नाहीं, असें आतां नुकतेंच ठरलें आहे. त्याचप्रमाणें हें !

**शिव**—झालीना बरोबर खात्री ? पृथ्वीच्या या पांच रूपांत, **मी** ह्मणून कोणी आहे का ?

**राजा**—नाहीं महाराज ! निश्चयानें नाहीं ! आतां ह्या देहांतील " **आप** " तत्व दाखवा. मला वाटतें, पृथ्वी प्रमाणेंच, ह्याही भूताचीं **पांच** रूपें असावीं !

**राणी**—त्यांपैकीं मलातर एक सुचलें ही !

**राजा**—कोणतें बरें ?

**राणी**—मला लाज वाटते बाई !

**शिव**—अग वेडे ! त्यांत लाज कसली ? सांग सांग.

**राणी**—**मूत्र** !

**शिव**—बरोबर आहे. या शिवाय आणखी ?

**तारा**—**रक्त**, हें ही एक पाण्याचें रूप असावें.

**शिव**—हो, बरोबर आहे. या शिवाय आणखी ?

**राजा**—**लाळ, घाम** !

**शिव**—शाबास ! किती झालीं ?

**तारा**—**मूत्र, रक्त, लाळ, घाम**,मिळून चार झालीं, महाराज!

**शिव**—किती पाहिजे आहेत ?

**राणी**--पृथ्वीच्या विवरणावरून पहातां, आणखी एक पाहिजे.

**शिव**—होय. **प्रत्येक** भूतांत, पुनः **पांच** भूतांचा अंतर्भाव आहे. मग, पहा आणखी कोणतें रूप सांगावयाचें राहिलें तें ?

**तारा**—पण वरील चार रूपें, कोणकोणत्या भूतांचीं, गुणदर्शक आहेत ?

**शिव**—मुलींनो ! तुह्मांस मघां सांगितल्याप्रमाणें, पृथ्वीपासून पुढील सर्व भूतें अधिकाधिक विरळ ह्मणजे सूक्ष्म होत गेल्यामुळें, त्यांचीं स्पष्ट रूपें, आतां उघडपणें लक्षांत येणार नाहीत. तीं फारच बारकाईनें, विचार दृष्टीनेंच पाहिलीं पाहिजेत. वरील चार रूपें, अनुक्रमें, **पृथ्वी, आप, वायु, आकाश** या चार भूतांचे गुण, दर्शविणारीं आहेत.

**राणी**—ह्मणजे **मूत्र** हें, अत्यंत **जड** असून, **घाम** हें अत्यंत **सूक्ष्म जलरूप** आहे.

**राजा**—अर्थात्, यांत **तेज** गुणदर्शक, **आप**रूप नाहीं! बाकीचीं आहेत.

**शिव**—होय, मग तें कोणतें ?

**दोघी**—( कानांत परस्पर )—सें वाटतें !

**शिव**—होय. तेंच. **वीर्य,** हें **तेजगुणदर्शक आपाचें** रूप आहे ! मुली, राज्ञी ! सांग पाहूं आतां आपाचीं पांचही रूपें !

**राणी**—**१ मूत्र, २ रक्त, ३ वीर्य, ४ लाळ, ५ घाम !**

**शिव**—बरोबर ! बघा आतां मघांप्रमाणें तपासून. एकाहून एक विरळ आहे कीं नाहीं तें !

**राणी**—हो ! आणखी मघांप्रमाणें, यांत पंचमहाभूतांचे, कांहीं कांहीं सूक्ष्म गुणहि दिसतात !

**तारा**—कोणते बरें ?

**राणी**—प्राण्याच्या आंगातील **वीर्य** गेलें, ह्मणजे **तेज** गेल्याप्रमाणेंच आहे ! आणि ह्मणूनच, मनुष्य सुद्धां त्याच्या अभावानें **निस्तेज** बनतो !

**शिव**—शाबास ! मुली, अगदीं बरोबर प्रमाण बांधिलें !

**तारा**—आणि, **घाम** तरी, **केशांच्या** मूळांत असणाऱ्या रंध्रांतूनच येतो ! व **केश** हे, **आकाश** गुणदर्शक पृथ्वी असल्या-बद्दल मघां ठरलेंच आहे. त्यावरून **घामही, आकाशगुणदर्शक आप** आहे, हें बरोबर जुळतें !

**शिव**—तारे, रास्त आहे ! आतां सांगा पाहूं पुनः, वरील पांच रूपांत तरी **मी** आहें काय? तपासा पाहूं प्रत्येकास ?

**राजा**—नाहीं, महाराज ! ह्यांतही कोणी **मी** नाहीं ! कारण, आह्मां प्रत्येकास, "मजपुढें आतां बसलें आहे कोण ?" असा महाराजांनीं मघां प्रश्न केला. त्याचें उत्तर आह्मीं प्रत्येकानें, **मी** ह्मणून दिलें. पण महाराजांपुढें **मूत्र रक्त, वीर्य, लाळ व घाम** यांपैकीं एकही कोणी बसलेलें नाहीं ! हें उघड आहे.

**शिव**—झाली खात्री ? मुलींनो, तुह्मांस समजलेंना ?

**दोघी**—होय, महाराज, बरोबर आलें लक्षांत !

**तारा**—आतां या शरीरांतील **तिसरें** तत्व **तेज,** ह्यांचीं पांच रूपें सांगावीं महाराज !

**शिव**—ठीक आहे. **१ आलस्य, २ मैथुन, ३ क्षुधा, ४,तृषा, ५ निद्रा** हीं पांच तेजाचीं रूपें या देहांत आहेत ! यांतही, वर सांगितल्याप्रमाणेंच फरक आहे.

**राजा**—हीं पांचही रूपें तर, पाण्याच्या रूपाहूनही फारच विरळ !

**शिव**—बरोबरच. "**तेज**" हेंच जर मुळी पाण्यापेक्षां विरळ, तर हींही, तशींच विरळ असणार. "**तेज**" कोठें प्रत्यक्ष धरावयास सांपडतें आहे ?

**राणी**—बरोबर आहे ! आणि **आलस्य** उद्भवलें कीं आंग **जड** होतें, ह्मणून तें, **पृथ्वी** गुणदर्शक **तेज** खरेंच ! याचप्रमाणें, **दुसरें** रूपही, "**आप**" तत्वाशीं बरोबर जुळतें !

**तारा**—आणि, **तिसरें क्षुधा** तत्व काय ? तें तर त्याही

पेक्षां स्पष्ट जुळतें! **क्षुधा** हें रूप, तेजगुणदर्शक **तेजाचें** आहे. यावरून, भूक लागली म्हणजे पोटांत कशी **आग** पडते, याचा अनुभव प्रत्येकास आहेच!

**राणी**—याचप्रमाणें, **तृष्णा** व **निद्रा** हीं दोन रूपें, **वायू** गुणदर्शक व **आकाश** गुणदर्शक **तेजाचीं** आहेत, हेंही सूक्ष्म विचारांतीं सहज समजेल. उन्हाळ्यांतील **कडक** हवेनें, शरीरांतील **आपतत्व** कमी झाल्यामुळेंच **तहान** ही लागत असते!

**शिव**—शाबास! बरोबर आहे!

**राजा**—आणि, **आकाश** जसें शून्यवत्, त्याचप्रमाणें **निद्रा**-कालीं. प्राण्यास सर्व शून्यवतच आहे!

**शिव**—ठीक! झाली आतां बरोबर खात्री?

**तारा**—होय, महाराज! झाली, आतां वायूचीं पांच रूपें सांगण्याची कृपा व्हावी.

**शिव**—ठीक आहे! ऐका:-**१ आकुंचन, २ प्रसरण, ३ धावन, ४ चलनवलन,** व **५ निरोधन**, हीं पांच रूपें **वायूचीं** असून, हींही मघांच्याच अनुक्रमानें पंचमहाभूतांचीं गुणदर्शक आहेत.

**राजा**—यांत तर सगळी मजाच आहे! **पृथ्वी** घट्ट गोळा आहे, व आपला देह **आकुंचित** केला कीं, तोही **घट्टगोळाच** बनतो! म्हणून **आकुंचन**, हें रूप **पृथ्वीगुणदर्शक**, खरें!

**राणी**—पाण्याचा धर्म पसरण्याचा आहे. म्हणूनच, "**प्रसरण**" हें रूप **आपगुणदर्शक वायूचें** खरें. त्याचप्रमाणें, **धावन** हें **तेज**-युक्त **वायूचें** रूप आहे. अर्थात्, आंगांत तेज असेल, तरच धांवणार. म्हणून तेंही बरोबर जुळतें!

**राजा**—याचप्रमाणें **चलन वलन**! हें तर उघडच **वायुगुण**-दर्शक. शिवाय, **निरोधन** समयीं पोटाची **पोकळी** कशी ताणली जाते, याचाही अनुभव प्रत्येकास आहेच!

**तारा**—महाराज! वायूचीं हीं पांची रूपें समजलीं. आतां **आकाश** तत्वाचीं पांचही रूपें सांगावीं.

**शिव**—१ काम, २क्रोध, ३ लोभ, ४ मोह, ५ भय, हीं पांच रूपें, या देहांत **आकांशाचीं** आहेत ! व यांतही वर दाखविल्याप्रमाणेंच पांच प्रकारचा सूक्ष्म फरक आहे.

**तारा**—महाराज ! आलीं सर्व लक्षांत. आतां हीं सगळीं तत्वें मी क्रमानें सांगूं ?

**शिव**—सगळीं एकदम सांगशील का तूं ?

**तारा**—हो ! आतां सांगायाला काय आहे त्यांत ? सहज सांगेन. त्यांतून चुकल्येंच, तर महाराज आपण आहांतच !

**शिव**—ठीक आहे. सांग बघूं तर ?

**तारा**— पृथ्वी पासून क्रमानें सांगत्यें हाँ !

| | पृथ्वी, | आप, | तेज, | वायु, | आकाश. |
|---|---|---|---|---|---|
| पृथ्वी— | **अस्थि.** | **मांस.** | **स्नायु.** | **त्वचा.** | **केंस.** |
| आप— | **मूत्र.** | **रक्त.** | **वीर्य.** | **लाळ.** | **घाम.** |
| तेज— | **आलस्य.** | **मैथुन.** | **क्षुधा.** | **तृषा.** | **निद्रा.** |
| वायु— | **आकुंचन.** | **प्रसरण.** | **धावन.** | **चलनवलन.** | **निरोधन.** |
| आकाश— | **काम.** | **क्रोध.** | **लोभ.** | **मोह.** | **भय.** |

**शिव**—शाबास ! शाबास ! तारे ! आतां तुम्ही सर्व जणें, या पंचवीस स्थूळरूपांचें पुनः मनन करा. )

**सर्व**—( एकाग्रतेनें मनन करतात. )

**शिव**—( थोडया वेळानें ) बरोबर ठसलीं मनांत ?

**तिघे**—होय महाराज !

**शिव**—तरमग आतां सांगा पाहूं ? या पंचवीस तत्वांत, **मी** म्हणून कोणी आहेका ?

**राजा**—नाहीं महाराज ! यांत "**मी**" म्हणून बिलकूल कोणी ही नाहीं ! कारण, हीं पंचवीस तत्वें, मला साफ दिसत आहेत ! अर्थात्. हीं मला **दृश्य** आहेत व मी यांचा **द्रष्टा**, म्हणजे **पाहणारा** आहें. या वरून उघडच झालें कीं, "मी" या पंचवीस तत्वांहून, खचित कोणीतरी **निराळा** आहे !

**शिव**—राजा, शाबास! बरोबर आहे. तुम्हाला समजलाना हा विषय, येथपर्यंत बरोबर ?

**तारा**—होय महाराज! येथपर्यंत अगदीं **बरोबर** समजला!

**शिव**—ठीक आहे. पंचमहाभूतांचीं, हीं पंचवीस **स्थूळ** तत्वें आहेत. आणि या स्थूळ तत्वां पासून हा जड देह बनला आहे, म्हणूनच या देहास **"स्थूळदेह"** म्हणतात. हा **"स्थूळदेह"** तुम्हीं आहां काय ?

**तिघे**—नाहीं, नाहीं, नाहीं!

**तारा**—हा तर, शुद्ध **पाषाण** आहे. या पाषाणाच्या ठायीं, **"मी"** म्हणण्याचें तरी सामर्थ्य कोठून असणार ?

**शिव**—बरोबर! **उपजणें, वाढणें, पुष्ट होणें, कृश होणें, बाल्य, तारुण्य, वार्धक्य** व **मरण** वगैरे विकार यासच आहेत!

**तारा**—काय! महाराज! **जन्म** आणि **मरण** हे विकार फक्त या **स्थूल** देहाचेच ?

**शिव**—ऐक. हल्लींच या तुझ्या राणीसाहेबांस जो पुत्र झाला होता, तोहि एक **स्थूल** देहच नव्हता काय ?

**तारा**—होय! **स्थूल** देह आला, व **स्थूल** देह गेला!

**राणी**—तर मग मी असें ह्मणत्यें, "जर या **स्थूल** देहासच **जन्ममरण** आहे, तर तो मरेना बापडा तिकडे! आपला त्याचा संबंध काय ?

**शिव**—वास्तविक कांहींच संबंध नाहीं! पण अज्ञानानें, **"देह तोच मी"** असा दृढ संकल्प केल्यामुळें, हा **दुःखसागर** उचंबळला आहे! याकरितां, तुह्मी सर्व पुनः विचार करा. वरील पंचवीस तत्वांहून, आणखी कांहीं स्थूल तत्वें शरिरांत आहेत काय ?

**राजा**—नाहींत.

**तारा**—पांच पंचें पंचवीस झालीं! आणखी असणार कोठून ?

**शिव**—बरें, त्या पंचवीस तत्वांत "**मी**" ह्मणून कोणी आहे काय ?

**राजा**—नाहीं महाराज, नाहीं !

**शिव**—मग, "**स्थूल**" देह, ह्मणजे **मी** नव्हे, असें ठरलें नाहीं काय ?

**तिघे**—( डुलतात ) होय–होय--होय--अगदीं ठाम ठरलें!

**तारा**—महाराज! **मी**, या स्थूल देहाहून **निराळी** आहें, अशी माझी पक्की खात्री झाल्यामुळें, मला तर आतां मरणाची भीति मुळींच वाटेनाशी झाली ! बाईसाहेब, आपला तो अग्निप्रलयकाळचा **आक्रोश** व्यर्थ होता, नाहीं का ?

**शिव**—खरेंच "**जातस्यमरणंध्रुवं**"उपजला, तो मरणारच, माझ्या बंधुभगिनींनों ! फक्त **स्थूळ देह मी नव्हें**, इतकें समजल्यावरच, जर तुह्मांस एवढा **आनंद** व एवढें **धैर्य** प्राप्त झालें, तर पुढील विवेचनावरून; तुह्मांस **आनंदीआनंद** झाल्याशिवाय राहणार नाहीं.

तसेंच आणखी ऐका. **जन्ममरणादि** विकारांप्रमाणेंच, "**नाम, रूप, आकार**" हे तीन विकार ही, याच देहाला आहेत !

**राजा**—अहाहा ! आतांच्या संभाषणानें तर, माझी स्थिति अगदीं तंतोतंत, पाण्यांत टाकलेल्या मिठाच्या खडयाप्रमाणें झाली !

**शिव**—ती कशी ?

**राजा**—महाराज ! मी जर मुळी स्थूळ देहच नव्हें, तर **राजा** हें **नांव**, हें **भपकेदार सुंदर**रूप, व हा साडेतीन हात लांबीचा **लठ्ठआकार**, हीं माझीं कशीं ? अर्थात् या स्थूल देहाबरोबरच, हेही तीन **विकार** विरघळले ! ! !

**राणी**—अहाहा ! महाराज ! मीही या **राणीपणा**पासून, या सुंदर **रूपा**पासून, व या नाजूक सडपातळ **बांध्या**पासून साफ **निराळी** झालें ! ( डुलते. )

**तारा**—( डुलते ) महाराज ! एक स्थूलदेह, **मी** नव्हे, इतकें

ठरल्याबरोबर, शिरावरचा किती बरें **बोजा** कमी झाला हा! आतां, या देहाला कोणीं **बरें** म्हटलें, तरी वाहवा! **शिव्या** दिल्या, तरी वाहवा! हा देह **क्षीण** झाला, तरी वाहवा! **लठ्ठ** झाला, तरी वाहवा! **जीर्ण** झाला, तरी वाहवा! व **मरण** पावला, तरी वाहवा! आतां याचें कांहीं ही होवो. !

**शिव**—मुलींनो! झालेला विषय तुह्मांस जर बरोबर बिंबला असेल, तर तुह्मी आपलें अर्धें मुक्काम गांठलें, असें खास समजा! करितां, या सर्व गोष्टींचा चांगला विचार करा. मी तोंपर्यंत थोडा वेळ **आत्मदर्शन** करून येतों!

**तिघें**—डोळे मिट्टन (खरोखरच) विचार करितात. (पडदा पडतो)

---

## प्रवेश ५ वा.

**शिव**—( पहातो, तों तिघेंही आनंदानें डुलताहेत. ) शाबास! काय, मुलींनो! सांगितलेला भाग बरोबर समजला ना?

**तारा**—होय महाराज! "**स्थूळदेह मी नव्हे**" ही आमची पूर्ण खात्री झाली.

**शिव**—मग, तुझा **तारेपणा**, **तिचा राणीपणा**, व या तुमच्या यजमानाचा **राजेपणा**, आतां राहिला काय?

**राणी**—नाहीं महाराज! **नाम, रूप, व आकार** हे तिन्ही दोष, स्थूळ देहाबरोबरच पार झाले!

**राजा**—पण महाराज! या स्थूल तत्वांहूनही, आणखी कांहीं तत्वें, या देहांत आहेत काय?

**शिव**—होय. तुह्मांस आतांपर्यंत, या देहांतील पंचमहाभूतांचीं **स्थूल** रूपें सांगितलीं. आतां, तींच पंचमहाभूतें, याच देहांत **सूक्ष्म** रूपानेंही आहेत. तीं समजलीं कीं, आपलें बहुतेक काम झालें!

**तारा**—मग महाराज! कृपा करा! व आह्मांस तींही तत्वें समजावून द्या!

**शिव**—ठीक आहे, नीट लक्ष द्या.

**राजा**—आज्ञेप्रमाणें, पूर्ण एकाग्रता आहे, महाराज!

**शिव**—ऐका तर. पुनः पूर्वीप्रमाणेंच, **पृथ्वी**तत्वापासूनच सुरवात करितों.

**तारा**—बरें महाराज ! करा लवकर !

**शिव**—या देहांत **पृथ्वीचीं** जीं पांच **सूक्ष्म** रूपें आहेत, त्यांस "**पंच विषय**" ह्मणतात.

**तारा**—ते कोणते ?

**शिव**—**१ गंध, २ रस, ३ रूप, ४ स्पर्श, ५ शब्द.**

**तारा**—हे तर **पंचमहाभूतांची** समजूत देतांना, महाराजांनीं आह्मांस सांगितले आहेत !

**शिव**—होय. तेच हे. या देहांत ही आहेत. पहा, पूर्वीप्रमाणेंच त्यांतही भूतानुक्रमें **सूक्ष्मत्व** होत गेलें आहे !

**राणी**—हे तर पृथ्वीच्या आंगचे **विषय** आहेत ! पण या देहाला **गंध** वगैरे कोठें आहे ?

**तारा**—दोन दिवस स्नान मुखमार्जनादि न केल्यास, या प्रश्नाचें उत्तर तत्क्षणीं मूर्तिमंत मिळणार आहे !

**राणी**—( स्वगत ) **रूप** तर आहेच. **स्पर्श**ही आहे. ( उघड ) पण **शब्द** कोठें आहे.

**तारा**—आणि आपण बोलत आहों, याचें नांव काय ? शिवाय, हा पहा ! ( टाळी मारिली. )

**राणी**—(हंसली)बरें,पण हे पांच विकार पूर्वीप्रमाणेंच पहावयाचे ह्मणजे:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **गंध—पृथ्वी** | गुण | दर्शक | **सूक्ष्म** | पृथ्वी. |
| **रस—आप** | ,, | ,, | ,, | ,, |
| **रूप—तेज** | ,, | ,, | ,, | ,, |
| **स्पर्श—वायु** | ,, | ,, | ,, | ,, |
| **शब्द—आकाश** | ,, | ,, | ,, | ,, (असेच ना?) |

**शिव**—होय, बरोबर ! असेंच पहावयाचें-**शब्द, आकाशां**तच दुमदुमत असतो, **स्पर्श** समजण्यास कारण **वायुच** आहे. **तेजा**शिवाय **रूप** कोठून दिसणार ? **रस** हा **जळ**रूपीच आहे

च प्रत्येक वस्तूचा **वास** हा, तिला **पृथ्वी**पासूनच मिळालेला असतो ! हाही सूक्ष्मविचार तुमच्या लक्षांत येऊन चुकलाच असेल !

**राजा**—होय महाराज ! ह्या गोष्टी तर, महाराज ! आमच्या लक्षांत केव्हांच येऊन चुकल्या आहेत !

**तारा**—महाराज ! आतां " **आप** " तत्वाबद्दल सांगा.

**शिव**—ऐका, " **आप** ' नामक महाभूतांचीं, जीं पंचतत्वें या देहांत आहेत, त्यांस **पंचकर्मेंद्रियें** असें ह्मणतात.

**राणी**—तीं कोणतीं ?

**शिव**—ऐका.–**१गुद, २मूत्रेंद्रिय, ३पाद, ४हस्त, ५मुख.**

**राणी**—ह्यांस **कर्मेंद्रियें** म्हणण्याचें कारण काय महाराज !

**शिव**—काय असावें तूंच सांग !

**राणी**—समजल्यें. ह्यांच्याद्वारें कर्मं घडतात, ह्मणून !

**राजा**—सांग पाहूं, कोणत्या इंद्रियांकडून कोणतीं कर्मं घडतात. तीं !

**राणी**—यांत काय आहे ? **मलोत्सर्ग, मूत्रोत्सर्ग, गमनागमन, क्रियाकर्तृत्व,** आणि **शब्दोच्चारण** हीं **पांचकर्मं,** वरील **पंचेंद्रियां**पासून घडतात. म्हणूनच त्यांचें नांव **कर्मेंद्रियें** !

**शिव**—शाबास ! मुली राज्ञी, फार चांगलें उत्तर दिलेंस !

**तारा**—आलें ध्यानांत महाराज ! आतां " **तेज** " तत्वांचीं पांच रूपें सांगावीं महाराज !

**शिव**—या देहांत " **तेज** " तत्वाचीं जीं पांच रूपें आहेत, त्यांस " **ज्ञानेंद्रियें** " असें ह्मणतात.

**राणी**—त्यांस **ज्ञानेंद्रियें** कां ह्मटलें ?

**राजा**—ह्यांच्यापासून **पंचविषयांचें ज्ञान** होतें, ह्मणून.

**राणी**—तें कसें ?

**तारा**—मी सांगत्यें महाराज !

**शिव**—सांग, सांग !

**तारा**—ऐका, बाईसाहेब !

घ्राणाच्या योगें—**गंध** समजतो.

**जिव्हे**च्या योगें—**रस** समजतो.
**नेत्रां**च्या योगें—**रूप** समजतें.
**त्वचे**च्या योगें—**स्पर्श** समजतो.
**कर्णा**च्या योगें—**शब्द** समजतो.

**राणी**—( मान डोलावून ) समजलें ! हें **विषयज्ञान**, या **ज्ञानेंद्रियांस** करून घेण्याची **शक्ति** आहे,ह्मणूनच हीं **तेज** तत्वांचीं रूपें !

**शिव**—हां ! सांभाळ ! येथें जरा घसरण्याचा संभव आहे ! आतां तुझ्या भाषणांत " या ज्ञानेंद्रियांस विषयज्ञान करून घेण्याची शक्ति आहे" असें आलें। पण, या इंद्रियांस शक्ति नाहीं हो !

**तारा**—कशी ? डोळयांनीं प्रत्यक्ष पहात असून, त्यांस ती शक्ति नाहीं कशी ?

**शिव**—ह्याचें थोडेंसें उत्तर, मागें या देहास मंदिराचा दृष्टांत दिल्यावेळीं दिलेलेंच आहे ! पण, आणखी खुलासा पहा ! कोणी मनुष्यावर महत्संकट गुदरल्यामुळें, तो त्याच्या निवारणार्थ उपाय योजित आहे. अशा वेळीं, त्यास जर कोणीं विचारलें, "अहो ! या वाटेनें माझी वाकड्या शिंगांची भोरी ह्मैस जातांना, आपण पाहिली काय ? " तो आपल्या काळजींत असतां, गरगरीत डोळे उघडून रस्त्याकडे पहात बसला होता, ही गोष्ट जरी अक्षरशः खरी आहे, तरी त्यास ती ह्मैस दिसली असेल काय ?

**तारा**—तो बिचारा आपल्या काळजींत ! त्यास कोठें याची ती ह्मैस, तिचीं शिंगें व तिचा रंग दिसायला बसला आहे ?

**शिव**—कां दिसूं नये ? डोळे उघडे होते ना ?

**राणी**—समजलें महाराज ! डोळयांच्याही आंत जो कोणी आहे, तो त्यावेळीं दुसऱ्या कामांत गढलेला होता ! ह्मणूनच त्यास रस्त्यावरचें कांहीं दिसलें नाहीं !

**शिव**—तसेंच, तुमच्या माडीवरच्या **पश्चिम** खिडकींतून **समुद्र** पहातां येतो. पण पहाणारी, ती **खिडकी** नसून,**तुह्मी** आहां.

**तारा**—बरोबर आहे ! पण महाराज ! येथें पहाणार कोण !

**शिव**—तोच तो, **मी** !

**तारा**—महाराज ! मला असें वाटतें, त्याला ह्मैस दिसली नाहीं, इतकेंच नव्हे; पण रस्त्यावर जरी वाजत गाजत एखादा समारंभ गेला असता, तरी त्यास तो **वाद्यनाद,** ऐकूं आला नसता !

**राजा**—खरेंच ! शंका कीं काय ? तसा पराकाष्ठेच्या काळजींत किंवा दुसऱ्या एखाद्या चैनींत गर्क असल्यास, त्यास वाद्यनाद मुळींच ऐकूं येणार नाहीं !

**तारा**—तर मग हीं घ्राणनेत्रादि **इंद्रियें** ह्मणजे, नुसतीं आपलीं **बिळेंच** ह्मणावयाचीं !

**राजा**—दुसरें काय ! बरें महाराज ! आतां **वायु**तत्वाचीं पंचरूपें कोणतीं ?

**शिव**—**प्राण, अपान, उदान, समान, व्यान**; ह्यांस **प्राणपंचक** ह्मणतात.

**राणी**—ह्यांच्या क्रिया व स्थानें काय ?

**शिव**—एकाग्रतेनें ऐका.

१ **प्राणा**च्या योगें—**श्वासोच्छ्वास** होतो. स्थान **हृदय.**

२ **अपाना**च्या योगें—**मलमूत्रोत्सर्ग** होतो. स्थान **गुद.**

३—**उदानाच्या** योगें—**गिळितां** वगैरे येतें. स्थान **कंठ.**

४—**समाना**च्यायोगें—**अन्नरस** सर्व शरिरांत समानतेनें नेतां येतो. स्थान **नाभि.**

५—**व्याना**च्यायोगें—शरीर **चालन.** स्थान **सर्व देह.**

**तारा**—समजलें महाराज ! आतां "**आकाश**" तत्वाचीं पंचरूपें सांगा.

**शिव**—ठीक आहे, सांगतों. पण हीं वायूचीं रूपें, स्थानें, कार्यें व र समजलीं ना ?

**तारा**—महाराज ! आपण प्रत्येक गोष्ट अगदीं उघडी परिस्फुट करून दाखवित असल्यामुळें, ती आमच्या लक्षांत झरझर ठसत चालली आहे ! करितां, पुढें सांगण्याची कृपा निभ्रांतपणें करावी !

**शिव**—ठीक आहे, ऐका.

**अहंकार, चित्त, बुद्धि, मन, अंतःकरण,** या पंचवृत्तींस **अंतःकरण-पंचक** म्हणतात. हीं पांचीं आकाशाचीं रूपें. यांतही मागें दाखविल्याप्रमाणें, क्रमानें पंचमहाभूतांची गुणदर्शकता आहे.

**राजा**—समजलों, महाराज!

**शिव**—ऐका. ज्याप्रमाणें, **मजुरी, नोर, व्याज** वगैरे शब्द एका "**भाडें**" या शब्दाचेच वाचक आहेत, त्याच प्रमाणें हीं पांचही रूपें मिळून, फक्त **एकाच,** वृत्तीचीं आहेत! तिला वेगवेगळ्या गुणावरून वेगवेगळीं **नांवें** मात्र!

**राणी**—**अहंकार** म्हणजे?

**शिव—अहं** म्हणजे **मी**. अर्थात्, **अहंकार** म्हणजे **मीपणा.** मी **राजा,** मी **मोठा,** मी **शहाणा,** अमुक काम करणारा, **तो मी;** मी **योद्धा,** अशा प्रकारची मनाची जी **गर्विष्ठ** वृत्ति, तिचेंच नांव **अहंकार.** हें **पृथ्वी**-गुण-दर्शक **आकाशाचें** रूप.

**तारा**—आणि **चित्त** म्हणजे?

**शिव**—"**मला अमुक पाहिजे**" म्हणून मनांत आल्यावर, मग सदा सर्वकाळ तेंच **ध्यान** लागतें; त्या वृत्तीचें नांव **चित्त.** हें **आप** गुणदर्शक **आकाशाचें** रूप.

**तारा**—पण महाराज! **अहंकारांत पृथ्वी**चा; व **चित्तांत, पाण्याचा;** हे गुण कोठें दिसत नाहींत! दोन्ही वृत्तीच असल्या मुळें, सरासरी सारख्याच दिसतात, हें कसें?

**शिव**—तारे! तूं मोठी चाणाक्ष आहेस. फारच मार्मिक प्रश्न करितेस! मला तुझ्या प्रश्नाचें मोठें कौतुक वाटतें! असो, ऐक! आधीं, हें **आकाश** तत्व, सर्व भूतांत अत्यंत **सूक्ष्म,** त्यांत हें अंतःकरणपंचक ह्मणजे, त्याचें **स्थूळ** रूप नसून,**सूक्ष्म**रूप! शिवाय, या पंचवृत्ति,फारच सूक्ष्म सूक्ष्म फरकानें आधिकाधिक सूक्ष्म बनलेल्या! यामुळें, सकृद्दर्शनीं पांचही वृत्ति सारख्या सारख्याशाच वाटतात. तरीपण, बारीक विचार केल्यास, तोही प्रकार लक्षांत येण्यासारखा आहे!

**तारा**—महाराज ! बरोबर आहे. एखाद्या वस्तूच्या एकांत बसून केलेल्या चिंतनापेक्षां, **मी मी** हा **अहंकार**, अधिक **स्पष्ट** आहे खरा. अर्थात्, तो चित्तापेक्षां, किंचित् तरी **जड** असलाच पाहिजे !

**राणी**—आलें लक्षांत महाराज ! आतां **बुद्धि** ती कोणती ?

**शिव**—ऐका. शिकून घ्यावयाच्या एखाद्या कठिण विषयांत प्रवेश करण्याची जी अंतःकरणवृत्तीची **शक्ति**, तिचें नांव **बुद्धि**. जसें एखाद्या सुईचें टोंक. तें अणिदार नसल्यास, कपड्यांत शिरणार नाहीं !

**तारा**—ह्मणूनच "**कुशाग्रबुद्धि**" असा शब्द प्रचारांत आहे !

**शिव**—होय. **कुश** ह्मणजे **दर्भ**. त्याचें **अग्र** ह्मणजे **टोंक**, तें शेवटीं कसें अणीदार असतें ? असो. **बुद्धि** हें, **तेज**गुणदर्शक **आकाशाचें रूप** आहे.

**राणी**—बरोबर ! **तेज** आहे, ह्मणूनच ती विषयप्रवेश करिते ! निर्बुद्ध मुलगा, गणितादि विषयांत कशी प्रगति मिळवितो, तें सर्वश्रुतच आहे !

**तारा**—बरें, महाराज ! आतां **मन** तें कोणतें ?

**शिव**—मुली, **मन** हें **वायु**गुणदर्शक **आकाशाचें** रूप आहे. वायूचा स्वभाव इकडून तिकडे वाहण्याचा असतो. त्याचप्रमाणें जी वृत्ति, इकडून तिकडे भराऱ्या मारित असते, तिचेंच नांव **मन** !

**तारा**—समजलें. ह्मणजे क्षणांत **काशी**, तर क्षणांत **रामेश्वर** ! अशी **भटकणारी** जी वृत्ति, तें **मन** ! होयना महाराज ?

**शिव**—होय—तेंच. आता **अंतःकरण** ह्मणजे ऐका.

एखादी गोष्ट आपल्या मनासारखी झाली, ह्मणजे तीपासून होणारें **समाधान** ज्या वृत्तीला होतें, त्या वृत्तीचें नांव **अंतःकरण**. ही वृत्ति, सर्व वृत्तींत फारच सूक्ष्म आहे. कारण हें **आकाशगुणदर्शक आकाशाचें** रूप ! (असो, झालीं सर्व तत्वें सांगून !)

**राणी**—महाराज ! आतां सर्व तत्वें मी सांगत्यें.

**शिव**—ठीक आहे सांग ! पृथ्वीपासून क्रमशः सांग. चुकूं नको !

**तारा**—बाईसाहेब, मी सांगणार !

**राजा**—तुह्मी दोघी नको, मी सांगतों !

**शिव**—हा आतां गोंधळ कां ? मुली राज्ञी, तूंच सांग !

**राणी**—आज्ञा महाराज !

| | | पृ० | आ० | ते० | वा० | आ० | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| त. गु. | पृ० | गंध | रस | रूप | स्पर्श | शब्द | वि.पं. | भोग्य. |
| ९. गु. | आ० | गुद | मूत्रेंद्रिय | पाद | हस्त | मुख | क.पं. | साधन. |
| | ते० | घ्राण | रसना | नेत्र | त्वचा | श्रोत्र | ज्ञा.पं. | |
| | वा० | प्राण | अपान | उदान | समान | व्यान | प्रा.पं. | |
| स. गु. | आ० | अहंकार | चित्त | बुद्धि | मन | अंतःकरण. | अं.पं. | भोक्ता. |

**शिव**—भले शाबास ! मुली राज्ञी, तुझीही धारणाशक्ति फारच चांगली आहे !

**तारा**—महाराज ! हींही तत्वें, मघांप्रमाणेंच पंचवीस आहेत !

**राजा**—तितकींच असावयाचीं. पांच पंचे पंचवीस! मघांचीं पंचवीस रूपें, हीं पंचमहाभूतांचीं **स्थूळरूपें** व हीं पंचवीस, त्याच पंचमहाभूतांचीं **सूक्ष्म रूपें**. इतकाच काय तो फरक!

**तारा**—समजल्यें. ह्मणजे:—

**१ अस्थि, २ मांस, ३ स्नायु, ४ त्वचा, ५ केस.**

हीं **पृथ्वीचीं स्थूळ**रूपें असून,

**१ गंध, २ रस, ३ रूप, ४ स्पर्श, ५ शब्द.**

हीं त्याच **पृथ्वीचीं सूक्ष्म**रूपें आहेत.

**राणी**—त्याचप्रमाणें:—

**१ गुद, २ मूत्रेंद्रिय, ३ पाद, ४ हस्त, ५ मुख;**

हीं **आपाचीं स्थूळ**रूपें असून,

**१ मूत्र, २ रक्त, ३ वीर्य, ४ लाळ, ५ घाम**

हीं त्याच **आपाचीं सूक्ष्म रूपें आहेत.**

**शिव**—शाबास ! त्याचप्रमाणें:—

**१ आकुंचन, २ प्रसरण, ३ धावन, ४ चलनवलन, ५ निरोधन;**

हीं **वायूचीं स्थूल** रूपें असून,

**१ प्राण, २ अपान, ३ समान ४ उदान, ५ व्यान;**

हीं, त्याच वायूचीं **सूक्ष्म**रूपें आहेत !

**राजा**—आणि, त्याचप्रमाणें:—

**१ आलस्य, २ मैथुन, ३ क्षुधा, ४ तृषा, ५ निद्रा;**

ही, **तेजा**चीं **स्थूळ**रूपें असून,

**१ घ्राण, २ रसना, ३ नेत्र, ४ त्वचा, ५ श्रोत्र,**

हीं त्याच **तेजाचीं सूक्ष्म** रूपें आहेत.

**तारा**—आतां फक्त, आकाशाचीं सांगावयाचीं राहिलीं, तीं मी सांगत्यें महाराज !

**शिव**—ठीक आहे, सांग.

**तारा—१ काम, २ क्रोध, ३ लोभ, ४ मोह, ५ भय;** हीं **आकाशाचीं स्थूळ**रूपें असून,

**१ अहंकार, २ चित्त, ३बुद्धि, ४मन, ५ अंतःकरण;** हीं त्याच **आकाशाचीं सूक्ष्म** रूपें आहेत.

**शिव**—शाबास! हीं पंचवीस तत्वें, तुम्हां तिघांच्याही लक्षांत बरोबर उतरलीं! आतां सांगा पाहूं, ह्या **पंचवीस सूक्ष्म** तत्वांत तरी, मघांचा तो **मी मी** तो कोण? नीट बारकाईनें प्रत्येकास तपासा! **डोळे** म्हणजे **मी**; कीं **मन** म्हणजे **मी**; कीं **प्राण** म्हणजे **मी**?

**तारा**—महाराज! **प्राण** म्हणजे **मी**, असें मला वाटतें. कारण, प्राण जाऊन श्वासोच्छ्वास बंद झाला, कीं, तो "**मी**" मरतो!

**शिव**—"**मरण**" हा विकार स्थूळदेहास आहे, असें मघांशीं ठरलें आहे. आतां प्राण गेल्यावर श्वासोच्छ्वास बंद पडून तो "**मी**" मरतो, असें तूं म्हणत्येस; पण ही तुझी भ्रांति आहे.कारण, श्वासोच्छ्वास बंद असतांही "**मी**" हा जिवंतच आहे, असेंही दाखवितां येतें. हें पहाः—

(प्राण निरोध करून दाखवितो).

**तारा**—( त्याच्या नाकाकडे हात नेऊन पाहते व साश्चर्य ) अरे! यांचा श्वास तर साफ बंद झाला! हातपाय ही अगदीं मृतप्राय! खरोखरच हे गतप्राण तर नाहींत ना झाले?

**राजा**—छे छे! तारे, ते आतां देहावर येतील!

**शिव**—( तोंच ते शुद्धीवर येतात व ) पाहिलें, **श्वासोच्छ्वास** व **हालचाल**, या देहांत होती कीं काय?

**तारा**—नाहीं, महाराज! बिलकूल नव्हती.

**शिव**—पण त्यांत **मी** आहे कीं नाहीं?

**तारा**—( निरुत्तर )

**शिव**—शिवाय, अर्धांगवायु झालेल्या माणसाचें एक आंग तर साफ जातें ! त्यास कापलें, किंवा भाजलें तरी कांहीं होत नाहीं ! तरी त्यांत **मी** ह्मणून निराळा एक असतोच ! यावरून काय ठरलें ?

**तारा**—"**प्राण**" हा कांहीं "**मी**" नव्हे !

**राजा**—आणि, **प्राण**, हा जर **मी**, तर मग **अपान** हाही **मी**. त्यानेंच कां नसावें ?

**सर्व**—हंसतात !

**तारा**—समजलें महाराज ! हीं सर्व पंचवीस तत्वें मला दिसत आहेत ! अर्थात्, हीं सर्व **दृश्य** आहेत ! अर्थात् **द्रष्टा** याहून वेगळाच असला पाहिजे. यावरून उघडच ठरलें कीं, याही **पंचवीस** तत्वांत " **मी** " ह्मणून कोणी नाहीं !

**शिव**—मुलींनो ! नीट चांगला विचार करा. तुमच्यापासून हींही पंचवीस तत्वें सुटलीं, ह्मणजे तुमची बहुतेक सर्व उपाधि, **पार** झाल्यासारखी आहे ! करितां, या गोष्टीचा पुनः पुनः चांगला नीट विचार करा !

**तारा**—महाराज ! हींही पंचमहाभूतांचीं सूक्ष्म तत्वें, आह्मांस चांगलीं समजलीं ! यांच्या समुदायासही, स्थूल देहाप्रमाणेंच कांहीं तरी नांव असलें पाहिजे !

**शिव**—आहेत तर ! मुलींनो, देहांतील या पंचवीस सूक्ष्म तत्वांच्या समुदायास **सूक्ष्मदेह** असें नांव आहे.

**राणी**—मिळून दोन्ही पंचमहाभूतेंच ! तीं त्यांचीं **स्थूळ रूपें**, व हीं **सूक्ष्म रूपें** ! इतकेंच.

**शिव**—होय. शिवाय, या पंचवीस तत्वांत दुसरी एक मजा आहे. ती, यांच्या नांवाच्या उभ्या रांगांकडे पाहिलें असतां, समजेल !

**तारा**—ती कोणती बरें ?

**शिव**—ऐका. सर्व नांवें नीट मननपूर्वक डोळ्यासमोर आणा.

**तारा**—आणलीं !

**शिव**—पहा, आतां:—

१ **अहंकार** हा, **प्राण**वायूच्या साह्यानें, **घ्राणाच्या** द्वारें, **गंध** विषय ग्रहण करतो; व **गुदाच्या** द्वारें, तोच विषय **सोडून** देतो !

२ **चित्त** हें, **अपान** वायूच्या साह्यानें, **रसने**च्या द्वारें, **रस** विषय ग्रहण करितें; व **मूत्रेंद्रियाच्या** द्वारें, तोच विषय **सो-डून** देतें !

**तिघें**—( डुलतात ).

**तारा**—अहाहा ! महाराज ! ही सगळी **मजाच** आहे ! कारण, या देहांतील एकूण एक कार्यें करणारे **वेगवेगळाले कामगार** असतां, आपण व्यर्थ, **मी मी** ह्मणून नसता **अभिमान** वाहातों ! **वास्त**विक, या सर्व कामगारांचा मालक, तो **मी** ! कारण, हे सर्व कामकरी, मला तर आतां स्पष्ट दिसत आहेत !

**राणी**—बरोबर आहे ! देहाच्या सर्व क्रिया, परभारेच्या परभारें **आपोआप** चालल्या आहेत !

**राजा**—बरें महाराज ! पुढें सांगा.

**शिव**—ठीक आहे.

३ **बुद्धि**ही, **उदान** वायूच्या साह्यानें, **नेत्रांच्या** द्वारें, **रूप** विषय ग्रहण करित्ये; व **पादांच्या** द्वारें, तोच विषय **पाहाव-यास** जाते !

४ **मन** हें, **समान** वायूच्या साह्यानें, **त्वगिंद्रियाच्या** द्वारें, **स्पर्श** विषय जाणतें; व **हस्ताच्या** द्वारें, तोच विषय **करितें** !

५ **अंतः**करण हें, **व्यान** वायूच्या साह्यानें, **श्रोत्रेंद्रियाच्या** द्वारें, **शब्द** विषय ग्रहण करितें, व **मुखाच्या** द्वारें, तोच विषय **सोडून** देतें !

**राणी**—आतां, सर्व बरोबर लक्षांत आलें ! ही सगळी **गंमत** आहे खरी !

**तारा**—महाराज ! थोडी विनंति आहे !

**शिव**—विचार, संकोच कां ?

**तारा**—महाराज ! ह्मणजे, **अंतःकरण-वृत्ति** ह्या, विषय-**सेवन** करणाऱ्या आहेत !

**शिव**—शाबास तारे ! फारच सूक्ष्म खुबी शोधून काढलीस !

**राणी**—आणि महाराज ! **पंचप्राण** व **पंचज्ञानेंद्रियें** हीं, तें विषय ग्रहण करण्याचीं **साधनें** आहेत.

**राजा**—आणि **कर्मेंद्रियें** हीं, विषय उत्पन्न करणारीं आहेत !

**शिव**—उत्पन्न करणारीं नाहींत !

**राजा**—तर ?

**तारा**—उत्पन्न करण्यास **साधनभूत** आहेत ! नाहीं महाराज ?

**शिव**—होय. बरोबर आहे ! ह्मणजे एकंदरींत असें:—

१-**अंतःकरणपंचक** हें,

२-**पंचवायु**, **पंचज्ञानेंद्रियें**, व **पंचकर्मेंद्रियें**, यांच्या द्वारें,

३-**विषय ग्रहण** करितें !

**तारा**—( डुलूं लागते ) समजलें महाराज !

**शिव**—आणखी ऐका. **पंचवृत्ति**, ह्या, **कोणत्या भूतांचीं** रूपें ?

**तारा**—**आकाश**तत्वाचीं.

**शिव**—शाबास ! आणि **आकाशतत्व** कोण **गुणी** ?

**राजा**—**सत्वगुणी.**

**शिव**—बरोबर ! अर्थात **पंचवृत्ति**, **सत्वगुणी** झाल्या !

**राणी**—होय महाराज, बरोबर आहे !

**शिव**—आणि **रजोगुणी** महाभूतें कोणतीं ?

**राणी**—**वायु**, **तेज**, **आप**, हीं तीन.

**शिव**—शाबास ! आतां, या तिन्हीं भूतांचीं **सूक्ष्म** पंचकें, अनुक्रमानें सांगा पाहूं ?

**तारा**—महाराज! **प्राणपंचक,ज्ञानेंद्रियपंचक,** व **कर्मेंद्रियपंचक.** हींच ना?

**शिव**—होय. ह्मणूनच हीं **तिन्ही पंचकेंहि रजोगुणी** आहेत!

**तारा**—शिवाय, वरील भूतांस **'कारभारी** भूतें' असें ह्मणतात. नाहीं महाराज?

**शिव**—होय. ह्मणूनच वरील तिन्ही पंचकेंही, **कारभारी** झालीं. नाहीं का?

**राणी**—होय महाराज! शिवाय, कांहीं तरी काम करीत रहावयाचें, हें **रजोगुणाचें लक्षण** आहे!

**शिव**—ह्मणूनच, तें लक्षण वरील तिन्हीं पंचकांत उतरलें आहे! पहा आतां, बारीक विचार करून. या तिहीं शिवाय, जगांत कांही तरी व्यवहार चालला आहे का?

**तिघे**—नाहीं! महाराज खचीत नाहीं!

**तारा**—वरील तीन **भूतां**शिवाय, **जगांतील** कोणतीही **गोष्ट;** व वरील तिन्हीं **पंचकां**शिवाय **देहांतील** कोणतीही **क्रिया,** बिलकूल होणें नाहीं!

**शिव**—शाबास! बरोबर आहे. आतां सांगा. **सत्वगुणी** पंचक **एक** झालें, **रजोगुणी** पंचकें **तीन** झालीं, अशींच कांहीं **तमोगुणी** पंचकेंही, या सूक्ष्म देहांत असलीं पाहिजेत!

**राणी**—महाराज! **तमोगुणी** पंचकें, **पुष्कळ** कुठून असणार!

**शिव**—कां?

**राणी**—सर्वच पंचकें **पांच**! त्यांत **सत्वगुणी एक, रजोगुणी तीन,** मिळून झालीं **चार.** अर्थात्, बाकी राहिलें **एक.** तें **तमोगुणी** असलें पाहिजे!

**शिव**—शाबास! मुली राज्ञी! बरोबर बोललीस. मग सांग पाहूं तर, **तमोगुणी** पंचक कोणतें तें?

**राणी**—महाराज! **विषय**पंचक, **तमोगुणी** असलें पाहिजे!

**शिव**—बरोबर आहे !

**तारा**—शिवाय, हा मेळ, दुसऱ्या बाजूनेंही मिळतो. कारण **विषय** हे, पृथ्वी भूताचीं सूक्ष्मरूपें; व **पृथ्वी** ही, **तमो**गुणी आहे:- अर्थात्, **विषय**पंचक हीं, **तमो**गुणीच झालें !

**शिव**—शाबास ! बरोबर आहे. ह्मणूनच एकानें ह्मटलें आहे.

**भोक्ता सत्वगुणःशुद्धो, भोगानां साधनं रजः ॥**
**भोग्यं तमोगुणः प्राहुरेषामात्माप्रकाशकः ॥ १ ॥**

**तारा**—ह्मणजे ?

**शिव**—याचा खुलासा असाः—
प्रत्येक क्रियाकर्तृत्वांत **त्रिपुटी** असते !

**तारा**—**त्रिपुटी** ह्मणजे ?

**शिव**—ज्या **तीन** साधनांच्या द्वारें कार्यपूर्तता होते, त्या तीन साधनांच्या समुदायास, **त्रिपुटी** ह्मणतात.

**राणी**—महाराज ! कृपा करून हीच गोष्ट दृष्टांतानें सांगा.

**शिव**—ठीक आहे. ऐका ! उदाहरणार्थ, "**जेवणें**"ही एक क्रिया आहे. ती पूर्ण होण्यास, तीन गोष्टी पाहिजेत.

**तारा**—त्या कोणत्या ?

**शिव**—नीट लक्ष द्या.

१ पहिली गोष्ट, **जेवणारा** पाहिजे,
२ दुसरी गोष्ट, **अन्न** पाहिजे,
३ तिसरी गोष्ट, **भोजन**क्रिया पाहिजे.

**तारा**—महाराज ! जेवणारा व जेवण तयार असल्यावर, मग आणखी **भोजन**क्रिया ती कशाला ?

**शिव**—वाहवा ! ती क्रिया नसल्यास, जेवणारानें **पाटावर**, व अन्नानें **ताटावर** बसून, एकमेकांचें तोंड पोटभर पहावें !

**तारा**—( डोलते ) बरोबर, आहे महाराज ! पाटावरचा मनुष्य, व ताटांतलें अन्न, यांच्या मधील व्यवहार घडल्याशिवाय, "**जेवणें**" ही क्रियाच अस्तित्वांत नाहीं !

**शिव**—वरील उदाहरणांत—

१ जेवंणारा, तो **भोक्ता,**

२ अन्न, तें **भोग्य**, व

३ भोजनक्रिया, तो **भोग;**

असून, या तिहींच्या समुदायास **त्रिपुटी** ह्मणतात. याचप्रमाणें दुसरें उदाहरण पहा:—

१ पुरुष, हा **भोक्ता,**

२ स्त्री, ही **भोग्य**, व

३ दोहोंमधील व्यवहार, हा **भोग.**

**राणी**—महाराज ! ( मंदस्मित ) या शिवाय जगांत आणखी दृष्टांतच नव्हते का द्यायला ?

**शिव**—मुली ! दृष्टांत जितका अधिक परिचयाचा असेल, तितका चांगला. असो, आतां त्रिपुटी शब्दाचा अर्थ बरोबर समजला ?

**तारा**--होय समजला ! पण मघांच्या श्लोकाचा अर्थ काय ?

**शिव**—होय. त्यासाठींच ही खटपट चालली आहे. ऐका. वरील त्रिपुटीप्रमाणें आणखी कांहीं पहा.

१ कर्ता, कार्य, कारण.

२ श्रोता, श्राव्य, श्रवण.

३ वक्ता, वाच्य, वचन.

४ नेता, नेय, नयन.

५ ध्याता, ध्येय, ध्यान.

६ ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान.

वगैरे. या त्रिपुट्यांप्रमाणेंच, वरील श्लोकांत एक **त्रिपुटी** दाखवून, त्या त्रिपुटीच्याही पलीकडे, तो **आत्मा** ह्मणजे " मी " आहें, असें श्लोकांत सागितलें आहे !

**तारा**—तें काय तें नीट सांगा महाराज !

**शिव**—ऐका. श्लोकांत असें ह्मटलें आहे:—

१ जो **भोक्ता,** तोच शुद्ध अशा प्रकारचा **सत्वगुण** आहे.

२ जें, भोगाचें साधन, तोच **रजोगुण.**

३ जें भोग्य ह्मणजे भोगण्यास योग्य, तोच **तमोगुण.**

४ आणि या त्रिपुटीस अर्थात् या त्रिगुणांस प्रकाशणारा जो, तोच **आत्मा** !

**तारा**—आतां माझ्या लक्षांत बरोबर ठसा उमटला ! ह्मणजे, वरील सूक्ष्म देहापैकीं, अंतःकरण पंचक, हा **सत्वगुण**; प्राण व दशेंद्रिय पंचकद्वय, हा **रजोगुण**; आणि विषयपंचक हा **तमोगुण** असून, या सर्वांस प्रकाशणारा, तो **आत्मा**, ह्म० **मी** आहे. अर्थात्, या सूक्ष्म देहांत "**मी**" नाहीं ! हा सारांश. होयना महाराज ?

**शिव**—होय तारे, असेंच.

**राणी**—पण, महाराज ! हे **त्रिगुण**, या सूक्ष्मदेहांतही आहेत तर एकूण ?

**शिव**—मुलींनो, ते झाडाच्या **पानांत**ही असल्यांबद्दल, तुह्मांस दाखवून दिलेंच आहे ! शिवाय, आणखी असें सांगतों, या सृष्टींतील प्रत्येक अणुरेणु परमाणूमध्येंही, ते भरलेले आहेत ! मग, ते सूक्ष्म देहांत आहेत, यांत नवल काय ?

**तारा**—महाराज ! या सूक्ष्म देहासंबंधीं, आणखी कांहीं सांगण्या-सारखें आहे काय ?

**शिव**—ही वर सांगितलेली सर्व माहिती, जर बरोबर लक्षांत आली असेल, तर आणखी थोडेंसें पुढें सांगावयाचें आहे !

**तारा**—महाराज ! मला तर ही सर्व माहिती, बरोबर समजली! पाहिजे तर यांत माझी परीक्षा घ्यावी !

**राणी**—महाराज ! आणि मीही, पाहिजे तर ही सर्व माहिती संगतवार लिहून काढीन !

**शिव**—राजा ! तुला कांहीं शंका आहे काय ?

**राजा**—नाहीं महाराज ! मला तर कांहींच शंका नाहीं ! अस-ल्यास, मी त्याचवेळीं, तिची निवृत्ति करून घेत असतों !

**शिव**—ठीक आहे ! तर आतां पुढील गोष्टीकडे जरा बारकाईनें लक्ष द्या.

**तिघे**—ठीक आहे, महाराज! ( विशेष लक्ष देतात. )

**शिव**—आतां, तुमच्या समजुतीस चांगली मदत होण्याकरितां मला लागणाऱ्या कांहीं वस्तु, मी निर्माण करितों!

**राजा**—बरें आहे महाराज!

**शिव**—राजा, तो पहा चौरंग! तो इकडे आण पाहूं.

**राजा**—( चौरंग आणून पुढ्यांत ठेवतो. )

**शिव**—तारे! तूं तो दिवा इकडे घेऊन ये पाहूं!

**तारा**—( वालशिटचा दिवा आणते ) हा घ्या महाराज!

**शिव**—ठीक आहे! ठेव या चौरंगावर. राज्ञी, तूं तो कांचेचा गोल इकडे आण जा!

**राणी**—हा घ्या महाराज!

**शिव**—(तो गोल दिव्यावर लावून) आतां, इकडे नीट लक्ष द्या.

**तिघे**—आहे महाराज नीट लक्ष!

**शिव**—मुलींनो, तुह्मांस या कांचेच्या गोलापासून, तों आंत थेट दिव्यापर्यंत, काय काय आहेसें दिसतें.

**राणी**—महाराज! पाहिल्यानें हा **गोल** दिसतो आहे. त्यापुढें हा **प्रकाश** दिसतो आहे, व त्यापुढें शेवटीं हा **दिवा** दिसत आहे!

**शिव**—शाबास. मुली, बरोबर सांगितलें! पण, आणखी **एक तत्व** यांत सांगावयाचें राहिलें! तें आमच्या विषयसिद्धतेकरितां घेतलें पाहिजे.

**तारा**—तें कोणतें बरें?

**शिव**—**दाहकशक्ति.**

**तारा**—पण महाराज! **दिवा,** तीच **दाहकशक्ति!** दाहकशक्ति, दिव्याहून कांहीं वेगळी नसावी!

**शिव**—**तूं** व तुझी **शक्ति,** एकच का? एखादा मनुष्य तरुणपणांत जें काम सहज करितो, तेंच काम त्याच माणसाकडून म्हातारपणांत मोठ्या कष्टानेंही होत नाहीं! याचें कारण, त्या शक्तीचा कमजास्तपणा! नव्हे का?

**तारा**—बरोबर आहे, महाराज! सांगा आतां पुढें.

**शिव**—ठीक आहे. ऐका. इकडे पहा.

१ पहिली वस्तु, हा कांचेचा **गोल.**

२ दुसरी वस्तु, हा **प्रकाश.**

३ तिसरी वस्तु, ही दाहक **शक्ति.**

४ चौथी वस्तु, हा **दिवा.**

**राणी**—आलें लक्षांत महाराज! पण या दिव्याच्या, ह्या चार प्रती करून, काय करावयाचें?

**शिव**—ऐका, आतां अशी कल्पना करा.

**सर्व**—( अगदीं एकचित्त होतात )

**शिव**—हा, १ गोल, हाच, १ स्थूल देह!

हा, २ प्रकाश, हाच, २ सूक्ष्मदेह!

हा, ३ दाहकपणा, हाच, ३ कारणदेह!

हा, ४ दिवा, हाच ४ महाकारण देह.

**तारा**—पण, महाराज! **कारणदेह** व **महाकारण**देह, हीं नांवें नवीनच उच्चारिलीं!

**शिव**--हो! त्यांचा खुलासा पुढें करणारच आहें. पण आतां, फक्त कारणापुरता, त्यांचा उल्लेख केला आहे.

**राणी**—महाराज! हा दृष्टांत योजण्यांत हेतु काय, तो कांहीं माझ्या लक्षांत अद्याप बरोबर नाहीं आला!

**शिव**—मुली, ऐक. हा कांचेचा १ **गोल**, त्याच्या आंतील हा २ **प्रकाश**, व त्या प्रकाशाच्याही पलीकडील हा ३ **दाहकगुण**, या तिघांसही प्रकाशित करण्यास, मूळकारण कोण बरें?

**तारा**—महाराज! ४ **दिवा**, हा कारण आहे. कारण तो आहे, ह्मणूनच **दाहकत्वगुण** उत्पन्न झाला, तो आहे, ह्मणूनच **प्रकाश** उद्भवला, व तो आहे, ह्मणूनच हा **गोल** दिसत आहे!

**राणी**—हा **दिवा** मालवल्यास, हा **दाहकपणा**, हा **प्रकाश**, व हा **गोल**, मिळून **तिन्ही** नाहींसें होणार!

**तारा**—**दिवा** काढल्यावर, **गोल** नाहींसा कसा होणार ?

**राणी**—तो दिसेनासा होणार, ह्मणजे तो नाहींच तर काय ? त्यास प्रकाशित करण्यास कारण, हा **दिवाच** आहे !

**तारा**—होय महाराज ! आतां आलें माझ्या लक्षांत ! ह्मणजे, हा आमचा १ **स्थूळ** देह, हा २ **सूक्ष्म**देह, व हा ३ **कारण**देह, या तिन्ही देहांस प्रकाशमान करणारा, हा चौथा ४ **महाकारण** देहच आहे ! हीच गोष्ट सिद्ध करून दाखविण्याचें, महाराजांच्या मनांत आहेसें वाटतें !

**शिव**—तारे ! शाबास ! बरोबर ताडलें ! मघांचा श्लोकही हेंच सांगतो आहे !

**राणी**—आलें ध्यानांत !

**शिव**—काय आलें ? सांग पाहूं काय आलें तें !

**राणी**—ज्या प्रमाणें हा **दिवा**; १ **गोल**, २ **प्रकाश**, व ३ **दाहकत्व** या तिहींसही प्रकाशक आहे; त्याचप्रमाणें, **आत्मा** हा, १ **तम**, २ **रज**, ३ **सत्व**, या तिहींसही **प्रकाशक** आहे !

**राजा**—आणि महाराज ! हा **दिवा** मात्र **स्वप्रकाशमान्** असून, बाकी ( १ **गोल**, २ **प्रकाश**, ३ **दाहकत्व**, ) हे, जसे **परप्रकाशमान्** आहेत, त्याच प्रमाणें, **आत्मा** मात्र, **स्वप्रकाश**-मान् आहे. बाकी, ( १ **स्थूळ** २ **सूक्ष्म**, ३ **कारण**, ) हे तिन्ही देह **परप्रकाश**मान् आहेत !

**शिव**—शाबास ! बरोबर, आहे !

**तारा**—अर्थात्, **तिन्ही देह** प्रकाशमान् करणारा, फक्त एक **महाकारण** देह !

**शिव**—आणि जो **महाकारण** देह; तोच तो **मी** ! आणि **मी** ह्मणजे **आत्मा** !

**राणी**—ह्मणजे,**महाकारण** देह, **आत्मा** व **मी**, मिळून एकच!

**शिव**—एकाचींच तीं **तीन** नांवें

**तारा**—बरोबर आहे, महाराज! सांगा आतां पुढें.

**शिव**—ठीक आहे. ऐका. इकडे पहा.

१ पहिली वस्तु, हा कांचेचा **गोल.**

२ दुसरी वस्तु, हा **प्रकाश.**

३ तिसरी वस्तु, ही दाहक **शक्ति.**

४ चौथी वस्तु, हा **दिवा.**

**राणी**—आलें लक्षांत महाराज! पण या दिव्याच्या, ह्या चार प्रती करून, काय करावयाचें?

**शिव**—ऐका, आतां अशी कल्पना करा.

**सर्व**—(अगदीं एकचित्त होतात)

**शिव**—हा, १ गोल, हाच, १ स्थूल देह!

हा, २ प्रकाश, हाच, २ सूक्ष्मदेह!

हा, ३ दाहकपणा, हाच, ३ कारणदेह!

हा, ४ दिवा, हाच ४ महाकारण देह.

**तारा**—पण, महाराज! **कारणदेह** व **महाकारण**देह, हीं नांवें नवीनच उच्चारिलीं!

**शिव**--हो! त्यांचा खुलासा पुढें करणारच आहें. पण आतां, फक्त कारणापुरता, त्यांचा उल्लेख केला आहे.

**राणी**—महाराज! हा दृष्टांत योजण्यांत हेतु काय, तो कांहीं माझ्या लक्षांत अद्याप बरोबर नाहीं आला!

**शिव**—मुली, ऐक. हा कांचेचा १ **गोल**, त्याच्या आंतील हा २ **प्रकाश**, व त्या प्रकाशाच्याही पलीकडील हा ३ **दाहकगुण**, या तिघांसही प्रकाशित करण्यास, मूळकारण कोण बरें?

**तारा**—महाराज! ४ **दिवा**, हा कारण आहे. कारण तो आहे, ह्मणूनच **दाहकत्वगुण** उत्पन्न झाला, तो आहे, ह्मणूनच **प्रकाश** उद्भवला, व तो आहे, ह्मणूनच हा **गोल** दिसत आहे!

**राणी**—हा **दिवा** मालवल्यास, हा **दाहकपणा**, हा **प्रकाश**, व हा **गोल**, मिळून **तिन्ही** नाहींसें होणार!

**तारा**—**दिवा** काढल्यावर, **गोल** नाहींसा कसा होणार ?

**राणी**—तो दिसेनासा होणार, ह्मणजे तो नाहींच तर काय ? त्यास प्रकाशित करण्यास कारण, हा **दिवाच** आहे !

**तारा**—होय महाराज ! आतां आलें माझ्या लक्षांत ! ह्मणजे, हा आमचा **१ स्थूळ** देह, हा **२ सूक्ष्म**देह, व हा **३ कारण**देह, या तिन्ही देहांस प्रकाशमान करणारा, हा चौथा **४ महाकारण** देहच आहे ! हींच गोष्ट सिद्ध करून दाखविण्याचें, महाराजांच्या मनांत आहेसें वाटतें !

**शिव**—तारे ! शाबास ! बरोबर ताडलें ! मघांचा श्लोकही हेंच सांगतो आहे !

**राणी**—आलें ध्यानांत !

**शिव**—काय आलें ? सांग पाहूं काय आलें तें !

**राणी**—ज्या प्रमाणें हा **दिवा**; **१ गोल**, **२ प्रकाश**, व **३ दाहकत्व** या तिहींसही प्रकाशक आहे; त्याचप्रमाणें, **आत्मा** हा, **१ तम**, **२ रज**, **३ सत्व**, या तिहींसही **प्रकाशक** आहे !

**राजा**—आणि महाराज ! हा **दिवा** मात्र **स्वप्रकाशमान्** असून, बाकी ( **१ गोल**, **२ प्रकाश**, **३ दाहकत्व**, ) हे, जसे **परप्रकाशमान्** आहेत, त्याच प्रमाणें, **आत्मा** मात्र, **स्वप्रकाश**-मान् आहे. बाकी, ( **१ स्थूळ २ सूक्ष्म**, **३ कारण**, ) हे तिन्ही देह **परप्रकाश**मान् आहेत !

**शिव**—शाबास ! बरोबर, आहे !

**तारा**—अर्थात्, **तिन्ही देह** प्रकाशमान् करणारा, फक्त एक **महाकारण** देह !

**शिव**—आणि जो **महाकारण** देह; तोच तो **मी** ! आणि **मी** ह्मणजे **आत्मा** !

**राणी**—ह्मणजे,**महाकारण** देह, **आत्मा** व **मी**, मिळून एकच!

**शिव**—एकाचींच तीं **तीन** नांवें

**तारा**—तर महाराज ! आतां कृपा करून, त्या **कारण** व महाकारण देहांची आह्मांस समजूत द्या.

**शिव**—ठीक आहे. आतांपर्यंत सांगितलेल्या दोन्ही देहांबद्दलची समग्र माहिती, पुनः पूर्ण विचारपूर्वक मनन करा. या स्थूळ सूक्ष्म देहाची उपाधि संपली कीं, तुह्मीं बहुतेक मुक्काम गांठलाच ह्मणावयाचा ! करितां, याचा पुनः पूर्ण विचार करा.

**तिघे**—ठीक आहे महाराज ! ( विचारस्थ होतात. )

**शिव**—मीही अंमळ **आत्ममंदिरांत** जातों. ( ध्यानस्थ होतो ).

( पडदा पडतो )

---

प्रियबंधु भगिनींनो ! आपणही तोच पंथ धरा ह्मणजे खरें सार्थक्य होईल ! विनंतीचा अनादर होऊं नये.

---

## प्रवेश ६ वा.

**शिव**—( स्वगत ) आतांपर्यंत, यांना **स्थूळ**, **सूक्ष्म** या दोन देहांबद्दल करून दिलेलें ज्ञान, कितपत ठसलें आहे, हें पहिल्यानें पाहून, मग यांस पुढील उपदेश करावा ! ( उघड ) **दोन्ही** देह, ह्मणजे कांहीं, “ मी ” नव्हे. ह्यांतील **पन्नास**ही तत्वांच्या बाहेरच कोणी तरी तो “ मी ” आहे. ही तुमची बरोबर खात्री झालीना ?

**तिघे**—महाराज ! **नुसती** खात्री नव्हे. पण **पुरती** खात्री झाली !

**शिव**—जा तर, पुनः **त्रिवेणी** स्नान करून या ! ह्मणजे, तुह्मांस पुढील फार थोडा राहिलेला भाग समजावून देतों !

**तिघे**—ठीक आहे !

( राजा जरा पुढें ह्म० पडद्याच्या आंत जातो, व नदींत उतरतांच, एक मगर डसल्यामुळें ओरडतो. असा देखावा. )

**राजा**—( ओरडतो ) मेलों मेलों ! **प्रिये** ! **तारे** ! मेलों ! धांवा ! धांवा ! !

**राणी**—( गडबडून ) अगबाई ! ओरडलें कोण ? शब्द तर महाराज सरकारचा दिसतो ! देवा ! काय हा छळ ! ( रडत थांवत्ये. )

**राजा**—प्रियांनों ! मी तुह्मांस आतांच अंतरलोंसें वाटतें ?

**राणी**—( घाबरून ) काय ! म्हणतां काय महाराज ?

**तारा**—अग ! अशी घाबरतेस काय ? हेंच काय आतांपर्यंत शिकलीस ?

**राणी**—नाहींग, घाबरत नाहीं ! पहा, महाराज हें भलतेंच कायसें बोलतात !

**राजा**—प्रिये, हा पहा केवढा मोठा मगर, माझ्या पायांस डसून, मला आंत आंत ओढतो आहे !

**राणी**—( किंकाळी फोडून ) अगबाई ! धांवा हो ! महाराज, धांवा लौकर ! ( महाराजांपाशीं रडत येते ) महाराज ! याहो ! याहो ! महाराज !

**तारा**—(धिमेपणानें सर्व प्रकार स्वस्थ पहात आहे).

**शिव**—काय आहे गडबड ?

**राणी**—महाराज ! सरकारना मगर डसून, तो त्यांना पाण्यांत ओढून नेत आहे हो महाराज !

**शिव**—मग ! त्यांत तुझें काय गेलें ? त्या मगरास कांहीं पोट नाहीं वाटतें ! ( नदीकडे जातात ).

**तारा**—महाराज ! मीही तेंच म्हणत्यें ! कारण, हा **स्थूलदेह** म्हणजे पंचमहाभूतांतमक **गोळा**; याच्यांबद्दल इतका **अभिमान** कसला ?

**राजा**—( हात जोडून ) महाराज ! हा **स्थूल**देह आहे; व तो मजहून **भिन्न** आहे; हें मी बरोबर जाणून आहें ! तसेंच, तो मगरानें पकडल्यामुळें, जरी मला आतां या असह्य वेदना होत आहेत ! तरी **सुख** व **दुःख** हे दोन्ही धर्म, मनाचे आहेत ! व **मन** हें, मजहून निराळें आहे. हीही गोष्ट, मला सशास्त्र कळत आहे पण—

**तारा**—पण काय आणखी? मग आतांपर्यंत झाली, ती नुसती **बडबडच** म्हणावयाची! याचेंच नांव **शाब्दिक ज्ञान**! अहो! **स्थूळ** व **सूक्ष्म** या देहांहून जर आपण निराळे आहां, तर त्या पाषाणरूप **स्थूळ** देहाकरितां, आपण रडत बसलां आहां! तेव्हां, आपणास काय म्हणावें!

**राणी**—तारे! तूं असें कसें म्हणत्येस?

**तारा**—(रागानें) बाईसाहेब! तरवार जर युद्ध प्रसंगीं उपयोगांत आणावयाची नाहीं, तर ती नुसती शोभेकरितां, जवळ बाळगावयाची वाटतें! आतांपर्यंत, महाराजांपासून आपण **ज्ञानखड्ग** संपादन केला, त्याचा उपयोग जर या प्रसंगीं न केला, तर त्याचा उपयोग काय!

**शिव**—मुली राज्ञी! तारेचें ह्मणणें बरोबर आहे! तुह्मांस आतांपर्यंत शिकविलेलें ज्ञान, तुह्मी, उभयतां व्यर्थ घालवूं पाहात आहां! नुसते शब्द पाठ करून काय कामाचे? त्यांचा उपयोग, प्रत्येक प्रसंगीं, अनुभवानें करतां आला पाहिजे!

**राजा**—महाराज, मी या **देहासाठीं** रडत नाहीं! फक्त अर्ध्यावरच, मला महाराजांचे पाय अंतरताहेत, इतक्याचकरितां फार वाईट वाटत आहे!

**शिव**—अरे वाईट वाटणें, हाच **मनाचा धर्म**! अर्थात्, तूं अजूनही मनाच्याच ताब्यांत आहेस! ही पहा! तारा कशी गंभीर वृत्तीनें आहे ती!

**राणी**—महाराज! मला एक शंका आहे.

**शिव**—विचार!

**राणी**—महाराज! आमचें एक सोडूनच द्या. कारण, आह्मी सर्वसंग **परित्याग** करून, मुळीं घरांतूनच बाहेर पडलेलीं माणसें आहोंत! पण, ज्यांस सारा जन्म **प्रपंचांत** काढावयाचा असतो, अशा संसारी जनांनीं सुद्धां, **स्थूळ सूक्ष्म** देहांची बेपरवा करून

स्वस्थ हातपाय बांधून बसावें ! असेंचना करावयाचें ? व तसें बसून, प्रपंचाचा **गाडा**, आयुर्मान असेपर्यंत चालेल काय ?

**शिव**—मुलींनो! "जें ज्या वेळीं व्हावयाचें, तें त्यावेळीं ईश्वरी संकेतानुरूप होणारच होणार." ही गोष्ट पूर्ण ध्यानांत ठेवून व आपण **स्थूल, सूक्ष्म,** देहांतून साफ निराळे आहों, हा **अनुभवदंड** हातीं घेऊन, **उद्यमबंधूच्या** साह्यानें, प्रपंचमार्गे धिम्मेपणानें आक्रमण करावा ! इतकाच सर्व गोष्टीचा सारांश आहे ! अशा वागण्यानें, **सुख** किंवा **दुःख** या दोन्ही विकारांची बाधा प्रापंचिकास कधींच होणार नाहीं ! प्रापंचिकानें, प्रपंच न करून कसें चालेल ? त्यांनीं खुशाल प्रपंच करावा ! पण वरील **तत्व** मात्र कधींही विसरूं नये !

**तारा**—बरोबर आहे महाराज ! असें असतां, क्षुद्र गोष्टीकरितां इतकें अधीर होण्याचें कारण काय ?

**राणी**—तारे ! तूं एकदम इतकी निष्ठुर कशीग झालीस ? हाच प्रसंग तुजवर असता, ह्मणजे कसें बरें झालें असतें ?

**तारा**— **दिवा** व **गोल**, यांमधील **प्रकाश**,जसा त्या दिव्यापासून उद्भवलेला असतो, त्याच प्रमाणें, आमचा **आत्मदीप** व हा पाषाणरूपी **जडदेह**, यांच्यामध्यें, नाना प्रकारचे **मनोविकार**, क्षणोक्षणीं उठत असतात ! अर्थात्, ते सर्व व्यर्थ आहेत ! या करितां, मी, दया व निष्ठुरता या दोन्ही गुणांस विचारित नाहीं ! कारण, पूर्वोक्त गुणद्वयधारणेनें, माझी कीर्ति किंवा अपकीर्ति, यांपैकीं कांहीं तरी **एक** होणार. पण, ते दोन्ही **मनोविकार**च आहेत ! आतां, " या ( स्वतःचा ) देहावर असला प्रसंग आल्यास, कसें झालें असतें ? " असें आपण ह्मणतां; परंतु, याचा अनुभव मजवर तसा प्रसंग आल्याशिवाय, मी तरी कसा दाखवूं ? येईल तेव्हां सहज दिसेल !

**राणी**—महाराज ! हें पहा ! नदीचें पाणीही कसें लाल बुंद होऊन, वहात आहेहो ! सोडवाहो माझ्या यजमानांना !

**शिव**—मुली ! तूं फारच बहकत चाललीस !

**राजा**—( गंभीरतेनें ) महाराज ! झाली माझी **जागृति** ! सुटली दोन्ही देहांवरील माझी **आसक्ति** ! ( स्थिर होतो ).

**शिव**—मुली राझी " माझ्या यजमानास सोडवा हो " असें जें आतां तूं बोललीस, याचा अर्थ काय ?

**राणी**—महाराज ! माझें **सौभाग्य** हें ना ?

**शिव**—असें पहा ! **दिवा** जो आहे, त्यानें " मी दिवा आहें " असें लोकांस सांगण्याची जरूरच नाहीं ! अंधाराचा नाश होतांच, तो **दिवा**, ह्मणून आपोआप ठरतो. असें असतां, कल्पना करा कीं, दिव्याला **मीपणा** उत्पन्न झाला, तर त्यानें, फारतर "**मी दिवा**" एवढाच अहंकार बाळगावा ! तो सोडून जर त्या दिव्यानें आपल्या अहंतेचा अतिक्रम करून, ह्मटलें कीं 'दिवा तो मी,' 'प्रकाश तोही मी,' व 'गोल तोही मीच' तर तें योग्य होईल का ?

**राणी**—असें कोठें मी ह्मणत आहें ?

**तारा**—महाराज ! राणीसाहेबांची गैरसमजूत, आपण फारच अल्पप्रमाणांत दाखविली ! त्यांचा **आत्मदीप** तर, कांच गोलाच्या बाहेरील, आसमंताद्वस्तूंसही, " **मी** " ह्मणत सुटला आहे !

**राणी**—तो कसा ?

**तारा**— बाईसाहेब ! आपण स्वतः "**मी**" ह्मणजे फक्त **महाकारण** देह असतां, स्थूलसूक्ष्मादि देहाचा अभिमान तर आपण धरलाच, पण तुमच्या या स्थूळ देहाच्या बाहेरच्या बाजूस, ( आंतल्या बाजूस नव्हे हो ) फार दूर असणारा, जो हा राजाचा पाषाणरूपी देह, त्यासही आपण " **माझा** " ह्मणत आहां ! याचा विचार करा !

**शिव**—शाबास तारे !

( हे शब्द ऐकतांच तिघेंही, दगडी पुतळ्याप्रमाणें जागच्याजागीं तटस्थ ! )

( स्वगत ) हा काय बरें एकाएकीं चमत्कार ! हीं तिघेही एकाएकीं पाषाणाप्रमाणें तटस्थ झालीं, हें काय ? हा, आतांपर्यंतच्या केलेल्या उपदेशाचा तर प्रभाव नसेलना ? ( विचार करून ) हो !

त्याचाच हा प्रभाव आहे ! मध्यंतरीं, वावटळ सुटल्यामुळें जरी क्षण-भर सूर्य दिसेनासा झाला, तरी, तो सर्वथा नष्ट कसा होईल ? त्याच प्रमाणें, या तिघांसही, त्यांच्या महत्पुण्यप्रतापानें प्राप्त झालेला, आतांपर्यंतचा **ज्ञानोपदेशसंस्कार** व्यर्थ कसा होणार ?

शाबास ! माझ्या जिवलगानो ! तुह्मी, तिघेंही धन्य आहां ! तरी पण, आणखी थोडीशी मजा करून पाहूं. तेणेंकरून, तिघांच्याही या स्थितीच्या सत्यत्वाची परीक्षा होणार आहे !

( उघड ) तारे !

**तारा**—( बोलत नाहीं ).

**शिव**—राजा !

**राजा**—( बोलत नाहीं ).

**शिव**—राजा ! अरे, काय हें ! अरे ! हा तुझा बहुतेक अर्धा पाय, मगर खाऊन बसला ना ?

**राजा**—( स्वस्थ स्तब्ध )

**शिव**—बरें, राज्ञी ! तुझें म्हणणें काय? मीं तुझें म्हणणें ऐकिलें नाहीं, म्हणून तूं रागावलीस वाटतें ! सोडवूं का राजाला ?

**राणी**—( बोलत नाहीं ! )

**शिव**—( स्वगत ) वाहवा ! शाबास या राजाची ! यास प्रत्यक्ष **मगरानें** पकडलें असतांही, हा कितीबरें, धिम्मेपणानें राहिला आहे ? त्याचप्रमाणें ही त्याची राणी, जी त्याकरितां आतांच इतकी कावरी बावरी झाली होती, तीही, आपल्या व आपल्या यजमानाच्या देहाचा साफ अभिमान सोडून, कशी **शांत** झाली आहे ! ही **तारा**-तर, पक्की बहादूरच बनली !

बरें ! मी यांची तारीफ करीत राहिलों आहें खरा, पण असें तर कदाचित् झालें नसेलना ? मस्तकाला एकदम संताप चढून, हीं बेशुद्ध तर झालीं नसतीलना ? कदाचित्, संतापाच्या आवेशांत गत-प्राणही व्हावयाचीं !

पण छे! ही कल्पना तर अगदींच **झूट**! कारण, हीं तिघेंही मजकडे पहा कशीं टकमक पाहत आहेत! श्वासोच्छ्वासहि सुरू आहे! याकरितां, यांवर भगवत्कृपा होण्याचा समय अगदीं नजीक आला, यांत संशय नाहीं!

तरीपण, आणखींही थोडी परीक्षा पाहूं! (तारेस) प्रिये! (हनुवटीस हात लावून!) **तारे**! हें तुझें सौंदर्य व तारुण्य पाहून, खरोखरच माझ्या मनाची स्थिति ह्या वेळीं कांहीं निराळीच झाली आहे! (तिच्या खांद्यावर हात टाकतो)

**तारा**—(गंभीरतेनें स्तब्ध)

**शिव**—प्रिये! (तिचा पदर बाजूस सारून) नाहींना, माझी इच्छा पूर्ण करीत? चल हें पहा एकांत स्थळ आहे!

**तारा**—(स्वस्थ).

**शिव**—(स्वगत) वाहवा! हिला दोन्ही देहांची साफ विस्मृति पडली, यांत संशय नाहीं! हिच्याशीं मी निर्लज्ज कामीजनोचित भाषणें केलीं असतां, हिच्या मुखचर्येवर, **क्रोध**, **विषाद**, किंवा **प्रेम**, ह्यांची यत्किंचितही छाया उमटत नाहीं, यावरून हिनें **सूक्ष्मदेह** जिंकलाच म्हटलें पाहिजे!

त्याचप्रमाणें, मी हिचा पदर सरकून, हिचा कुचप्रदेश उघडा केला असतांही, हिला आपला देह झांकण्याची शुद्ध नाहीं, यावरून हिनें **स्थूलदेह**ही जिंकला, यांत संशय नाहीं.

**तारा**—(स्वगत) हा सगळाच देह जरी साफ नग्न केला, किंवा याचे तुकडे तुकडे केले, तरी मी आतां एक **ब्र** काढणार नाहीं! कारण **स्थूळ सूक्ष्मां**च्या पलीकडे मी! यांशीं माझा संबंध काय?

**शिव**—(उघड) तारे! मजवर तुझें खरें प्रेम असेल असें मी मानित होतों! पण, तो समज साफ चुकीचा ठरला! अग! मला एकाएकीं आतां, स्त्रीसंभोगाची अनावर इच्छा झाली असतां, व ती पूर्ण करणें तुझ्या हातीं असतां, मजबरोबर भाषणही करीत नाहींस काय? धिःकार असो तुला!

( तिच्या वृत्तींत यत्किंचित्‌ही फेरफार होत नाहींसें पाहून डुलतो! व (स्वगत) आतां, राणी व राजा यांची एकदम परीक्षा पहावी असें म्हणून )

( उघड ) प्रिये ! ( राणीच्या हनुवटीस हात लावून ) तुला तरी माझी करुणा येते काय? कधींच नाहीं अशी आजच मला ही विलक्षण इच्छा उद्भवली आहे ! ( डावा हात तिच्या खांद्यावर घालून व उजव्या हातानें हनुवटी धरून, तिचें चुंबन घेतो व हळूच एका डोळ्यानें राजाकडे पाहून, त्याची मुद्रा रागीट वगैरे होते कीं काय, म्हणून वारकाईनें हेरतो ).

प्रिये, मला एकक्षणही दम धरवत नाहीं. तुझ्याशिवाय ही माझी इच्छा कोण बरें पूर्ण करील ? ( तिच्या वक्षस्थळावर उजवा हात ठेवून पुनः आलिंगन व चुंबन घेतो ).

**राणी**—( जशाची तशी ).

**राजा**—( जशाचा तसा ).

**शिव**—( स्वगत ) शाबास ! ( तोंडांत बोट घालतो ! )

**राणी**—( स्वगत ) एखाद्या पवित्र ब्राह्मण-पुत्रास सुविमल तीर्थस्नान सोडून, एखाद्या दुर्गंधयुक्त शौचकुपाच्या मोरींतच स्नान करण्याची वासना उद्भवली, तर होईना बापडी ! दुर्दैव त्याचें !

**शिव**—शाबास ! मुली राज्ञी! तूं धन्य आहेस ! तुझी ही स्थिति हुबेहुब **तारे**प्रमाणेंच झाली आहे. माझ्या भाषणानें तुझ्या चर्येवर यत्किंचित्‌ही फेरफार नाहीं ! इतकेंच नव्हे, पण मी तुझ्या प्रत्यक्ष वक्षस्थळ प्रदेशास स्पर्श केला असतां देखील, तुझ्या चेहऱ्यावर लवमात्र विकारवशतेची नुसती **छाया**ही दिसेना ! वाहवा ! शाबास तुझी ! त्याचप्रमाणें राजा ! तुझीही धन्य आहे ! अरे ! प्रत्यक्ष तुझा पाय, खालीं पाण्यांत मगरानें पकडला असतां, तूं नुसतें " **हाय** " सुद्धां म्हणेनासा झालास ! वरून, तुझी सहनशीलता काय वर्णन करावी ! तेव्हां या स्थूळ देहावरील तुझा अभिमान समूळ नाश पावला, असें कोण म्हणणार नाहीं !

शिवाय, मी या तुझ्या **तारे**वर अभिलाषबुद्धि ठेवल्याचा बहाणा केला असतां, तुझ्या वृत्तीवर यत्किंचित्‌ही फरक पडला नाहीं! तेव्हां ही विश्वयोषिता असल्यामुळें, राजानें तिजकडे दुर्लक्ष केलें असावें. करितां, स्वतः याच्या या **स्त्री**सच स्पर्श करावा, असा विचार करून, या तुझ्या राणीस दृढ आलिंगन दिल्याची **बतावणी** करून, तुला चिडविण्याचा प्रयत्न केला. तरीही तुझ्या मुखचर्येवर क्रोधादि कोणत्याहि मनोविकाराची अणुरेणु इतकीही **छाया** उद्भवलेली नाहीं! यावरून, तुम्हीं तिघेंही धन्य धन्य, आहां! तुम्हीं **भगवद्दर्शनास** योग्य आहां, अशी माझी पूर्ण खात्री होऊन चुकली!

**राजा**—( स्वगत ) मगरानें तोंडात धरलेला हा देहच जर मुळीं "**मी**" नव्हे, तर मग, ह्या कोणाच्या कोण? या तर, माझ्या देहाच्या बाहेर, खूब दूर आहेत!

**शिव**—( स्वगत ) बस्स! यांजवर आतां कृपा करावी! ( मगरीस उघड ) बा! **अज्ञान** मगरा! सोड त्याला आतां! तुजकडून ग्रासिला जाण्यास, हा राजा तर योग्य नाहींच, पण या दोघीही योग्य नाहींत!

**मगर**—( आज्ञा होतांच पाय सोडून पळाला ).

**शिव**—अरे! मगर तर याचा पाय सोडून पळालाच! असें असतां, हा राजा, अद्यापही, जशाचा तसाच! याच्या मुद्रेंत, किंवा शरीरस्थितींत अणुरेणु इतकाही फरक नाहीं! यावरून, **सुख** व **दुःख** या दोहोंची किंमत, यानें **एक** करून टाकिली! यांत संशय नाहीं!

बरोबर आहे! **विदेहस्थिति** ती हीच! आतां, या तिघांसही वृत्तीवर आणूं.! कारण पुढील कार्य तिजशिवाय कसें होईल?

( तिघांच्या मस्तकावर हस्तस्पर्श करितांच सावध होऊन )

**तिघे**—( नमस्कार करितात. )

**शिव**—( प्रत्येकास प्रेमालिंगन देऊन ) या, माझ्या जिवलगांनों, या! आपण या दुसऱ्या वाटेनें आपापल्या आसनप्रदेशीं जाऊं!

**तिघें**—चला महाराज ! ( सर्व जातात. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

**शिव**—राजा ! तुझ्या पायास बरीच दुखापत झाली असेल ! नाहीं का ?

**राजा**—नाहीं महाराज ! आपल्या कृपेनें कांहीं एक झालें नाहीं! हा पहा, पाय साफ आहे ! आणि, हा **देह** त्याच्या भक्ष्यस्थानीं पडला असता, ह्मणून त्यांत काय बिघडलें असतें ?

**तारा**—तर मग ! महाराज ! ओरडला होता तो कोण ?

**राजा**—अग, **भ्रम** ! दुसरा कोण ?

**शिव**—बरें, पण तो आतां तरी गेला, कीं बसला आहे कोठें कोना कोपऱ्यांत लपून अद्याप ?

**राजा**—महाराज ! तें आतां मला काय विचारतां ? आपण पाहिजे तर, आणखी खात्री करून घ्या !

**शिव**—राजा ! तुह्मां तिघांबद्दल माझी पूर्ण खात्री होऊन चुकली आहे ! आतां आणखी खात्री ह्मणून कांहीं राहिलेली नाहीं. असो ! पण राजा ! मला वाटलें होतें कीं, मगरमिठीमुळें, तूं, व या तुझ्या दोघी स्त्रिया, मघां अगदींच मूर्च्छित झाल्या होत्या !

**तारा**—महाराज ! मूर्च्छित कां होऊं ? आपण केलेला **अत्याचार** आह्मीं पाहिला नाहीं, असें आपल्यास वाटतें काय !

**राणी**—महाराज ! आह्मी तुमचा सर्व तमाशा पाहत होतों ! पण विचार असा केला ? आतां आह्मांस दोन्ही **देहाशीं** काय करावयाचें आहे ? खुशाल काय होतें तें होऊंदे !

**राजा**—महाराज ! आपण या राज्ञीचें चुंबन घेतांच, मीही अगदीं मोहजाळांत गुंतण्याच्या बेतांत आलों होतों ! शब्द ओंठापर्यंत येऊन थडकले सुद्धां ! पण पुनः महाराजांनीं दिलेले दृष्टांत

लक्षांत आणल्यावरून वाटलें कीं, आपण **दिवा** आहों. **गोल** किंवा **प्रकाश** कांहीं मी नव्हे.

**शिव**—शाबास ! एकूण तुह्मीं तिघें शुद्धीवर होतां ! अर्थात्, तुह्मी आपल्या **स्थूळ सूक्ष्म** देहाचा अभिमान साफ सोडून, माझा तमाशा, साक्षीरूपानें पहात होतां ! होयना ?

**तिघें**—होय महाराज ! ( पायांवर लोळतात )

**शिव**—( तिघांसही पोटाशीं धरून, घळ घळ प्रेमाश्रु वाहवितो ! ) राजा ! या उभयतांही मला **मायलेकी**प्रमाणें आहेत; असें मी मानित असतां, मला तुमच्या परीक्षेकरितां, भलताच विधि करावा लागला ! व त्यामुळें माझ्या लाडक्यांनो ! मी तुह्मांस व्यर्थ **त्रास** दिला ! याबद्दल मला क्षमा करा.

**तारा**—महाराज ! काय हें ! ' आह्मीं ' ह्मणून, आतां तर येथें कोणींच दिसत नाहींत !

**राणी**—( आपल्यासह तिघांच्या देहाकडे बोट करून ) या **साडेतीन** तीन हात लांबीच्या तीन **आकृति** केवळ कांचेच्या गोलाच्या ठिकाणीं असून, आंतील सर्व **मनोवृत्ति** ह्मणजे, आंतील आत्मदीपाचा **प्रकाश** आहे !

**राजा**—अर्थात्, दोन्ही देह गेल्यावर येथें बाकी राहिला कोण ? आणि जर **दिव्या**शिवाय कोणी नाहीं, तर **त्रास** कोणास ? कसा ? आत्मदीप तर **निःसंग** आहे !

**शिव**—शाबास बाळांनो ! आतां तुह्मांस मी कोठें ठेवूं सें मला झालें आहे ! हें हृदय विदारून अगदीं अंतःकपाटांत ठेवावें, असें वाटत आहे ! असो, आतां तुह्मांस पुढील भाग समजावून देतों. इकडे नीट लक्ष द्या.

**तिघें**—( चरणीं लागतात ).

**शिव**—( त्यांस आशिर्वाद देतात. )

**राजा**—महाराज ! आतां **कारण** व **महा**कारण नामक दोन देह कोणते, तें दाखविण्याची कृपा व्हावी !

**शिव**—ठीक आहे, माझ्यां जिवलगांनों ! नीट एकाग्र व्हा ! आतां पुढील काम जरा नाजूक आहे ! ऐका.

**तिघें**—( जरा पुढें सरकून एकाचित्त होतात.)

**शिव**—ज्याप्रमाणें एकाच **पंचमहाभू**त. समुदायाच्या, स्थूल व सूक्ष्म या दोन रूपांपासून, हें स्थूळ व सूक्ष्म, असे दोन **देह** झाले, त्याचप्रमाणें, कारण व महाकारण हे दोन्ही **एकच** असतां, त्यांत हीं **दोन** नांवें व्यर्थ आहेत !

**राजा**—( हात जोडून ) महाराज ! याचा अर्थ बरोबर कळला नाहीं. **कारणदेह व महाकारणदेह** एकच कसे ?

**राणी**—अग ! **स्थूळ** व **सूक्ष्म** हे दोन्ही **देह**, एकच कसे ?

**तारा**—ते दोन्ही **एकाच** पंचमहाभूतापासून उद्भवलेले आहेत, ह्मणून !

**शिव**—तर मग त्यांना दोन नांवें कां ?

**तारा**—त्यांची स्पष्ट ( स्थूळ ) व अस्पष्ट ( सूक्ष्म ) अशीं दोन रूपें आहेत ह्मणून !

**शिव**—वास्तविकपणें ?

**तारा**—दोन्ही मिळून एकच भूतसंघ आहे.

**शिव**—होय ना ?

**तारा**—पण महाराज, स्थूल सूक्ष्माप्रमाणेंच, कारण व महाकारण हेही दोनभेद, पंचमहाभूतांचेच कीं, काय ?

**शिव**—नाहीं, नाहीं ! पंचमहाभूतांपासून, फक्त, **स्थूळ व सूक्ष्म** हे दोनच देह ! या दोन्ही देहांपासून, तुम्हीं आतां विभक्त झालां ! आतां तुह्मांस पंचमहाभूतांची मुळींच बाधा नाहीं. तीं भूतें आतां मागें राहिलीं !

**तारा**—तर मग ! महाराज ! **कारण** व **महाकारण** हे भेद कोणाचे ?

**शिव**—राजा ! ऐक. मुलींनो सावध व्हा !

ज्या प्रमाणें,**काल** हा **एकच** असतां,प्रकाशकाच्या **भावाभावा-**

मुळें, त्यास अनुक्रमें, रात्र व दिवस हीं दोन नांवें व्यर्थ पडलीं आहेत, त्याचप्रमाणें **एकाच परमार्थ स्फूर्तीस**, **कारण** व **महाकारण** हीं दोन निरर्थक नांवें आहेत, वस्तुतः **कारण** व **महाकारण** हीं दोन्ही मिळून **एकच परमात्मस्फूर्ति** !

**राणी**—महाराज ! परमार्थस्फूर्ति ह्मणजे काय ?

**शिव**—राजा ! या तुझ्या स्त्रिया, कसकसे प्रश्न करताहेत यांकडे नीट लक्ष आहे ना ?

**राजा**—पतिपत्निसंबंध तर फार मागें राहिला ! शिवाय, महाराज ! मला आतां सर्व पूर्वस्मरण झाल्यामुळें, सगळी विषय सिद्धता, मला आरशाप्रमाणें दिसत आहे !

**शिव**—ठीक आहे ! शंका असल्यास तावडतोब विचारित जा. त्याचप्रमाणें मुलींनों ! तुह्मीही नीट लक्षपूर्वक ऐका ! " ज्याच्या पूर्वी कांहीं नसून ही सर्व सृष्टि नामरूपास आली, त्या अनादि अनंत रूपास " **परब्रह्मपरमेश्वर** असें ह्मणतात, हें नांव त्यानें आपल्यास घेतलेलें नसून, फक्त आह्मींच, आमच्या समजुतीकरितां, त्या स्वरूपास हें दिलेलें आहे !

त्या परमेश्वरास, कांहींही कारण नसतां, सहज "ॐ" असा ध्वनि करण्याची, प्रथम स्फूर्ति झाली ! त्या स्फूर्तीचें नांव **परमात्मस्फूर्ति** ! तिलाच **आदिमाया** असें ह्मणतात.

**तारा**—तर मग महाराज ! येथून, "त्या **परमात्मस्वरूपांत** जाऊन लीन होणार," असें ह्मटल्यास आणखी मध्यें किती पायऱ्यांचें अंतर आहे ?

**राणी**—अग चार ! नाहीं का महाराज ?

**शिव**—कोणत्या बरें ?

**राणी**—कारण, महाकारण, स्फूर्ति, परमात्मा!!! होयना महाराज?

**तारा**—बाईसाहेब ! पण कारण व महाकारण हे एकच आहेत, असें महाराज सांगत आहेत ना ?

**शिव**—ऐका. कल्पना करा. येथून या डोंगराच्या पलीकडे एक

**गांव** आहे. त्यांत आपल्यास जावयाचें आहे. आतां, येथून त्या **गांवास** जाण्यास किती पायऱ्याचें अंतर आहे, असा जर प्रश्न केला, तर तुह्मी काय बरें उत्तर द्याल.

**तारा**—मी ह्मणेन, " **फक्त एक डोंगर** आहे! "

**शिव**—परंतु वरील उत्तराच्या ऐवजीं जर कोणीं,

**पहिली** पायरी–चढण,
**दुसरी** पायरी–उतरण,
**तिसरी** पायरी–डोंगर, व
**चवथी** पायरी–तो गांव.

असें उत्तर दिलें, तर तें योग्य होईल काय ?

**राणी**—नाहीं महाराज ! " चढण व उतरण " ह्मणजे **डोंगर** !

**शिव**—अर्थात्, चढण उतरण या दोन्ही पायऱ्या, एका, ?

**राजा**—" **डोंगर** " शब्दाच्या पोटांत आल्या !

**शिव**—शाबास ! अर्थात्, आतां **डोंगर** व **गांव** अशा, राणीच्या समजुतीप्रमाणें दोन पायऱ्या राहिल्या.

**तारा**—पण महाराज ! " **गांव** " ही पायरी कसली ? **डोंगर** ओलांडला, कीं तो आलाच **गांवांत** !

डोंगराच्या आक्रमणानंतर, " **गांव** " ह्मणून आणखी निराळा नाहीं ! ह्मणून ह्मणत्यें, " मध्यें फक्त डोंगर ही, एकच **पायरी** आहे!" हेंच खरें ! चार ह्या नाहींतच, पण दोन तरी कशा ?

**राणी**—महाराज ! बरोबर आहे ! **तारेचें** उत्तरच रास्त आहे ! एक हेंच खरें !

**शिव**—झालीना आतां खात्री ? तर मग आतां तुह्मी त्या पलीकडच्या गावांतच आल्याप्रमाणें आहां !

**तारा**—पण मध्यें तो डोंगर नसता तर ?

**शिव**—होय. बरोबर आहे ! मध्यें तो **डोंगर** नसता, तर तो **गांव**, व हें स्थळ, मिळून एकच !

**तारा**—महाराज ! आपल्या सिद्धतेचें धोरण, आतां आलें माझ्या लक्षांत !

**शिव**—काय सांग पाहूं ?

**तारा**—सांगूं ? ऐका सांगत्यें:—

आह्मी, आतां **परमात्मा**रूपींच आहों ! पण मध्यें, ती **डोंगर** स्वरूपी, " ॐ " ही स्फूर्ति आहे !

**शिव**—वाहवा ! वाहवा ! वाहवा ! **तारे** शाबास तुझी ! फक्त मध्यें ती **स्फूर्ति** हेंच खरें !

**तारा**—पण महाराज ! ॐकार ह्मणजे ?

**शिव**—बाळे ! त्याचा अर्थ, सर्व विश्वाला व्यापूनही उरणारा आहे. पण त्या सर्वांचा तात्पर्यार्थ **मी** हाच होय !

**राणी**—हात्तिच्या ! महाराज ! ' डोंगर, डोंगर, डोंगर ' तो हाच का एकाक्षरी ? हा तर मी असा पटकन ओलांडून जाईन ! ( उडी मारून दाखविते. )

**शिव**—खरेंच आहे ! मुलींनो ! ज्याचा **स्थूळ सूक्ष्म** देहां-वरील अहंकार साफ गेला, त्यास हा एकाक्षरी डोंगर ओलांडणें, अगदीं सोपें आहे. तरी पण, त्याचीं **चढण उतरण**, अगदीं रीतसर आक्रमिली पाहिजे ! नाहीं तर, इतकें लांब चालत येऊन, उतावळीपणानें मध्येंच घसरलों, म्हणजे सर्व फुकट जाऊन, वरती आणखी हंशा व्हावयाचा !

**तारा**—महाराज ! अगदीं यथार्थ आहे. मग करा आतां दया.

**शिव**—ज्याप्रमाणें, चढणें उतरणें व डोंगर यांचा अर्थ फक्त **डोंगर** असा एकच आहे, त्याचप्रमाणें, कारण, महाकारण, व स्फूर्ति यांचा अर्थ, **'स्फूर्ति'** हा एकच आहे !

आणि, **स्फूर्ति** ह्मणजे **मी** असें वर सांगितलें आहे. अर्थात् या **मी**चा खुलासा, याचेंच नांव डोंगराचें उल्लंघन ! ! नीट लक्ष द्या !

कालाच्या ज्या तुकड्यांत सूर्यप्रकाश नसतो, त्यास **रात्र** व

ज्या तुकड्यांत सूर्यप्रकाश असतो, त्यास **दिवस** ह्मणतात. त्याच-प्रमाणें:—

जी स्फूर्ति, **मी** कोण, हें जाणत नाहीं तीच. **कारणदेह** व,

जी स्फूर्ति **मी** कोण, हें जाणते, तीच **महाकारण देह**!

वास्तविक, रात्र व दिवस हीं दोन्ही मिळून, **एकच** काल आहे! त्याचप्रमाणें, कारण व महाकारण मिळून, एकच **स्फूर्ति** आहे! याच दोन रूपांस अनुक्रमें **अज्ञान** व **ज्ञान** अशा संज्ञा आहेत!

दुसरा दृष्टांत पहा! हा तुमचा यजमान. राजकचेरींत सिंहासना-वर बसला, कीं याचें नांव **राजा.** व आतां हा एक साधारण मनुष्य, वास्तविक **हा** व **राजा,** यांत फरक काय आहे? कांहीं नाहीं आणखी दृष्टांत पहा.

एकच **स्त्री.** ती माहेरी असली, ह्मणजे **कन्या**पद व सासरी असली ह्मणजे **पत्नि**पद पावते, "मुलगी" व "पत्नि" हे दोन्ही, त्या स्त्रीवर वृथा आरोप आहेत. तोच प्रकार येथेंही **कारण** व **महाकारण** हे एकाच स्फूर्तीवर वृथा आरोप आहेत!

**तारा**—पण महाराज! हें आपलें मोघम उत्तर!

**शिव**—काय? मोघम उत्तर! तें कसें?

**तारा**—महाराज! पण मी आतां **कारण**देह, कीं **महाकारण** देह?

**शिव**—जर तूं आपल्यास "**मी कोण**" हें ओळखलेंस, तर तूं **महाकारण** देह, आणि, तें तूं न ओळखशील, तर तूं **कारण** देह! यांत मोघमपणा काय?

**राणी**:—पण महाराज! मी आपल्यास ओळखलें किंवा नाहीं याची **खुणा** काय?

**शिव**—शाबास! राणी तूं फार चांगला प्रश्न केलास! ऐका, **राजा** लक्ष आहे ना!

**राजा**—महाराज ! मी अगदीं एकचित्त आहें !

**शिव**—ऐका. सावधानचित्त व्हा.

तुह्मी जागे असतां, तुह्मां समक्ष जे जे व्यवहार घडतात, ते तुह्मांस बरोबर समजतात ना ?

**तारा**—हो ! आह्मी जातों, येतों, पहातों, वाचतों वगैरे सर्व व्यवहार आह्मांस स्पष्ट दिसतात !

**शिव**—ठीक, या अवस्थेस "**जागृति**" असें ह्मणतात. तसेंच मुली ! तूं सांग तूं कधीं **स्वप्न** पडलेलें पाहिलें आहेस ?

**राणी**—होय, महाराज ! मला पुष्कळदां स्वप्नें पडत असतात.

**शिव**—त्यांतून एखादें आतां आठवतें काय ?

**राणी**—होय महाराज ! मला हल्लींच थोड्या दिवसांपूर्वी, एक दिव्य चतुर्भुजमूर्ति स्वप्नांत दिसली ! व तिनें प्रसाद ह्मणून एक **आम्र-फळ,** माझ्या ओटींत घातलें !

**शिव**—मग तें आम्रफळ, तूं एकटीनेंच खाल्लें ? तारे, तुला तरी कांहीं दिलें होतें का ?

**राणी**—हें काय महाराज ! स्वप्नांतल्या वस्तु कोठें खऱ्या का असतात ? त्या, स्वप्न असे पर्यंतच दिसावयाच्या !

**शिव**—तर कोणत्या खऱ्या असतात ?

**राणी**—जागृतींतल्या खऱ्या असतात.

**शिव**—मुलींनो ! ज्याप्रमाणें स्वप्नातल्या वस्तु **मिथ्या,** त्यास्व प्रमाणें जागृतींतल्याही वस्तु **मिथ्याच** ! फरक इतकाच कीं, जागृ-तींतल्या वस्तूंना, आयुष्य कांहीं **जास्त,** व स्वप्नांतल्या वस्तूंना आयुष्य फक्त **स्वप्न** असेपर्यंतच !

**तारा**—महाराज ! मला वाटतें, **जागृति** तें एक **स्वप्नच** आहे ! कारण, नदीच्या प्रवाहांत राहून ओंजळीनें पाणी पीत असतां, पहिल्या ओंजळीनें जें पाणी प्यालों, तें पाणी दुसऱ्या ओंजळींत नाहीं! कारण, पहिली ओंजळ तोंडापर्यंत उचलून, पुनः ती खालीं नेईपर्यंत जो वेळ गेला, त्या मुदतींत, पहिल्या ओंजळीच्या सोबतीचें पाणी,

खालीं बऱ्याच अंतरापर्यंत वहात गेलेलें असतें ! व दुसऱ्या ओंजळींतलें पाणी, वरून फार दुरून वहात आलेलें असतें ! असा वास्तविक प्रकार असतां, पिणारा ह्मणतो, " पाणी एकच पीत आहें ! " त्याचप्रमाणें, **जागृतीं**त पाहिलेली वस्तु, कांहीं वेळानें, फिरून पहाण्यास सांपडते खरी, पण पहिल्या पहाण्यामध्यें जी वस्तु आपण पाहतों, तीच दुसऱ्या पाहण्यांत नसते.

उ०—आपण **चार** दिवसांपूर्वीं, एक बरोबर पांच वर्षें वयाचा मुलगा **गांवांत** पाहिला, व तोच पुनः आज येथें **रानांत** पाहिला. या दृष्टांतांत, तो चार दिवसांपूर्वीं पाहिलेला, व आजचा हा येथें, पाहिलेला मुलगा, जरी नदींतील पाण्याप्रमाणें **एकच** दिसतो, तरी वस्तुतः तो वेगळाच आहे. कारण, त्या दिवशीं त्याचें वय फक्त **पांच वर्षांचें** होतें. व आज त्याचें वय पांच वर्षें चार दिवसांचें आहे ! अर्थात्, त्याचें रक्त, मांस, अस्थि, केश, उंची, व वजन यांची—फार सूक्ष्म प्रमाणानेंच का होईना. कांहीं तरी वृद्धि झालीच असली पाहिजे ! पण ती वृद्धि, अत्यंत सूक्ष्म प्रमाणानें असल्यामुळें त्यावेळीं ती लक्षांत येत नसते. पण, त्याच सूक्ष्म प्रमाणांतील वृद्धीची बेरीज केली, तर तावडतोब तो प्रकार लक्षांत भरतो. **बाल्य, तारुण्य, वार्धक्य** हीं सूक्ष्मप्रमाण वृद्धीच्या बेरजेचींच रूपें दृग्गोचर होत असतात.

त्याचप्रमाणें, एखादें **आम्रादि** फळ, जें चार दिवसांपूर्वीं, **कच्चें** हिरव्या रंगाचें व आंबट असतें, तेंच उत्तम **पिकलेलें,** पिंवळ्या धमक रंगाचें, उत्तम गोड व घमघमीत सुगंधयुक्त होतें ! दिसण्यांत जरी एक, तरी वास्तविक **दुसरेंच** तें !

शिवाय, याचप्रमाणें प्रत्येक वस्तु, क्षणोक्षणीं झिजून किंवा वाढून, तिला नवीन नवीन रूप येत चाललेलें आहे !

इत्यादि गोष्टींवरून, हें जागृतींत दृष्टिगोचर होणारें सर्व जग; शुद्ध **स्वप्नच** आहे !

**राजा**—शाबास ! शाबास ! तारे ! काय तुझी **विचारसरणी** किती ह्मणून सूक्ष्म !

**शिव**—राजा ! खरोखरच, ही कल्पना विचार करण्यासारखी आहे ! एवढी जर ही एकच गोष्ट बरोबर लक्षांत बिंबली, तरीसुद्धां सर्व **मीपणा** साफ निघून जाण्यास ती पुरे आहे !

असो, मिळून **स्वप्न**ही तुह्मांस दिसतें म्हणावयाचें !

**राणी**—होय महाराज ! स्वप्नांतल्या सर्व गोष्टी, समक्ष पाहिल्याप्रमाणेंच दिसतात !

**शिव**—ठीक आहे. या दुसऱ्या अवस्थेस **स्वप्नावस्था** असें म्हणतात. पाहिली **जागृतावस्था,** ही **स्थूळ** देहाची असून ही **स्वप्नावस्था सूक्ष्मदेहाची** आहे !

**तारा**—असें असें ! ह्मणूनच **जागृतींत** वस्तु जरा स्थूल मानानें व **स्वप्नांत सूक्ष्म** मानानें दृग्गोचर होते !

**शिव**—यावरून, ज्याअर्थीं त्या दोन्ही अवस्था तुह्मांस दिसतात, त्याअर्थीं तुह्मी त्या अवस्थांचे **दृष्ट** आहां !

**तारा**—अर्थात्, त्या दोन्ही अवस्था, आह्मांस **दृश्य** ह्मणजे आह्मांहून साफ **भिन्न** झाल्या !

**राणी**—समजलें महाराज ! आतां कारण देहाची कोणती अवस्था !

**शिव**—ऐका. तुह्मी कधीं गाढ झोंपलां आहां काय ?

**तारा**—हो दररोज झोंपतों ना ?

**शिव**—मग तुह्मी उठल्यावर त्या अवस्थेचा **अनुभव** काय सांगाल ?

**तारा**—" **स्वस्थ झोंपलों होतों** " असा सांगूं !

**शिव**—पण त्यावेळीं, तुझ्या गळ्यांतील हार कोणीं हळूच काढला, तर तुला तो समजेल ?

**तारा**—नाहीं !

**शिव**—मग तूं त्या गोष्टीचा अनुभव कसा सांगशील ?

**तारा**—मी ह्मणेनः—"मी स्वस्थ झोंपल्यें होत्यें, तितक्या वेळांत मला कांहीं एक समजलें नाहीं."

**शिव**—मग तुला स्वस्थपणा व कांहीं एक **न** समजणेंपणा या दोन गोष्टींचें ज्ञान नाहीं का झालें ?

**तारा**—होय, पण एक शंका आहे.

**शिव**—विचार !

**तारा**—पण "कांहीं न समजणें" हें अज्ञान व समजणें तें **ज्ञान** असें वर सिद्ध झालें आहे !

**शिव**—बरोबर आहे, मीही तेंच ह्मणतों !

**तारा**—मग 'कांहीं न समजणें' हें ज्ञान कसें महाराज ?

**शिव**—राजा ! लक्ष दे.

"कांहीं न समजणें" हें **अज्ञानच** ! पण "कांहीं न समजणें" ही जी अवस्था, ती ओळखणें, हेंही **अज्ञानच** काय ? "स्वस्थ झोंपल्यामुळें, कांहीं समजलें नाहीं" ही स्थिति, जो वर्णन करितो, **तो**, व ती स्थिति, एकच काय ?

**तारा**—नाहीं ! महाराज, खचित नाहीं ! ती स्थिति **दृश्य** असून, ती पाहणारा तो तिचा **द्रष्टा** आहे !

**शिव**—या तिसऱ्या "**स्वस्थ** व **गाढ**" अवस्थेला '**सुषुप्ति** अवस्था' ह्मणत असून, ती अवस्था **कारणदेहाची** आहे !

मुली, राज्ञी ! आतां तूं सांग पाहूं, प्रत्येक देहाच्या अवस्था.

**राणी**—आज्ञा.

स्थूळ देहाची अवस्था जागृति.
सूक्ष्म " " स्वप्न, व
कारण " " सुषुप्ति.

**शिव**—ऐका ! आतां आपलें मकाण अगदीं नजीक आलें !

**तिघें**—( एकाग्र ) सांगा महाराज !

**शिव**—त्या तिन्ही अवस्थांचें तुह्मांस ज्ञान आहे काय ?

**तारा**—हो. अगदीं स्पष्ट !

**राणी**—होय, महाराज ! मलाही या अवस्था स्पष्ट दिसत आहेत !

**शिव**—( त्यांच्या हातावर टाळी देऊन ) बस्स ! झालें तर तुह्मी "**महाकारण**" आणि जर, तुह्मांस या तिन्ही अवस्था दिसत नसतील, तर तुह्मी "**कारणदेह**" ! ओळखा, तुह्मीं आतां आपल्यास **कारण**, कीं, **महाकारण** तें !

**तारा**—महाराज, मी महाकारण आहें !

**राणी**—महाराज ! मीही महाकारण आहें ! कारण, तिन्ही अवस्था मला दिसत आहेत !

**राजा**—महाराज ! मी सुद्धां महाकारण आहें !

**तारा**—पण महाराज ! मघांच्या या दिव्याच्या दृष्टांतांत.

१ हा कांचेचा **गोल** ( शरीर ) हा, **स्थूळ** देह, व

२ **दीपप्रकाश** ( मनोविकार ) हा **सूक्ष्म** देह; असें मानलें तर, **कारण,** व **महाकारण** देह कोणते ?

**शिव**—तारे ! प्रश्न फारच मार्मिक आहेत ! ऐका.

३ दिव्याची **दाहक**शक्ति ( अज्ञान ), हा कारण देह व

४ मूर्तिमंत **दिवा** ( ज्ञान ) हा महाकारण देह.

**तारा**—समजलें महाराज ! पण या अज्ञानास कारणदेह अशी संज्ञा देण्याचें कारण काय ?

**शिव**—सर्व सृष्ट्युत्पत्तीस, तें **कारण** आहे, ह्मणून !

**राणी**—**सृष्ट्युत्पत्ती**स कारण, **अज्ञान** कसें ?

**शिव**—तें **अज्ञान** जर, " आपणास स्वरूप समजत नाहीं, " इतकेंच ह्मणून स्वस्थ बसतें, तर **सृष्ट्यु**त्पत्ति झालीच नसती पण तें, आपलें स्वतःचें स्वरूपतर विसरलेंच; पण, **स्थूळ सूक्ष्म** देहही **मीच** ह्मणूं लागलें ! इतकेंच नव्हे, पण या **स्थूळ** देहाबाहेरील सर्व बाह्यसृष्टि, हीही **मीच**, असें भ्रमानें बरळत सुटलें ! आणि ह्मणूनच, हा सर्व सृष्टिव्यवहार सुरू झाला ! अर्थात्, सृष्ट्युत्पत्तीला कारण " **अज्ञान** " हेंच आहे !

**तारा**—महाराज ! दुसराही एक सोपा दृष्टांत येथें योजितां येईल.

**शिव**—कोणता बरें ?

**तारा**—या सृष्टींत प्रत्येक क्षणाक्षणाच्या ठिकाणीं, जे अनंत प्राणी जन्मास येताहेत, त्यांच्या उत्पत्तीचें मूळ '**अज्ञान**' नाहीं तर दुसरें काय ?

**शिव**—बरोबर आहे. **विकारवशता** हें **अज्ञानच** आहे. विकारवश न झाल्यास, नरनारी **संगम** अनियमित झाला नसता. अर्थात्, ही प्राणी संख्याही, अमर्यादित झाली नसती ! असो; शिवाय, यासंबंधानें दुसराही एक विचार आहे.

**तारा**—तो कोणता ?

**शिव**—**अज्ञान** हें, सृष्टयुत्पत्तीस कारण कसें, हें आतां सांगितलें. तें जसें सृष्टीच्या उत्पत्तीस कारण आहे, तसेंच तें ज्ञान-प्राप्तीसही कारण आहे, काळोख असतो, ह्मणून कोणीतरी दिवा लावतो. या अज्ञानाची **उत्पत्ति** झाली, ह्मणूनच तें नाशून त्याच्या बदली **ज्ञानाची स्थापना** करावयाची ! वस्त्रप्रावरणाची अत्यंत **जीर्णता**, हेंच नवीन वस्त्रपरिधानास कारण. त्याचप्रमाणें; **ज्ञानाची**, व ज्ञानाची ह्मणजे अर्थात् **परमात्म्याची**, प्राप्ति करून देण्यास मूळकारण, हें अज्ञानच आहे ! ह्मणूनही, त्यास **कारण देह** हें नांव दिलेलें आहे. आणि या त्याच्या गुणावरूनच, त्या **कारणदेहाची सत्वगुणा**मध्यें गणना आहे !

**राजा**—ह्मणजे ? या **चतुर्देहांस**ही **गुण** आहेत वाटतें ?

**शिव**—होय **स्थूळ, सूक्ष्म, कारण** व **महाकारण** या चार देहांचे **तम, रज, सत्व** व **शुद्धसत्व** हे चार, यथानुक्रमें गुण आहेत !

**तारा**—याशिवाय, आणखी या चार देहांस कोणकोणत्या उपाधी आहेत ?

**शिव**—या चार **देहा**संबंधानें, चार **स्थानें**, चार **भोग**, चार

**मात्रा**, चार **गुण**, चार **शक्ति**, चार **वाणी**, चार **अवस्था**, मिळून या चार **देहांसह**, सर्व **बत्तीस** तत्वें आहेत !

**तारा**—आणि **स्थूळ सूक्ष्म** देहाचीं **पंचवीस पंचवीस** तत्वें, सांगितलीं आहेत तीं ?

**शिव**—होय, तीं **पन्नास** व हीं **बत्तीस** मिळून सर्व तत्वें **ब्याऐंशीं** आहेत.

**तारा**—स्थूळ सूक्ष्माचीं पन्नास तत्वें, आमच्या लक्षांत चांगलीं ठसलीं आहेत. आतां हीं बत्तीस तत्वें, आम्हांस या वृक्षपर्णावर लिहून द्या.

**शिव**—ठीक आहे. ( लिहितो ).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| देह— | स्थूळ | सूक्ष्म | कारण | महाकारण |
| स्थानें— | नेत्र | कंठ | हृदय | मूर्ध्नि |
| भोग— | स्थूळ | प्रविविक्त | आनंद | आनंदावभास |
| मात्रा— | अकार | उकार | मकार | अर्धमात्रा |
| गुण— | तम | रज | सत्व | शुद्धसत्व |
| शक्ति— | द्रव्य | क्रिया | इच्छा | ज्ञान |
| वाणी— | वैखरी | मध्यमा | पश्यंति | परा |
| अवस्था— | जागृति | स्वप्न | सुषुप्ति | समाधि |

हीं घ्या ! ( वृक्षपत्र देतो. )

**तिघें**—( एकाग्र पहातात. )

**तारा**—महाराज ! या **स्थूळ** देहाचें **नेत्र**स्थान कसें ?

**शिव**—बरोबर आहे. या **स्थूळ** देहाची **मदार** काय ती नेत्रांवरच आहे. ते गेले कीं, **स्थूळ** देह, परस्वाधीन होऊन पडलाच !

**राणी**—महाराज ! आणि **स्थूळ** देहास, **भोग**ही स्थूळच पाहिजेत. **क्षुधातृ**षादि शमनार्थ प्रत्यक्षच **अन्नो**दक पाहिजे. तें स्वप्नातलें चालावयाचें नाहीं !

**राजा**—व स्वप्नांतल्या क्षुधेस, प्रत्यक्ष अन्न चालावयाचें नाहीं.

**शिव**—नाहीं. हे चारी देह प्रत्येकीं स्वतंत्रच व अव्यभिचारी

आहेत ! आणि ह्मणूनच **सूक्ष्म** देहाचा भोग. **प्रविविक्त** ह्म० **अत्यंत** एकांतवासी !

**तारा**—महाराज ! बरोबर आहे. आतां **मात्रा** ह्मणजे काय, तें सांगा.

**शिव**—**मात्रा** ह्मणजे, अत्यंत प्रेमाचा कोणताही **विषय.**

**तारा**—मग ! अकार, उकार, मकार तें काय ?

**शिव**—ऐका "ॐ" हा ध्वनि' 'अउम' मिळून झालेला आहे, हें व्याकरण दृष्ट्या सहज समजण्यासारखें आहे.

आणि परब्रह्म परमेश्वरास जी **पहिली** स्फूर्ति उद्भवली, ती ही ॐ हीच आहे. व त्या स्फूर्ति पासूनच **आदिमाया** उत्पन्न होऊन, तेथून मग, सर्व **सृष्ट्युत्पत्ति** झाली आहे. हा सर्व प्रकार **राजा** ! तूं पाहिलासच आहेस ! ह्मणून वेदांत शास्त्रवेत्त्यांनीं, तो **ॐकार** चारी देहांस यथानुक्रमें वांटला !

**तारा**—ठीक आहे. पण, **अर्धमात्रा** ती कोणती ?

**शिव**—ती अर्धमात्रा, तीन प्रकारांनीं पाहतां येईल.

१ पहिला प्रकार—ॐकारध्वनि, लिहून दाखविण्याच्या अक्षरावरून:—अ, उ, म्, मिळून ( ॐ ) ही आकृति बनली. बाकी **अर्धचंद्राकार** ( ‿ ) अशी खुणा राहिली, हीच **"अर्धमात्रा"** !

२ दुसरा प्रकार—वरील ॐकाराच्या उच्चारावरून वरील ध्वनि उच्चारतांना, आरंभींच तोंड उघडावें लागतें; व अंतीं ( म् ) हा वर्ण ओष्ठ्य असल्यामुळें, ओंठास ओंठ लावून, तोंड मिटावें लागतें याप्रमाणें तोंड मिटतांच, त्या ध्वनीच्या पूर्तते करितां, जो कंठांतल्या कंठांत, **(म्म्म्)** असा अस्पष्ट ध्वनि होतो, तीच "**अर्धमात्रा.**"

३ व तिसरा प्रकार— त्याच्या अनुभूत ज्ञानावरून !

स्थूळ देह, ही अकार मातृका,<br>
सूक्ष्म देह, ही उकार मातृका, व<br>
कारण देह, ही मकार मातृका;

असून, **मी** या **तिन्ही देहांस**, त्यांच्या अवस्थादिकांसह पूर्ण-

त्वानें पाहणारा, वरील तिन्ही देहांहून साफ **निःसंग** आहे, हा जो शुद्ध सत्वगुणी " **अहंकार** " तीच **अर्धमात्रा** !

**राणी**—महाराज ! आतां **शक्ति** तें काय ?

**शिव**—प्रत्येक देहास एक एक शक्ति आहे. " **द्रव्य** " याचा अर्थ, " पाझरण्यास किंवा विरण्यास योग्य " असा आहे. स्थूळ देह हा, पुष्ट कृशादि होत असतो. हें तुह्मांस अनुभूत आहेच ! ह्मणूनच, स्थूळ देहाची **द्रव्यशक्ति** !

**तारा**—बरोबर महाराज ! त्याचप्रमाणें, **इंद्रियें** व **पंचप्राण** वगैरे हे, क्रिया करण्यास साधनभूत आहेत. ह्मणूनच **सूक्ष्मदे**हाची " **क्रियाशक्ति** " !

**शिव**—होय. त्याचप्रमाणें, कारण देहाचें स्थान **हृदय** हें आहे. व प्रत्येक मनोविकार तेथून उद्भवतो. ह्मणनच कारण देहाची, **इच्छा शक्ति** !

तसेंच अज्ञान हा " **कारणदेह** " असून, ज्ञान हा " **महाकारण** " देह आहे. असें तुह्मांस मघां दाखविलें आहे. ह्मणूनच महाकारण देहाची " **ज्ञानशक्ति.** "

**राणी**—आणि **वाणी** तें काय ?

**शिव**—वाणी ह्म० **वाचा**. ही चार प्रकारची आहे. प्रत्येक ध्वनि जो ओष्ठयुग्मांतून बाहेर पडतो, तो, मूलस्थानापासून, एकाहून एक सूक्ष्म अशा चार चाळणींतून बाहेर पडत असतो. उ० " मी " हा एकाक्षरी शब्द आहे.

१—याचा उच्चार करण्याचें मनांत येणें, हीच पहिली, अत्यंत सूक्ष्म **चाळण** ! तिचेंच नांव **परा** ही **महा**कारण देहाची वाणी !

२ "**मी**" शब्द उच्चारण्याचें मनांत आल्यावर, मग त्याचा ठाम निश्चय होणें, हीच दुसरी चाळण. हिचें नांव '**पश्यंति**' ही **कारण** देहाची वाणी !

३—निश्चय झाल्यावर, मग तो शब्द **कंठाच्या** ठिकाणीं उँ

अँ अशासारख्या अस्पष्ट ध्वनीनें श्रुत होतो, **तो ध्वनि,** तांच **मध्यमा**. ही सूक्ष्म देहाची वाणी. **तिसरी** चाळण हीच !

४—याप्रमाणें, कंठापर्यंत तो शब्द आल्यावर मग, पूर्ण **स्पष्ट ध्वनीनें** मुखावाटे बाहेर पडतो. हीच **चवथी** चाळण ! हिचें नांव **वैखरी** ! ही स्थूळ देहाची वाणी.

**तारा**—अहाहा ! महाराज ! सर्वतोपरी कृपा केली ! !

**शिव**—मुलींनो ! सांगा आतां, तुह्मांस काय काय अनुभव वाटतो तो.

**राणी**—महाराज ! स्थूळ, सूक्ष्म, कारण हीं **मी** नसून, मी महाकारण **देह** आहें !

**तारा**—महाराज ! **नेत्र, कंठ, हृदय** ही माझीं स्थानें नसून (मूर्ध्नि) हें माझें स्थान आहे. पण महाराज मूर्ध्नि ह्मणजे ?

**शिव**—मूर्ध्नि ह्मणजे मस्तकांतील उच्चतम स्थान ! राजा पुढें तूं सांग.

**राजा**—आज्ञा महाराज ! **स्थूळ प्रविविक्त, आनंद** हे माझे भोग नसून, आनंदावभास ह्म० आनंदाचा डंका, हा माझा **भोग** आहे !

**तारा**—त्याचप्रमाणें, अकार, उकार, मकार ह्या माझ्या मात्रा नसून **अर्ध**मात्रा, ही माझी **कालमर्यादा** आहे !

**राणी**—महाराज ! **तम रज सत्व** हे माझे गुण नसून, शुद्धसत्व हा माझा **गुण** आहे !

**तारा**—त्याचप्रमाणें, **द्रव्यशक्ति, क्रियाशक्ति, इच्छाशक्ति** या माझ्या शक्ति नसून, **ज्ञान** ही माझी **शक्ति** आहे !

**राजा**—त्याचप्रमाणें, **वैखरी, मध्यमा, पश्यंति,** या माझ्या वाणी नसून, **परा** ही माझी **वाणी** आहे.

**राणी**—आणि त्याचप्रमाणें, **जागृति, स्वप्न, सुषुप्ति** या माझ्या अवस्था नसून; समाधि ही माझी **अवस्था** आहे. पण महाराज ! **समाधि** ती कोणती अवस्था ?

**शिव**—ती आतां समक्षच कळेल ! राजा ! तुला आणखी काय अनुभव येतो ?

**राजा**—महाराज ! मी महाविपरीत ज्ञानमय, विपरीत ज्ञानमय किंवा अज्ञानमय नसून, केवळ ज्ञानमय आहें.

**शिव**—हीं चार नांवें तूं कोणकोणास ठरवलीं !

**राजा**-- १ मी **आत्मा, शिव, महाकारण**, हें **समजणें**, हेंच **ज्ञान.**

२ मी कोणकोणास ठाऊक ? असें, **नेणणें**-हेंच **अज्ञान.**

३ मी सूक्ष्म देह. **मन बुद्धि** प्राण **मी,** असें समजणें; हेंच **विपरीत ज्ञान.**

४ आणि, मी **स्थूळ** देह. **अस्थिमांसमय गोळा मी,** असें समजणें, हेंच **महाविपरीत ज्ञान.**

या शिवाय, स्थूळ देहाच्याही **बाह्यवर्ती,** गृहसुतदारा धनादि सर्व सृष्टि ही, **मीच** असें ह्मणणारी, कांहीं मंडळी असते; तिच्या ज्ञानास काय नांव द्यावें, तें कळत नाहीं !

**तारा**—महाराज ! मला वाटतें, त्या ज्ञानास "**अत्यंत विपरीत ज्ञान**" ह्मणावें !

**शिव**—शाबास ! चांगलें विवरण झालें ! त्याचप्रमाणें, **स्थूळ सूक्ष्मादि तीन** देहांचा **अभिमानी** तो **जीव** व **महाकारण** देहाचा **अभिमानी,**तो **शिव.** हेंही तुह्मांस पूर्वीं सांगितलेंच आहे !

**तारा**—( डोळे मिटून आत्मविचार करित्ये ).

**राणी**—अग ! तूं दिसवभर डोळे मिटून काय करित्येस ?

**राजा**—तिचें बरोबर आहे ! कारण **नेत्र** हें **स्थूळ** देहाचें स्थान असल्यामुळें, त्याच्या योगें **स्थूळ** सृष्टि, **भासमान** होत्ये. या करितां, या नंतर आपण त्रिवर्गींनीं मूर्ध्नि स्थानींच वस्तीस गेलें पाहिजे !

**राणी**—बरोबर आहे महाराज ! ( तीही डोळे मिटते. )

**शिव**—माझ्या जिवलगानो ! आतां आपापलें स्थान दृढ धरा व स्वतःचा अनुभव प्रत्येकजण सांगा पाहूं.

**तिघें**—( डोळे मिटून आनंदानें डुलतात. )

**राजा**—भाऊ ! शिवराया ! काय हा आज माझा भाग्योदय ! अहाहा ! महाराज ! मी शिवरूप **महाकारण** देह असून, मूर्ध्नि, हें माझें स्थान आहे. माझा भोग, **आनंदावभास** हा असल्यामुळें मला सर्वत्र **आनंदिआनंद** दिसत आहे !

फक्त, माझी **अर्धमात्रा** असल्यामुळें, माझे ठायीं केवळ "**शुद्ध-सत्व**" एवढाच गुण शेष असून मी शुद्ध, **ज्ञानमय** होऊन राहिलों आहें !

**तारा**—महाराज ! माझीही स्थिति, तंतोतंत यांनीं वर्णन केल्याप्रमाणेंच झाली आहे ! परंतु सरकारनीं एक गोष्ट सांगावयाची ठेविली आहे, असें वाटतें.

**राणी**—होय महाराज ! सरकारनीं आपली "**वाणी**" कोणती हें सांगितलें नाहीं !

**राजा**—होय महाराज ! विसरलों खरेंच. "**परा**" ही माझी वाणी आहे.

**तारा**—( किंचित् हंसत्ये. )

**राणी**—( रागानें ) काय हंसतेस काय ? बरोबर आहे सरकारचें उत्तर !

**तारा**—बाईसाहेब ! आपण सांप्रत **शिव**रूपासारख्या **उच्च**-पदारूढ झालों आहों, तेव्हां **क्रोधा**सारख्या **जडात् जडतर** मनोवृत्तीस आपल्या ठायीं प्रवेश करतां कसा येईल ?

**राणी**—तारे ! मी रागवत नाहीं. पण खऱ्या उत्तरावर उगीच खो खोकन् हंसावयाचें, ह्मणजे ?

**तारा**—बाईसाहेब ! मी हल्लींच थोड्या दिवसांपूर्वी आपल्या राजधानींत एक ब्राह्मण पाहिला ! खरोखर आंधळे, किंवा **आंधळा**

या नांवावर पोट भरणारे, भिक्षुक, गांवांत पुष्कळ असल्यामुळें यानें आपल्या **फेरीची** नवीनच **पुकारणी** सुरू केली !

**राणी**—ती कशी काय ?

**तारा**—तो असें ओरडत जाई " महाराज ! हा **मुका ब्राह्मण** हो ! ह्या गरीब अनाथ ब्राह्मणास कांहीं धर्म करा हो ! "

**राणी**—ह्मणजे ?

**राजा**—शाबास ! तारे ! तुझी येथें करावी तितकी स्तुति थोडीच आहे !

**राणी**—महाराज ! मी अद्याप यांत कांहींच समजलें नाहीं !

**शिव**—ऐक. तो ब्राह्मण जी पुकारणी करी, ती योग्य होती काय ?

**राणी**—हो ! तो जर अनाथ असला, तर त्यानें भिक्षेशिवाय दुसरें काय बरें करावें ?

**शिव**—तें योग्य आहे ! पण त्याचे पुकारणीचे शब्द कोणते ? इकडे तूं लक्ष दिलें कां ?

**राणी**—हो दिलें! कोणी **आंधळा** असल्यास "**आंधळ्यास** धर्म कराहो बाई "! असें म्हणतो, व हा मुका होता, ह्मणून "**मुक्या** ब्राह्मणास धर्म करा हो" असें ह्मणतो ! मग यांत काय ?

**तारा**—( पुनः हंसते ).

**राजा**—अग ! मुका ह्मणजे काय ?

**राणी**—ज्याला बोलतां येत नाहीं, तो !

**शिव**—मग ?

**राणी**—( उमजली ! ) समजलें महाराज ! समजल्यें ! तो जर मुका तर ह्या मुक्या ब्राह्मणास धर्म कराहो बाई ! असें जें तो ह्मणत आहे, ह्या ह्मणण्यांत कांहीं अर्थच नाहीं !

**तारा**—जर तो खरोखर **मुका** असता, तर त्याला वरील शब्दांपैकीं एक अक्षरही उच्चारतां आलें नंसलें पाहिजे, व जर त्याला आपण मुका असें बोलतां येतें, तर तो **मुका नसला** पाहिजे ! आतां गेलाना राग ?

**राणी**—नाहीं, तारे तुजवर माझा राग कधींच होणार नाहीं. तूं माझा **प्राण** आहेस, ह्मणून मी पूर्वीच तुला सांगितलें आहे! पण, तारे! तुझ्या हंशाचें कारण अद्याप कोठें बाहेर पडलें नाहीं तें?

**राजा**—आणखी कसें बाहेर पडावयाचें? अगदीं स्पष्ट खुलासेवार बाहेर पडलें आहे!

**राणी**—तें कसें?

**राजा**—अग? **परापश्यंत्यादि** चार वाणी आतांच महाराजांनीं सांगितल्या, त्यांचीं लक्षणें पुनः जरा लक्षांत आण पाहूं!

**राणी**—( उमजली! ) महाराज, आलें लक्षांत! अगदीं **पहिली स्फूर्ति**, हीच जर '**परा**' तर ती तोंडावाटे नगाऱ्याच्या शब्दानें बाहेर कशी पडेल? अर्थात्, '**माझी वाणी परा**' हें ह्मणणें, '**मी मुका**' या ह्मणण्यासारखेंच हास्यास्पद खरेंच! ( हंसते )

**शिव**—झाली तुमची सर्वांची समजूत? मग सांगा पाहूं तुमचा कसा काय अनुभव आहे तो?

**तारा**—महाराज! आतां मला दुसऱ्या कोणत्याही अन्य संबंधाच्या प्रश्नांचें उत्तर देतां येईल; पण '**मी आत्मा**' या गोष्टीचा अनुभव, आतां मला बोलून दाखवितां येणें शक्य नाहीं!

**शिव**—तर?

**राणी**—महाराज! तो **अनुभव**, आंतल्या आंत अंतरंगांत आनंदाच्या ज्या गुदगुदल्या करील; त्यांतच पाण्यांतील मिठाप्रमाणें, **लीन** होऊन असावयाचा!

**राजा**—अहाहा! महाराज! **जें वाचेनें बोलतां येत नाहीं,** तें **काय** वर्णन करावें?

**शिव**—पुनः ऐका! जें बोलून दाखवितां येत नाहीं, अशा प्रकारचें जें "**आत्मस्वरूप**" त्याच्या ठायीं आठ प्रकारच्या उपाधि आहेत!

१ **महाकारण**, हा माझा **देह.**

२—**मूर्ध्नि**, हें माझें **स्थान.**

३—**आनंदावभास**, हा माझा **भोग.**

४—**अर्धमात्रा**, ही माझी **मात्रा.**

५—**शुद्धसत्व**, हा माझा **गुण.**

६—**ज्ञान**, ही माझी **शक्ति.**

७—**परा**, ही माझी **वाणी.**

८—**समाधि**, ही माझी **अवस्था.**

**तारा**—पण महाराज ! **समाधि** अवस्था, आह्मांस आपण अद्याप नाहीं दाखविली !

**शिव**—ऐका ! वरील आठही **उपाधि**, नीट विचारांत आणून वेगळ्या केल्यास, आपली जी अवस्था होईल, त्या अवस्थेचें नांव **समाधि !** करितां, ती अवस्था आतां तुह्मांस प्राप्त होण्याचा काल अगदीं नजीक आला आहे. तो येण्यापूर्वीं, मला एक उत्तर **वैखरी** वाणीनें द्या.

**तिघे**—काय बरें ?

**शिव**—वरील आठही उपाधि वर्ज केल्यास, आपले ठिकाणीं फक्त " **परा** " वाणीनें बोलण्यासारखें, काय शिल्लक राहील ?

**तिघे**—" **मी आत्मा** ", हें अनुभूत ज्ञान !

**शिव**—पण, तें असें ओरडून सांगावयाचें कां ?

**तिघे**—( उत्तर न देतां, समाधिस्थ होतात ! )

**शिव**—बस्स ! झालें आपलें काम ! आतां, हें आपलें **आत्मस्वरूप** संपूर्ण **विश्वाशीं** कसें **एकरूप** करावयाचें, याची थोडी माहिती दिली कीं, आपलें स्वरूप व हें **विश्वरूप** अगदीं **एक** होऊन जाईल ! असो, आपण आतां पुढील कार्य पाहूं ! ( जातो. )

( पडदा पडतो. )

**चौथा अंक समाप्त.**



# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—( त्रिवेणी संगम–हरिद्वार. )

**शिव**—( तिघें समाधिस्थ पाहून ) अहाहा ! शाबास या तिघांची ! चतुर्देहाची साक्ष यांस बरोबर पटली, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं ! तथापि, यांच्या ठायीं, '**मी आत्मा**' एवढा तरी शुद्धाहंकार अद्याप शेष आहेच ! तो तेवढा साफ कमी झाला कीं, **संपूर्ण ब्रह्मांड** यांस **आत्मरूपच** दिसूं लागेल ! व "**जगीं आपण भरला, आपणामाजी जग पाहे**" अशी यांची **स्वानुभूति** होईल ! आणि तसें झालें, तरच यांची **सत्स्वरूपलीनता** खरी ! नाहीं तर, **चोर वाटाण्यांची** गत ! करितां, यांस पुनः देहावर आणून, '**सर्वंखल्विदं ब्रह्म**' या महावाक्याचा अनुभव देऊं ! ( त्यांच्या मस्तकास हस्तस्पर्श करतांच ते शुद्धीवर येतात. )

**राजा**—( हळू नेत्र उघडून ) अहाहा ! कोण गुरु महाराज ! ( जलदीनें जाऊन नमस्कार करितो ) महाराज ! काय सांगूं तें अप्रतिम सौख्य !

**राणी**—(नमस्कार करून) दयासिंधो ! कृतार्थ केलें !

**तारा**—( पाय धरून ) सर्व सौख्यें यापुढें रद्द आहेत ! महाराज ! "**मी आत्मा**" याशिवाय दुसरें कांहींही आह्मांस दिसत नाहीं !

**शिव**—ठीक आहे ! आतां फक्त "**मी ब्रह्म**" एवढाच सूक्ष्माहंकार, केवळ "**परा**" वाणींनें आपल्या तिघांच्या ठायीं ध्वनित होत आहे ! तो गेला कीं, **अनादि, अपार, परब्रह्म स्वरूपाशीं** तुमचें **तादात्म्य** झालें !

**तारा**—पण महाराज ! "**मी आत्मा**" ही जर आमची प्रत्येकाची खात्री झाली आहे, तर आणखी पुढील खटपट कशाला पाहिजे ?

**शिव**—ऐका, पुनः एकचित्त व्हा, सांगतों ! तारे, मी आत्मा एवढाच जर दृढाहंकार घेऊन कोणी बसेल, तरीही, तो प्रकार बरोबर नव्हेच !

**तारा**—तो कसा ?

**शिव**—वरील अहंकारानें, कदाचित् **आपलपोटेपणा, निष्ठुरता**, व जगाचा **बेपर्वाईपणा** उद्भवण्याचा संभव आहे !

**राणी**—तो कसा महाराज ? आह्मांस आतां जगाशीं काय करावयाचें आहे ?

**शिव**—( टाळी मारून ) हें पहा ! हेंच तें ! याचेंच नांव **आपलपोटेपणा !**

**तारा**—महाराज ! हेंच तें काय ?

**शिव**—अग ! "**ब्रह्मविद्या** ह्मणजे **आपलपोटी विद्या**. हिच्या योगें जगास यत्किंचितही फलप्राप्ति नाहीं" असें जे कित्येक विद्वान् मंडळांत मोडणाऱ्या गृहस्थांचे उद्गार ऐकूं येतात, ते मग खरे ह्मटले पाहिजेत !

**तारा**—महाराज ! आपण काय ह्मणत आहां, त्याचा मथितार्थ अद्याप माझ्या लक्षांत आला नाहीं !

**शिव**—मुलींनो ! नीट लक्ष द्या. "**मी आत्मा**" ह्मणून समजल्यानेंच सर्व झालें नाहीं. मी तर "**ब्रह्म**" आहेंच ! पण, यच्च यावत् जीवजंतु व वृक्षपाषाणासह, ही अखिल सृष्टि, हीही **ब्रह्मरूपिणीच** आहे, अशी खात्री व स्वानुभवसिद्ध स्थिति झाली पाहिजे !

**राणी**—ती कशासाठीं ? "आपलें पान धुवावें, आपण जेवावें" जगाची पंचाईत आपल्यास कशाला ?

**शिव**—शाबास ! हें **आत्मज्ञान** उत्तम ! अग **जगाची** का-

ळजी जर तुह्मांस नको, तर जगानें तरी, तुमची काळजी काय ह्मणून करावी ?

**राणी**— **जग** आमची काय काळजी घेत आहे ?

**शिव**—अग ! जगाशिवाय, एक निमिष मात्र तरी, आपलें अस्तित्व असूं शकेल काय ? हें पहा ! अन्नवस्त्रादि आपल्या सर्व भोग्य वस्तु, आपणच उत्पन्न केल्या आहेत काय ?

या नदीनें आह्मांस उदक कां द्यावें ? या वृक्षांनीं आपल्यास छाया फळ पुष्परसादि कां पुरवावें ? शेतकरी, कोष्टी, उदमी, व्यापारी यांनीं आह्मांकरितां सर्व जिनसा कां तयार करून ठेवाव्या ? आपण आजारी पडलों असतां, वैद्यानें आह्मांस औषध कां द्यावें, व हरएक संकट-समयीं आह्मांस दुसऱ्यानें सहाय कां करावें ?

**तारा**—बरोबर आहे महाराज ! या भूमीनें तरी, आह्मांस आ-पल्या पाठीवर कां वहावें ?

**तारा**—महाराज ! जगाचा उपयोग आह्मांस फारच आहे खरा ! वरील विचार माझ्या स्वप्नींही नव्हते !

**शिव**—आतां तरी झालीना खात्री ? जगाची आह्मांस सहानुभूति नसती तर, आपलें, या भूतलावर क्षणभरहि वास्तव्य होणें दुर्घट झालें असतें ! ह्मणूनच, ज्या जगानें आपल्यावर एवढे उपकार केले त्याचा आपला कांहीं संबंध आहे कीं नाहीं, याचाही विचार पाहणें जरूर आहे !

**राजा**—पण महाराज ! ही संपूर्ण सृष्टि **अष्टधाप्रकृतिच** आहे. असें मागें ठरलें आहे ना !

**शिव**—हें ठरलें असतां, "जगाशीं आह्मांस काय करावयाचें आहे ?" असे शब्द तुमच्या तोंडावाटे कसे बाहेर पडले !

**तारा**—महाराज ! ती चूक आहे ! क्षमा असावी !

**शिव**—अग, ! जगांतील **अणुरेणु परमाणु** ही जर पूर्वोक्त **अष्टधाप्रकृतीमध्येंच** समाविष्ट होतो, व आपणही तीच आहों, तर त्या सृष्टीचें व आपलें **मूळ एकच** असलें पाहिजे, असें नाहीं का ठरत ?

**राजा**—महाराज ! ज्याच्यापूर्वी कांहींही नाहीं, असें जें **परब्रह्मस्वरूप**, त्यापासूनच जर, **आदिमायादि** सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे, तर सर्व सृष्टी ह्मणजे, **एक ब्रह्मरूप** आहे, हें सिद्ध झालेंच !

**शिव**—होयना ! तर हीच गोष्ट दुसऱ्या एका प्रकारें तुह्मांस सिद्ध करून दाखवितों !

**तारा**—ठीक आहे महाराज, दाखवा !

**शिव**—" **मी आत्मा** " ही तुमची पक्की खात्री झालीना ?

**तारा**—होय महाराज, ती तर कधींच !

**शिव**—बरें, ज्या वस्तूस तुह्मी " **आत्मा** " असें ह्मणतां, ती वस्तु, तुमच्या ठायीं आहे, कीं नाहीं ?

**राणी**—महाराज ! ती वस्तु, ह्मणजेच जर **मी**, तर ती नाहीं कशी ? अलबत् आहे !

**तारा**—हो. बरोबर ! आहेच **ती** ! नसल्यास, सर्वच अंधःकार होता !

**शिव**—शाबास ! या " **आहे** " या, त्या आत्म्याच्या गुणास " **सत्** " असें ह्मणतात.

**राणी**—सत् ह्म० **खरें**. अर्थात्, ती वस्तु आहे, हें खरें आहे !

**शिव**—शाबास ! त्याचप्रमाणें, त्या वस्तूच्या ठायीं जी ज्ञानशक्ति किंवा ईश्वरी तेज आहे, त्यागुणास " **चित्** " असें ह्मणतात आपण **जागृत्स्वप्नसुषुप्त्यादि** अवस्था जाणतों. यावरून, आपल्याठायीं **ज्ञानशक्ति** आहे !

**राणी**—समजलें, महाराज ! याहून आणखी कांहीं गुण याच्या ठायीं आहे काय ?

**शिव**—होय ! या स्वरूपाचें दृढानुसंधान राखून, समाधि स्थितीमध्यें आपण असल्यावेळीं, आपणास कसें वाटतें ?

**तारा**—महाराज ! तेवढ्या कालापुरता, अंतःकरणास पराकाष्ठेचा आनंद वाटतो !

**राणी**—महाराज ! सर्व लौकिक सुखें त्या आनंदावरून ओंवाळून टाकावीं ! असा त्या आनंदाचा महिमा आहे !

**शिव**—ठीक, हा आनंद, त्या आत्मस्वरूपाचा तिसरा गुण आहे. मिळून या आत्म्याचे ठायीं कोणकोणते गुण झाले ?

**तारा**—सत्+चित्+ व आनंद हे तीन गुण आत्मस्वरूपाचे ठायीं आहेत.

**शिव**—शाबास ! म्हणूनच त्यास "**सच्चिदानंद**" असें म्हणतात ! आतां पहा हें **सच्चिदानंद स्वरूप**, या सृष्टींतील अणुरेणु परमाणूमध्येंही आहे कीं नाहीं तें.

**तारा**—हा पहा. महाराज ! मी एक **खडा** घेत्यें ! हा सच्चिदानंदरूप आहेना ? ( एक बारीक दगड घेते ).

**शिव**—ठीक आहे ! आण इकडे. ( आपल्या हातांत घेतो ) हा **खडा**, आतां माझ्या हातांत आहे खराना ?

**तारा**—हो ! हा प्रत्यक्षच दिसतो आहे !

**शिव**—मग, या याच्या गुणास वरील तीन गुणांपैकीं कोणतें नांव द्यावें ?

**राणी**—महाराज ! "**सत्**" हें नांव द्यावयाचें ! पण महाराज ! येथें एक मोठी शंका आहे.

**शिव**—कोणती बरें ?

**राणी**—महाराज ! **चित्** म्ह० **ज्ञानशक्ति**, असें आतांच आपण सांगितलें,आणि हा बोलूनचालून **दगड**! तेव्हां ती ज्ञानशक्ति, या दगडास कोठून असणार ? आणि जर नाहीं, तर या दगडाच्या आंगीं **चिच्छक्ति** नाहीं म्हणावें लागतें ! आणि असें जर आहे, तर दगड **सच्चिदानंद**स्वरूपी नव्हे, असें म्हणावें लागतें ! तेव्हां कृपा करून याचा खुलासा व्हावा.

**शिव**—शाबास ! मुली राज्ञी ! फार चांगला प्रश्न केला ! ऐक. चित् म्ह० **ज्ञान** असा अर्थ असून शिवाय "**तेज**" असाही त्याचा अर्थ सांगितला आहे. अर्थात्, या दगडाच्या आंगीं तसें कांहीं **तेज** आहे कीं नाहीं, तें पहा !

**राणी**—महाराज! दगडांत **तेज** कसलें?

**शिव**—अग! तुम्ही **तेज** याचा अर्थ, दिव्यासारखा **चकचकीतपणा,** असा करित आहां! पण, तसा येथें अर्थ करावयाचा नाहीं. **तेज** म्हणजे "**पराक्रम**" असा अर्थ करा.

**तारा**—हां महाराज, आलें लक्षांत! त्याच्या आंगीं जो **टणकपणा, भारवाहकपणा,** व शीतोष्णादिकांचा **सोशीकपणा** वगैरे गुण आहेत, तोच त्याचा **पराक्रम**! व पराक्रम, तेंच त्याचें **तेज**! व तेज तेंच **चित्**! अर्थात् दगडाच्या ठायींही **चिच्छक्ति** आहे!

**शिव**—बरोबर आहे. पहा त्याचप्रमाणें एखाद्या राजवाड्याचा काष्ठमय **स्तंभ**! त्यानें ज्याअर्थीं एवढा मोठा वरील भार सहन केला आहे, त्या अर्थीं, त्याच्या आंगीं कांहीं **तेज** नाहीं, असें म्हणतां येईल काय?

**तारा**—बरोबर आहे. पण, महाराज! एखाद्या तृणांकुराच्या ठायीं काय '**तेज**' असतें?

**शिव**—त्याच्या मानानें, त्याचाही **पराक्रम** असतो! कल्पना कर कीं आपल्या डोळ्यांत कसला तरी एक परमाणु वाऱ्यानें जाऊन पडला आहे. तो काढणें झाल्यास, त्या ठिकाणीं त्या राजवाड्याच्या स्तंभाचा कांहीं उपयोग न होतां, तो **पराक्रम,** त्या तृणांकुराच्याच हस्तें होणार! यावरून काय ठरलें?

**तारा**—अणुरेणु परमाणूच्या आंगींही **चिच्छक्ति** आहे! पण महाराज! आमचें **आत्मरूप,** आनंदाचा नुसता **कंद** असल्याबद्दल, आमची खात्री झाली, इतकीच गोष्ट नसून आह्मांस त्या गोष्टीचा स्वानुभवही येऊन चुकला! त्याचप्रमाणें पशुपक्षादि प्राण्यांच्या ठायीं तो आनंद असल्याचें हरएक प्रसंगीं दृग्गोचर होतें. पण, तो आनंद, काष्ठपाषाणादि **जड** वस्तूंच्या ठायींही आहेना?

**शिव**—या प्रश्नाचें उत्तर, **दोन** प्रकारांनीं देतां येईल!

**तारा**—कोणत्या?

**शिव**—एकतर, काष्ठ पाषाणादिकांच्या ठायीं आह्मांहूनही ज्यास्त आनंद आहे!

**तारा**—तो कसा?

**शिव**—आह्मी आमचा **स्वानंद**, समाधिस्थितींत असेपर्यंतच भोगतों. पण काष्ठपाषाणादि तर अहर्निश **समाधिस्थ**! त्यांवर उष्ण कालाचें कडक **ऊन** पडो, कीं पर्जन्य काळांतील मुसळधार **पाऊस** पडो, कीं शीत कालांतील कडक **थंडी** पडो! त्यांच्या आनंद वृत्तींत, यत्किंचित्‌हि फेरफार ह्मणून नाहीं!

**राणी**—ठीक आहे. आतां दुसरा प्रकार कोणता?

**शिव**—ऐका. ज्या वस्तूंच्या ठायीं जो गुण असेल, तोच आपणास भासमान होणार. कृत्रिम **विजेचा**, गांवोगांव परस्पर संबंध आहे! "एक हातानें टाळी वाजत नाहीं" व **मनोमन साक्ष**" यांचाही अर्थ तोच! एखादी मनोहर वस्तु पाहिली कीं आनंदीआनंद होतो याचें कारण, ती वस्तु व आपण, या दोहोंमध्यें-ही तो आहे! पण, मळमूत्रादि चिळसखोर वस्तूंतही तो **आनंद** आहे, हें दाखविल्यावर मग तर तुमची सर्वांची खात्री होईल?

**राणी**—हो मग होईल?

**शिव**—ऐका. कित्येक प्राण्यांची **विष्ठा**, कित्येक विकारांवर औषधाप्रमाणें उपयोगांत आणतात. हें त्या विष्ठेच्या आंगचें **तेज** ह्म० **चित्** आहे! तसेंच, दुसरें पहा! ती विष्ठा, सूकर पश्वादिकांस दृग्गोचर होतांच, त्यांस किती **आनंद** होतो? यावरून काय ठरलें?

**तारा**—अत्यंत चिळसखोर वस्तूंच्याठायींही, **आनंद** आहे! कारण उभयतांच्याठायीं तो असल्याशिवाय प्रगट कसा होईल? पण महाराज! मग आह्मांला त्या वस्तूंचा **वीट** कसा येतो?

**शिव**—शाबास! तारे! हा ज्याचा त्याचा **प्रकृतिधर्म** आहे. एखाद्यास मांस आवडतें, पण दुसऱ्यानें तें पाहिलें तर वीट येऊन **वांति**ही होते! मिळून, वांतिजनक वस्तूंमध्येंही **आनंद** आहे! आणि जर अत्यंत चिळसखोर वस्तूंमध्येंही तो आहे, तर काष्ठपाषाणादि वस्तूंतही तो आहेच आहे!

**तारा**—महाराज ! आतांचा हा **ज्ञानोपदेश** होण्याच्या पूर्वीची माझी वृत्ति, व ही त्यानंतरची आतांची वृत्ति, यांत महदंतर आहे !

**शिव**—पूर्वीचा अनुभव काय बरें ?

**राणी**—महाराज ! " मी **आत्मा** असून, माझें स्वरूप अत्यंत सूक्ष्म आहे" असा पूर्वीचा अनुभव !

**शिव**—काय राजा ! तुझाही असाच ना ?

**राजा**—होय महाराज ! असाच. ह्मणजे, माझा या अवाढव्य **सृष्टीशीं** कांहीं संबंध नाहीं, असा पूर्वीचा अनुभव !

**शिव**—आणि आतांचा अनुभव कसा ?

**तारा**—महाराज ! संपूर्ण **ब्रह्मांडांतील** यच्चयावत् वस्तूंतील **अणुरेणू**मध्येंही, **मीच** भरलेला असल्यामुळें, माझें **स्वरूप**, **अत्यंत** व **अपरंपार** आहे ! असा आतांचा अनुभव !

**राणी**—महाराज ! माझाही अनुभव आतां तंतोतंत असाच आहे !

**शिव**—राजा! तुझा अनुभव आतां कसा काय ?

**राजा**—महाराज ! माझें स्वरूप जें अत्यंत सूक्ष्मात् **सूक्ष्मतर** होतें, तें, आतां अपरंपार **विस्तृत** वाटूं लागलें आहे !

**शिव**—शाबास ! करा ध्यान त्या **स्वरूपाचें** !

**तिघें**—( ध्यानस्थ ! )

**शिव**—( मस्तकास स्पर्श करून ) आतां सर्वजणें आपापला **अनुभव** सांगा पाहूं !

**तारा**—महाराज ! "मी **आत्मा** असून, संपूर्ण ब्रह्मांडांतील **अणुरेणू** मध्येंही माझें वास्तव्य असल्यामुळें, माझें **स्वरूप** अपरंपार पसरलें आहे !"

**राणी**—( तसेंच )

**राजा**—( तसेंच )

**शिव**—माझ्या जिवलगांनो ! तुम्हां तिघांत अद्यापहि थोडासा दोष शिल्लक आहे !

**तारा**—तो काय बरें, महाराज ?

**शिव**—"ब्रह्मांडांतील अणुरेणूंत **मी** आहें" म्हणतां; पण, " ब्रह्मांडांतील अणुरेणुच **मी** आहें," असें अद्याप म्हणत नाहीं !

**तारा**—काय ? कसें, कसें महाराज ?

**शिव**—( पुनः तेंच वाक्य बोलून दाखवितात. )

**राणी**—महाराज ! "**अणुरेणूंत** मी आहें" हें बरोबर; पण, "**अणुरेणूच** मी आहें. " असें कसें होईल ?

**शिव**—पुनः समाधिस्थ होऊन, **विश्वांतर्वासी** व्हा.

**तिघें**—(समाधिस्थ ).

**शिव**—( थोड्या वेळानें स्पर्श करून ) आतां, तुम्हीं जें स्वरूप पाहिलें, त्याबद्दल असा दृष्टांत लक्षांत आणा.

**तारा**—कसा ?

**शिव**—पाणी, वाफ, गारा किंवा बर्फ मिळून **मूळ** काय ?

**तारा**—सर्व मिळून फक्त **पाणीच** !

**शिव**—दूध दहीं, लोणी किंवा तूप मिळून **मूळ** काय ?

**राणी**—सर्वांचें मिळून मूळ, फक्त **दूधच** !

**शिव**—इक्षुरस, काकवी, गूळ किंवा साखर मिळून **मूळ** काय ?

**राजा**—महाराज ! इक्षुरस, हेंच प्रत्येकाचें **मूळ** आहे !

**शिव**—माझ्या जिवलगांनो ! त्याचप्रमाणें, तुम्हीं आतां ज्या **स्वरूपाचा** अनुभव घेतला, तेंच हें **स्वरूप**, सृष्टिरूपानें नटलें आहे ! दुसरा दृष्टांत पहाः—

पातळ **तूप**, व थिजलेलें **तूप**, मिळून **तूपच** !

**तारा**—मग, हे वृक्ष पर्वतादि **परब्रह्म** असतां, ते वेगळे कसे दिसतात ?

**शिव**—अग ! दिसतात खरे. पण ते कोणास ?

**राणी**—आपल्या अंतःकरणास ?

**शिव**—पण, आधीं, अंतःकरणादि सूक्ष्म देह तरी **खरा** का ?

**राजा**—महाराज ! " **परा**" वाणी **रद्द** ! मग हे देह खरे कोठचे ?

**शिव**—झालें तर मग! सर्वच मनोविकार **परा**वाणीपर्यंत जर **झूट**, तर "सारखे सारखे. व वेगळे वेगळे" ह्मणणारा, पुनः राहिला **कोण**? "पातळ तूप, व "घट्ट, कणीदार, सफेत, सुवासिक तूप" हे भेद फक्त कल्पनेनें केले आहेत! तीच जर नाहीं, तर **द्वैतच** नाहीं! पातळ असो, किंवा घट्ट असो. तूप एवढें खरें!

**तारा**—पण महाराज! "**परा**" वाणीही जर मिथ्या कल्पना तरंग. तर '**तूप**' असें ह्मणावें कोणीं?

**शिव**—बरोबर आहे! राजानें "**मी राजा**" ह्मणण्याचें कारणच नाहीं. ह्मटलें कीं, त्याच्या राजेपणास **हीनत्व** आलेंच! यासाठीं '**मी आत्मा**' हें ओळखून, शिवाय, ती आत्मपणाची **स्फूर्तिही** कमी म्हणजे **नष्टच** झाली पाहिजे!

**तारा**—महाराज! आपण दोन्ही बाजूंनीं अडवून धरीत आहां!

**शिव**—तें कसें?

**तारा**—महाराज! आपण पहिल्यानें सांगितलें, त्याच्या उलट मग सांगतां, व आतां तर, ह्या दोन्ही गोष्टींहून निराळेंच काय सांगत आहां!

**शिव**—पहिल्यानें काय सांगितलें?

**राणी**—हीं पंचमहाभूतें व त्रिगुण **जड** असून **मी** जागृत स्वप्न सुषुप्त्यादि अवस्थात्रयाचा केवळ निःसंग **साक्षी** आहें. स्थूळ सूक्ष्म कारण हे तिन्ही देह सत्य नसून, मी त्यांहून भिन्न असा आत्मरूपी **महाकारण** देह आहें' असें सांगितलें!

**शिव**—ठीक आहे! मग दुसऱ्यानदां काय सांगितलें?

**तारा**—नंतर पुनः सांगतां कीं, "अणुरेणु परमाणुस्वरूप सर्व सृष्टीच **मी** आहें!" महाराज! ही गोष्ट पहिल्या गोष्टीच्या साफ **उलट** नव्हे काय?

**शिव**—बरें, **तिसरी** गोष्ट काय सांगितली?

**राजा**—महाराज! आतांच तुपाचा दृष्टांत देऊन, सिद्ध करून दाखविलें कीं, 'तूप पातळ' ही ही एक कल्पना, व 'तूप घट्ट' ही ही एक कल्पना! इतकेंच नसून, तूप, ही ही एक कल्पनाच आहे!

**शिव**—तर कल्पनातीत काय? सांगितलें?

**राजा**—हें ओळखून, निःशब्दपणें साक्षीभूत असणें, हें **कल्पनातीत**!

**शिव**—शाबास! माझ्या जिवलगांनो! आतां तुह्मांस चार शब्द सांगतों! यांजकडे नीट लक्ष द्या.

**राजा**—सांगा महाराज! (हात जोडतात).

**शिव**—तुह्मांस सांगितलेल्या तिन्ही गोष्टी पुनः संक्षेपानें सांगतों.

१—संपूर्ण सृष्टींत **मीच** आहें.

२—संपूर्ण सृष्टिच **मी** आहें.

३—मुळी सृष्टिच नाहीं, व **मीही** नाहीं, जें असावयाचें, तेंच आहे!

पहिल्या वाक्याच्या अनुभवसिद्ध **ज्ञानानें** सृष्टीचें क्षणभंगुरत्व दर्शविलें असून, आपला '**आत्मा**' हा, **निःसंग, अक्षर** व **निरंजन** आहे. या ज्ञानानें, आपणास लौकिकी आधिव्याधींची यत्किंचितही पीडा होणार नाहीं!

दुसऱ्या वाक्याच्या अनुभवसिद्ध ज्ञानानें, संपूर्ण सृष्टि हा **मीच** अशी तदाकार वृत्ति बनून, आपला, आपल्या मुलाचा, एखादा गोरगरीब अनाथ भिकाऱ्याचा, व एखाद्या अस्पर्श चांडाळाचाही देह अगदीं **एक** आहे; जी आपल्या देहाची काळजी, तीच इतरांच्याही! अशी दृढ भावनायुक्त कृति घडली पाहिजे, हें शिकावयाचें!

व तिसऱ्या वाक्याच्या अनुभवसिद्ध **ज्ञानानें**, जगाचा, व त्याच्याबरोबर आपलाही **अहंकार** साफ सोडून फक्त बोधपर शुद्ध **परब्रह्मरूप** होऊन असलें पाहिजे, हें शिकावयाचें!

ज्याप्रमाणें, पातळ तेंही तूप, व घट्ट, कणीदार, सफेत, व स्वादिष्ट तेंहीं तूपच, त्याचप्रमाणें **आत्मा,** ज्ञानाज्ञानरूप अनंत **मनोविकार** व पृथ्व्यादि **पंचमहाभूतें** मिळून सर्व, **परब्रह्म** स्वरूपच आहे! घट्ट, सफेत, कणीदार होणें, हा जसा तुपाचा धर्म, त्याचप्रमाणें वैचित्र्यपूर्ण सृष्टिरूप होणें, हाही एक परब्रह्माचा **स्वभाव** आहे!

**तारा**—पण महाराज ! आतां या तिहींतून **ग्राह्य** कोणतीं ?

**शिव**—प्रत्येक गोष्ट ग्राह्य आहे, वरील तिन्ही गोष्टींचें आपल्या ठायीं **तादात्म्य** झालें, कीं ग्राह्याग्राह्यतेचा विचारच संपला ! सर्वच **ग्राह्य** ह्मणतां येईल, नाहीं तर, सर्वच **अग्राह्य** असेंही ह्मणतां येईल. ( हे शब्द उच्चारतांच, तिघांच्या अंतःकरणांत एकदम चककन् प्रकाश पडून तिघे समाधिस्थ ! )

**शिव**—झालें ! यांच्यासंबंधीं करावयाचें तें सर्व कार्य करून संपलें ! व केलेल्या सर्व श्रमांचें सार्थक्यहि झालें ! तथापि हा सर्व **ज्ञानोपदेश**, अगदींच अल्पावकाशांत केला गेल्यामुळें, तो अंतःकरणावर कायमपणें उमटण्यास, थोडे दिवस त्याचा व्यासंग घडला पाहिजे होता, पण तसा आतां कांहीं काल नाहीं ! या करितां, आपणच स्वकपोलकल्पित एक **नाटक** रचून, त्याच्या द्वारें या **कायापुरींत** अनंत मनोविकाररूपी, अनंत बरे वाईट **स्त्री-पुरुष** भरले आहेत, हें दाखवावें ! याच्यायोगें, त्या मनोविकारां-पैकीं आपणास **साधक** कोण व **बाधक** कोण, तें यांस उघड-पणें दिसून येईल ! आणि असें झालें म्हणजे, त्यांस झालेल्या ज्ञानो-पदेशाचा ठसा, पूर्णपणें बिंबेल ! करितां तसेंच करूं ! ( हस्तस्पर्श करतो. )

**तिघे**—( तिघे अर्धवट शुद्धीवर येतात. )

**शिव**—( पुनः स्पर्श करितो )

**तिघे**—( शुद्धीवर येऊन, जलदीनें **गुरुचरणीं** लीन होतात ! )

**शिव**—शांतिः ! शांतिः !! शांतिः !!! काय ठीक आहेना ?

**राजा**—महाराज! "बोलणें **फोल** झालें—डोलणें **वायां** गेलें!" हेंच खरें !

**शिव**—ठीक आहे. राजा ! तुह्मांस आतां एक गमतीचें **नाटक** दाखवून, हें ज्ञानोपदेशाचें काम पुरें करितों.

**तारा**—काय **नाटक** ! तें कशाला, आणखी ?

**शिव**—पहा तरी कसें गमतीचें आहे तें !

**राणी**—आतां यावेळीं, संपादित ज्ञानाचें **मननच** झालें पाहिजे. तें सोडून, भलतेंच नाटक पाहिलें म्हणजे पुनः आणखी मनाची चलबिचल !

**शिव**—हाँ ! ती न व्हावी, म्हणूनच नाटक !

**राजा**—महाराज ! असें आहे तर आतां उशीर नको !

**शिव**—ठीक आहे ! मुलींनों ! पुढील सर्व नाटक मनोमय असल्यामुळें, जरी तुम्हांस दिसणें वास्तविकपणें शक्य नव्हतें, तरी मी दिलेल्या दिव्य दृष्टीमुळें, तुम्हांस तें सहज दिसल ! त्यांतील प्रत्येक पात्राचें भाषण लक्षपूर्वक ऐकत जा ! फारच हृदयंगम असेल. नसमजल्यास लागलेंच विचारा !

**तिघे**—ठीक आहे महाराज ! चला तर ! ( सर्व जातात. )

पडदा पडतो.

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ—कायापूर**, राजकचेरी.

**चोपदार**—राजाधिराज, **जीवेश्वर** महाराज ! आस्ते चलो महाराज ! विचारसे पाव उठाना सरकार ! ( पडदा उघडतो. )

**जीवेश्वर**—( स्वगत ) अहाहा ! आज मजसारखा भाग्यवान या साऱ्या ब्रह्मांडांत दुसरा कोण आहे ? माझ्या हातीं केवढी सत्ता ! प्राणीमात्रांना **सद्गति** अगर **दुर्गति**, यांतून पाहिजे ती देण्याचा अधिकार मजकडे. संकल्प व विकल्प हे तर माझे **प्रधान** असून मन हा माझा **सेनापति** आहे ! अनंत प्रकारचे कोट्यवधि मनोविकार ही माझी **सेना** असून, त्यावरील आधिपत्य, हा **मनोवीर**, करीत आहे. हे माझे प्रधान व सेनापति, आपापल्या कामांत

दक्ष असल्यामुळें, मला राज्यकारभार करण्याचें काम सुखकर झालें आहे ! असो ! ( उघड ) **प्रधानजी** !

**प्रधान**—( हात जोडून उभे राहातात ).

**जीवे०**—आपण, आपापलें काम फारच दक्षतेनें करीत असल्या-मुळें, तुह्मांस नवीन असें कांहींही सांगावयास नको. पण आपल्या या **कायापुर** राज्यासंबंधीं सर्व व्यवस्था नीट चालली आहेना ?

**संकल्प**—महाराज ! आपण निर्वैर राज्यसौख्य उपभोगीत आहां यावरून, राज्यकारभाराची व्यवस्था सरकारच्या लक्षांत येतच असली पाहिजे ! तथापि सांगतों कीं, महाराज ! सर्व कामगार आपा-पल्या कामाची व्यवस्था उत्तम ठेवीत आहेत ! काळजी करण्याचें बिलकूल कारण नाहीं !

**जीवे०**—शाबास ! **संकल्पराव** ! तुमची वृत्तिच तशी आहे ! तुह्मांस वाईट असें साऱ्या जगांत कांहींच नाहीं ! बरें **सेनापति** ! आपल्या सैन्याची व्यवस्था कशी काय आहे ?

**मनोवीर**—महाराज ! माझा प्रभाव, माझ्या नांवावरूनच उघड होण्यासारखा आहे. कोणीही सैनिक, माझ्या हुकमाशिवाय नुसती डोळ्याची पापणीही वर करूं शकत नाहीं ! मग कार्य कोठून ?

**जीवे०**—शाबास ! मनोवीर ! तुह्मी तसेंच आहां ! बरें पण **मनोवीर** ! या **कायापुरची** कोणतीही नवीन खबर तत्क्षणीं समज-ण्याकरितां आपण काय योजना केली आहे ?

**मनोवीर**—महाराज, नगरांतील खबर ह्मटली ह्मणजे फक्त **पांच** प्रकारची ! त्या प्रत्येक खात्याकरितां एक एक, अशीं **पांच** प्रकारचीं पांच **वहानें** ठेविलीं आहेत !

**जीवे०**—बरें ! पण खबर कळतांच, त्यासंबंधीं योग्य ती व्यवस्था ताबडतोब होण्याकरितां, काय तजवीज केली आहे ?

**मनोवीर**—महाराज ! त्याबद्दलही आपण काळजी करूं नये. कोणतीही बातमी समजतांक्षणींच, तत्संबंधी व्यवस्था सत्वर करण्याकरितां, पांच **कामगार** नेमलेले आहेत !

**जीवे०**—शाबास ! **मनोवीर** !

**शिव**—मुलींनो ! हा राजा कोण तो तुमच्या लक्षांत आला काय ?

**तारा**—नाहीं महाराज ! अद्याप खुबी बरोबरशी लक्षांत आली नाहीं. कृपा करावी !

**शिव**—ऐका. राजा ! तुला व मला आरंभींच ज्या आपल्या मातुश्री **महामायेनें** " क्रीडाभुवन पाहून लवकरच परत या " अशी आज्ञा केली, व जिला **अर्धनारी नटेश्वर** हें पुरुषवाचक नांव आहे, तोच हा प्रकृतिपुरुषरूप **जीवेश्वर** राजा !

**राणी**—असें काय ! तर मग महाराज! आतां आलें सर्व लक्षांत. हा सर्व खेळ, **प्रवृत्ति** व **निवृत्ति**, यांचा प्रभावदर्शक होणार !

**शिव**—शाबास ! मुली राज्ञी, अगदीं बरोबर सांगितलें ! तूं आतां ज्याचें नामोच्चारण केलें, त्याच दोघी त्या **जीवेश्वर** महाराजांच्या राज्ञी कल्पून, पुढील सर्व **नाटक** दाखवावयाचें आहे !

**राणी**—ठीक आहे ! आतां आलें ध्यानांत ! पण महाराज ! या **मनोवीरानें** पांच वहानें ठेविलीं आहेत ह्मणतो, तीं कोणतीं ?

**शिव**—मुलींनो ! त्याचें भाषण एकाग्र चित्तानें ऐका. ह्मणजे सर्व समजून येईल. त्याजकडून खुलासा न आल्यास, मी करीन. या, आपण येथें स्वस्थ बसूं. (सर्व एका बाजूस ऐकत बसतात).

**जीवे०**—बरें, पण **मनोवीर** ! तुह्मीं पांच वहानें ठेविलीं आहेत ह्मणतां, तीं अश्वगजादिकांप्रमाणेंच शीघ्रगामी आहेत ना ?

**मनो०**—महाराज ! **पंचज्ञानेंद्रियें** हीं माझी वहानें आहेत !

**जीवे०**—शाबास ! शाबास ! मनोवीर ! तुमच्या बुद्धिसामर्थ्याची कमाल आहे ! आणि **कार्यकरी** मंडळी ?

**मनो०**—महाराज ! कर्मेंद्रिय पंचक ही कार्यकारी मंडळी आहे ! महाराज ! हीं माझीं वहानें, व हें कार्यकारी मंडळ, आपापलें काम इतक्या विद्युद्वेगानें करतात कीं, त्याचें वर्णन करण्यास लागणाऱ्या वेळाचा कोट्यंशहि, कार्य—पूर्ततेस नको !

**तारा**—महाराज ! खरेंच ! पायावर मिरकूट बसण्याची खोटी, कीं, लगावलीच थापट ! त्वचेला स्पर्श होतांच हात उठला !

**तिघें**—( हंसतात ) बरोबर !

**जीवे०**—पण मनोवीर ! खबर फक्त **पांच** प्रकारची ह्मणजे ?

**मनो०**—महाराज! **पंच**विषयांशिवाय जगांत दुसरें काय आहे? असो महाराज ! आपण माझ्या कामासंबंधीं तिळमात्र काळजी करूं नये.

**जीवे०**—ठीक आहे ! **मंत्री**, आपल्याकडील हकीगत नीट चालली आहेना ?

**विक०**—महाराज ! मला फार दिवसांपासून एक गोष्ट सरकारच्या कानावर घालावयाची आहे. पण कदाचित् अतिक्रम दोष घडेल ह्मणून साशंक आहें !

**जीवे०**—हें काय बरें ? **मंत्री** ! या राष्ट्रांतील एकूण एक बारीकसारीक गोष्ट मला कळण्याचें मुख्य द्वार **तुह्मी** आहां,असें असतां, जर आपण मौन्य धरलें मग कसें होणार ?

**विक०**—( हात जोडून ) महाराज ! क्षमा असावी.

**जीवे०**—सांगा, सांगा तुह्मी !

**विक०**—महाराज ! आपण आपल्या दोन राज्ञींपैकीं **निवृत्ति**-राणीसाहेबांस जें **पट्टराणी**पद दिलेंलें आहे, तें माझ्या अल्पदृष्टीनें जरा—

**जीवे०**—संकोच नको, स्पष्ट सांगा ! राज्यास जें कल्याणप्रद, तेंच तुह्मी सांगत आहां, यांत तुमच्या स्वतःच्या घरची गोष्ट थोडीच आहे ! सांगा तुह्मी, स्पष्ट सांगा !

**विक०**—महाराज ! वरील योजना जरा बरोबर झालेली नाहीं ! याच्यायोगें राज्यव्यवस्था, शांत प्रकारें चालली आहे, ही गोष्ट खरी आहे, पण यामुळें सर्व कामगार लोक नुसते **आळशी** बनून, नुसता स्वस्थ बसून पगार खात आहेत ! यांस काम ह्मणून कांहींच नाहीं असें झालें आहे !

आणि मी ह्मणतों, जर यांस कांहीं काम नाहीं. तर सरकार खजिन्यांतील **विषय,** जो अतोनात प्रकारें यांच्याकरितां खर्च होतो आहे, तो तरी कां व्हावा ? तेव्हां माझ्यामतें, हे सर्व **कामगार** कमी करावे !

**जीवे०**—मंत्री, तुह्मी असें कसें ह्मणतां ? हें जर आपलें **राज्य** आहे, तर त्याला **राजभूषणें**हीं अवश्य असलींच पाहिजेत. **दास-दासी** शिवाय, राज्यास शोभा आहे काय ?

**विक०**—महाराज ! इतक्याचकरितां, ही गोष्ट आपणास सांगण्यास आजपर्यंत मी कचरत होतों. कारण, राज्यव्यवस्थेंत ढवळा-ढवळ करून, दुसऱ्याच्या पोटांवर आपण कां आड यावें, असें एकवेळ वाटे. पुनः मनांत असा विचार येई कीं, सरकारी खजि-न्यांत, या रिकामटेंकड्या कामगारांच्यापायीं, सालोसाल तूट येते. ती आपण निमूटपणें बघत बसणें, ही **स्वराजनिष्ठा** नव्हे !

**जीवे०**— ! **मंत्री** राज्यभांडारांतील विषयवृद्धीसंबंधीं, तुमची इतकी उत्सुकता व आस्था पाहून, मला फार आनंद वाटतो !

**विक०**—नुसता आनंद वाटून, सरकार ! काय उपयोग ! राज-भांडाराची विषयसंपत्ति कमी न होण्यास उपाय **दोन** !

**जीवे०**—कोणते बरें ?

**विक०**—ऐकावें सरकार !

एक तर, निवृत्ति राणीसाहेबांस **पट्टराणी**पद दिल्यामुळें, राज्यांत जी पूर्ण शांतता आली आहे, तिच्यायोगें, या **कायापुरां**-तील एकूण एक कामगार लोकांस आतां कांहींच काम नाहींसें झालें आहे ! करितां ते **कामगार** कमी करावे, हा एक मार्ग; किंवा—

सरकारांनीं **निवृत्ति राणी**साहेबांचा नाद सोडून,**प्रवृत्ति राणी**-साहेबांस **पट्टाभिषिक्त** करावें ! ह्मणजे, या **कायापुरां**तील व्यव-हार झपाट्यानें सुरू होतील ! व ते सुरु झाले ह्मणजे, सरकारी

**विषयभांडारें** वृद्धिंगत होऊन, सर्व कामगार लोकांसही भरपूर काम होईल !

याप्रमाणें, माझें मत मी सरकारचरणीं सादर केलें आहे ! यावर महाराजांची जशी इच्छा ! सरकारचें व्यर्थ नुकसान न व्हावें हीच माझी **इच्छा** !

**जीवे०**—( स्वगत ) हा **विकल्प** खरोखर स्वामिभक्त आहे. हा यांत कांहीं स्वतःचें हित संपादन करीत नसून, केवळ राज्याच्या हिताचीच सूचना आस्थापूर्वक करित आहे. ह्मणून, याच्या ह्मणण्याचा कांहीं विचार करणें, रास्त आहे ! तरी, या बाबतींत प्रधानजी संकल्पराव, यांचें ह्मणणें काय आहे. तें पाहूं ! ( उघड ) बरें **प्रधानजी** ! आपलें मत या बाबतींत कसें काय ?

**संकल्प**—महाराज ! माझें मत या बाबतींत विरुद्ध आहे ! महाराज्ञी **निवृत्ति** मातुश्री कुलीन घराण्यांतील कन्या आहेत ! प्रत्यक्ष **ज्ञानराज**, हे त्यांचे वडील ! मुलगी कसलीही काळी सांवळी असली तरी, शहाणे लोक आधीं तिचें कुलशील पहात असतात ! याचेंही कारण हेंच कीं, तिजपासून कुटुंबांत शांति निर्माण व्हावी !

हे **विकल्पराव** व **मंत्री**, आपल्याच भाषणांत बोलून दाखवितात कीं, " निवृत्ति मातुश्रीस पट्टराणीपद दिल्यामुळें राज्यांत शांतता आहे खरी ! " मी ह्मणतों, जर शांतपणें राज्यव्यवस्था चालली आहे, तर शांतिपलीकडे आणखी राज्यांत काय पाहिजे ? राज्यांत मुख्य पाहिजे आहे, ती शांतताच पाहिजे असते !

आतां, जर दुसऱ्याच्या मनांत उगीच कांहीं तरी **विकल्प** उत्पन्न करून, आपसांत कलहाग्नि माजवावा, व त्यांत मग कोणकोणाच्या आहुती पडतात; हेंच पाहाण्याचा त्यांचा मानस असेल, तर मी सरकारास नको ह्मणत नाहीं ! तसेंच, मी " **प्रवृत्ति** महाराणी साहेबांस बाळगूं नये " असेंही ह्मणत नसून, फक्त इतकेंच ह्मणतों कीं, " पहिला मान, मातुश्री **निवृत्ति** महाराज्ञीचा असावा. " इतकेंच.

**जीवे०**—**प्रधानजी** ! हें तुमचें ह्मणणें मला कबूल नाहीं. तुमचा

स्वभाव फारच थंडा पडल्यामुळें, तुह्मांस दुसऱ्या कोणासच "वाईट" ह्मणून ह्मणतां येत नाहीं ! असो, तो तुमचा देहस्वभाव आहे. परंतु मला वाटतें, **मंत्री** यांचें ह्मणणें, राज्योत्कर्षाचें आहे !

**संकल्प**—जशी सरकारची इच्छा ! ( स्वगत ) सत्तेपुढें शाह्मणपण काय कामाचें ! याच्या राज्याची ? **कलहाग्नी**नें राखरांगोळीच होण्याची जर वेळ आली असेल, तर त्यास कोण काय करणार ? "विनाशकाले विपरीत बुद्धि" !

**जीवे०**—**मंत्री** ! तुमचें ह्मणणें रास्त आहे ! याकरितां, मी आतां तसेंच करणार !

**संक०**—( श्वास टाकून सचिंत )

**जीवे०**—बस्स ! निवृत्तीला मुळीं घरांतच ठेवावयाची नाहीं ! याकरितां, तिला कोठें तरी बाहेर हाकून लावलीच पाहिजे !( विचार करून ) हो ! तसेंच ! जेथें जीव जंतूंचें नुसतें वारेंही नाहीं, अशा निरंजनवनांत तिला नेऊन टाकावें ! ह्मणजे, तिला या राज्यप्रकरणांत कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवतां येणार नाहीं !

**विक०**—( मनांत हंसतो. )

**संक०**—महाराज ! कोणतीही गोष्ट मनांत आल्याबरोबर एकदम करूं नये ! अंमळ विचार करून केली असतां, तिचा परिणाम बरा होतो.

**जीवे०**—तें सर्व मला चांगलें कळतें ! आणि ह्मणूनच, मीं जें ठरविलें आहे, तें अगदीं बरोबर आहे. **मंत्री** ! आतांच, राज्ञी **निवृत्ति** हिला रथांत घालून, **निरंजनवनांत** नेऊन सोडावें ! तुमच्याशिवाय हें काम दुसऱ्याकडून नीट व्हावयाचें नाहीं !

**विक०**—( आनंदानें ) आज्ञा, सरकार !

**संक०**—महाराज ! त्या **गर्भवति** आहेत ! करितां थोडे दिवस तरी त्यांस अरण्यवास नसावा. अशी प्रार्थना आहे !

**जीवे०**—तें कांहीं नाहीं ! तिचीं **पोरें**, तिच्यासारखींच निपजावयाचीं ! मला तिची व तिच्या पोरांची साफ गरज नाहीं !

**संक०**—( स्वगत ) आतां, यांत आह्मीं नोकर लोकांनीं, आणखी काय करावयाचें ! असो. आई **निवृत्ति** ! तुझें आतां कसें बरें होईल ! हे दयाघन **प्रभो** ! या **निवृत्ति** मातुश्रीचें संरक्षण करणारा, आतां तुजवांचून दुसरा कोण आहे ?

**जीवे०**—चला तर मग ! मंत्री, तुह्मी आपली कामगिरी करा, चला ! ( असें ह्मणून उठतो, तोंच सर्व दरबार उठतो. )

**चोप०**--कचेरी बरखास्त !

( सर्व जातात. पडदा पडतो. )

---

**शिव**—मुलींनों ! कसें आहे **नाटक** ?

**तारा**—महाराज ! काय आपली ही अलौकिक बुद्धि व कुशलता ! सर्व प्रकार चांगला लक्षांत आला ! हा **जीव** सांप्रत भ्रमिष्ट बनल्यामुळें, त्यास हे डोहळे आठवले आहेत ! तो मेला **विकल्पही** तसाच !

**राणी**—अग आधीं त्याचें नांव काय ? त्याच्या नांवास उचित तेंच तो बोलला !

**राजा**—तो **संकल्प** कां नाहीं तसें बोलला ?

**शिव**—" यथा बीजं तथांकुरः" यावेळीं हा अज्ञान वश झाल्यामुळें, यथोचित, तेंच हा करतो आहे. असो ? या याच्या अज्ञान बीजांकुराचा, आतां केवढा अफाट वृक्ष होईल तो पहा !

( तोंच पडदा उघडतो )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—राजमंदिर.

**प्रवृत्ति**—कोण आहेग तिकडे ?

**दुर्बुद्धि**—मी आहे, बाईसाहेब !

**प्रवृत्ति**—कोण दुर्बुद्धि ?

**दुर्बुद्धि**—होय बाईसाहेब !

**प्रवृ०**—सरकार स्वारीचा अद्याप कोठें नाहींना पत्ता ?

**दुर्बु०**—बाईसाहेब ! मी अगदीं एकसारखी टक लावून रस्त्याकडे पहात उभी आहें !

**प्रवृ०**—ठीक आहे. दृष्टीस पडतांच; मला सूचना दे.

**दुर्बु०**—आज्ञा बाईसाहेब ! ( स्वारी येताहेशी पाहून ) बाईसाहेब ! बाईसाहेब ! सरकार स्वारी येत आहे !

**प्रवृ०**—होय का ( सामोरी जाते. )

**जीवे०**—( हंसत गालांस हात लावून ) काय ? स्वारी आज स्वत: दरवाजापर्यंत ! ( आसनावर बसतो ).

**प्रवृत्ति**—इतकें करूनही, माझें भेलीचें कोठें हिशोबांत आहे ?

**जीवे०**—प्रिये ! कां बरें ? असें उदास भाषण कां ?

**प्रवृ०**—आपणच डोळ्यांत बोटे घालून, पुनः रडत्येस कां ? म्हणून विचारावयाचें, तेथें बोलणार काय ?

**जीवे०**—काय ? तुझ्या औदासिन्यास मी कारण ?

**प्रवृ०**—यांत काय संशय का आहे आणखी ?

**जीवे०**—तो कसा ? मी तर सारा जीव तुजकरितां, तोड तोड तोडीत असतां, पुनः आणखी मी तुझ्या औदासिन्यास कारण ?

**प्रवृ०**—अहाहा ! काय पण मजकरितां जीव तोडून घेणें ! महिन्याचे महिने, दिवस रात्र सवतीनें भारून टाकलें आहे, भारून !

**जीवे०**—आधीं तूं इकडे येऊन बस पाहूं, अगोदर !

**प्रवृ०**—मला उभें राहिल्यानें, काय सुद्धां धाड भरावयाची नाहीं ! ज्या कोणा सटवीला फुलांत घालून जपावयाची असेल, तिलाच राखीत बसा ! माझें कांहींही होऊंद्या. ! मजबद्दल काळजी नको !

**जीवे०**—अस्सें अस्सें ! तरी म्हटलें, आपल्या बरोबरच ही प्रस्तावना कसली ? सवतिमत्सर, काय जबरदस्त आहे पहा ! असो,

प्रिये, आतां माझ्या लक्षांत आलें ! तूं त्या **निवृत्ति**मुळें इतका त्रास करून घेते आहेस ना ? ठीक आहे. ह्मणूनच, मी तुझा सर्व त्रास आजपासून साफ नाहींसा करून टाकिला !

**प्रवृ०**—( सस्मित ) काय ? त्रास नाहींसा करून टाकला ? कीं वाढविला ?

**जीवे०**—प्रिये ! तुला खरेंच सांगतों. तुला यानंतर **निवृत्ती**चा त्रास होण्याचा मुळींच संभव नाहीं. पण अगोदर ये इकडे मजजवळ बैस पाहूं !

**प्रवृ०**—अगोदर काय तें सांगितल्याशिवाय, नाहीं बसावयाची !

**जीवे०**—अग ! **निवृत्तीला** आज घरांतून **हद्दपार** करून टाकली !

**प्रवृ०**—( हंसून ) खरेंच कां प्रिया ! ( जाऊन गळ्यास मिठी मारित्ये ).

**जीवे०**—हा आतांच, **मंत्री** यांस बरोबर देऊन, तिला मार्गस्थ करून इकडे आलों ! जाणें न घडावें ह्मणून तिनें रडून अनर्थ केला, पण मी तिकडे लक्षच दिलें नाहीं !

**प्रवृ०**—गेली ! एकदां पिडा ! सटवीनें मला दुःख दुःख दिलें !

**जीवे०**—प्रिये ! तुझ्या सुखाकारितां मीं इतका झटपटत असतां, तूं पुनः मजवरच रागावतेस, हें काय बरें ?

**प्रवृ०**—महाराज ! आपण मजवर एवढा कृपाप्रसाद कराल, असें मला वाटलें नव्हतें !

**जीवे०**—पण, आतां तरी झाली खात्री ? अग तुझें हें **सौंदर्य**, मनोल्हादक **नानाक्रीडा**, व **डावपेंच** पाहून, मला तर तुजसंबंधीं इतका अभिमान वाटतो कीं, बस्स, प्रपंचामध्यें बायको असावी तर अशी !

**प्रवृ०**—(हंसून) पुरे पुरे ! मेली स्तुति तरी किती करावयाची !

**जीवे०**—कां ? खरें बोलण्यास कोणाचीही भीति नाहीं !

**प्रवृ०**—( स्वगत ) संधी आहे. यावेळीं आपलें कार्य साधून

घेतलें पाहिजे. ( उघड ) महाराज ! चरणापाशीं एक विनंति आहे.

**जीवे०**—प्रिये ! काय हें ? अग, मी तुला इतका लुब्ध व वश असतां, पुनः तूं किती संकोचवृत्तीनें मजशीं वागतेस ही ! अग तुला **विनंती** करण्याचें काय प्रयोजन ? तूं हक्कानें याला **आज्ञा** कर !

**प्रवृ०**—इश् ! हे काय बाई ! आम्हां बायकांनीं का यजमानास आज्ञा करावयाची ? मला नाहीं बाई हें पसंत ! महाराज ! मी आपल्या पायांचीं **दासी** आहें !

**जीवे०**—( स्वगत ) काय हिचें हें **सौजन्य** व **लीनत्व** ! ( उघड ) बरें, तुझ्याच ह्मणण्याप्रमाणें आतां काय आहे ह्मणणें, सांग पाहूं ?

**प्रवृ०**—महाराज ! पण रागबीग नाहींना येणार ?

**जीवे०**—सांगा राग कशाचा ?

**प्रवृ०**—महाराज ! माझा **भाऊ** घरीं रिकामा असतो, त्याला इकडचा **कारभारी** करावें, अशी विनंति आहे !

**जीवे०**—अग ! राज्यकारभाराचें काम फारच बिकट आहे ?

**प्रवृ०**—मग ! माझा बंधु **भ्रम** कमी का आहे हुशार ?

**जीवे०**—अग ! त्याची हुशारी त्याचें नांवच सांगत आहे ?

**प्रवृ०**—मग ! माझे बाबा **अज्ञान**, यांनीं जे आपल्याला **श्रीमंत जामात** शोधून काढलें, त्याचा हाच का उपयोग ? प्रसंगीं मदत नाहीं, तर तें नातें कशाला ?

**जीवे०**--प्रिये ! तुझा भाऊ झाला ह्मणून काय झालें ! त्याला कोणतेही एक काम नीट करतां येत नाहीं. आतांची आतां आठवण नाहीं ! त्याजकडून हें जबाबदारीचें काम कसें पार पडणार ?

**प्रवृ०**—मला तें कांहीं माहीत नाहीं ! नाहीं तर, साफ नाहीं ह्मणून सांगा, ह्मणजे मी पाहतें काय तें !

**जीवे०**—( भिऊन ) नको, नको, प्रिये ! तूं सांगशील तसेंच करतों झालें ?

**प्रवृ०**—इतक्यानेंच काय झालें ? व्हावयाचें तर पुष्कळ आहे ! तें सर्व माझ्या मर्जीप्रमाणें व्हावयाचें असेल, तर तसें सांगा. नाहीं तर मी माझ्या जिवाचें पाहून घेत्यें !

**जीवे०**—( भिऊन ) काय जिवाचें पाहून घेत्यें ? नको नको लाडके ! मी आपला तूं सांगशील तसें वागतों, पण तूं आपला जीव बीव तसलं कांहीं बोलूं नको ! ( तिच्या तोंडावरून हात फिरवितो ).

**प्रवृ०**—द्या तर वचन !

**जीवे०**—( स्वगत ) काय बरें करूं ? ही अविचारी **बायकांची** जात ! कदाचित् बोलल्याप्रमाणें, जीव सुद्धां देईल ! आणि मग मला माझ्या सौख्यास सर्वतोपरी आंचवावें लागेल ! करितां, ही सांगेल तसेंच करावें, झालें ! ( उघड ) काय ! वचन ? हें घे !

**प्रवृ०**—म्हणा तोंडानें—

**जीवे०**—' मी तुझ्या मर्जीप्रमाणें सर्व कांहीं करीन ' झालें ?

**प्रवृ०**—हो ! झालें आतां !

**तारा**—धि:कार असो तुला ! हाय हाय ! अज्ञानामुळें, **जीव** असा फशीं पडतो !

**राणी**—महाराज ! **प्रवृत्ति** ही कोण ?

**शिव०**—अग ! ही **अज्ञानकन्या**, अर्थात् अज्ञान**स्फूर्ति** असून, निवृत्तिही, ज्ञान**स्फूर्ति** आहे !

**राजा**—बरोबर ! आणि म्हणूनच, अज्ञानाचे चिरंजिव **भ्रम** ! योग्यच आहे ! शुद्ध एका माळेचे मणी !

**शिव**—ऐका पुढें ऐका. आपण बोलत राहिलों म्हणजे, ती मजा चुकते. नीट लक्षपूर्वक ऐका.

**जीवे०**—बरें प्रिये ! आणखी काय काय फेरफार करावयाचे तुझ्या मनांत आहेत ?

**प्रवृ०**—महाराज ! आम्हां उभयतांची आतां **वृद्धावस्था** !

**जीवे०**—होय !

**प्रवृ०**—यासाठीं, आपला ज्येष्ठ चिरंजीव जो **मोह,** यास राज्यावर बसवावें ! व माझे वडील **अहंकार,** यास आणून प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं पाहिजेत !

**जीवे०**—( कपाळास हात लावतो. )

**प्रवृ०**—काय ! कपाळास काय झालें ? मला अजूनही सांगा, तुमचें कांहीं विरुद्ध मत असेल तर !

**जीवे०**– छे छे ! प्रिये, विरुद्ध मत कसलें ? कपाळावर कसलासा बारीक जंतु चरल्यासारखा वाटला, ह्मणून हात वर नेला होता ! ( स्वगत ) अरे, मी तर अगदीं **गद्धाच** बनत चाललोंना ! पण, हें बोलावें कोणीं ! बोलल्यास सर्वच सुख जातें !

**शिव**—तारे, पाहिलेंसका ! मनुष्य विषयलंपट झाला ह्मणजे, असा होतो !

**तारा**—बरोबर आहे महाराज !

**प्रवृ०**—मग, काय आपला विचार ?

**जीवे०**—विचार दुसरा काय असावयाचा ? तूं ठरवशील तो सर्व मला कबूल !

**प्रवृ०**—होय ना ! अद्याप सांगा, आपलें कांहीं विरुद्ध मत असेल तर ?

**जीवे०**—नाहींग ! सांग तूं. सर्व ठराव अगदीं कबूल आहेत ! आणखी काय काय सुधारणा केली पाहिजे, ती सर्व सांग, त्या प्रमाणें ठराव करून, तो लागलाच अमलांतही आणून सोडतों ! मग तर झालें ना ?

**प्रवृ०**—ऐका तर, **मोहास** राज्याधिकार दिल्यानंतर, मला दुसरी एक मोठी इच्छा उद्भवली आहे !

**जीवे०**—तीग कोणती ?

**प्रवृ०**—माझ्या मोहाचें रूप किती मोहक आहे, पाहिलें ना ?

**जीवे०**—अग ! रूप मोहक, ह्मणूनच त्याचें नांव **मोह** ! बरं पुढें ?

**प्रवृ०**—त्याच्या सौंदर्यास साजेशी, मी एक मुलगी पाहून ठे-

विली आहे ! ती त्याच्या गळ्यांत अडकवून, मी एकदां माझ्या मोहाचे कधीं दोन हातांचे चार हात करीन, व सुनमुख पाहून, मी तिच्या हस्तें, घरांत दिवा कधीं लावून घेईन, असें मला झालें आहे !

**जीवे०**—वाहवा ! मग तर फारच उत्तम ! ( स्वगत ) " घरांत **दिवा** " ह्मणण्यापेक्षां, " घरास **दिवा** " ह्मटल्यास अधिक शोभेल ! ( उघड ) बरें, प्रिये ! कोणती मुलगी पाहून ठेविली आहेस ? माझ्या मोहाला बायको सुरेख पाहिजे हँ !

**प्रवृ०**—तीं काळजीच नको ! मुलीची निवड करणारी कोण, लक्षांत आहे ना ?

**जीवे०**—होहो ! पूर्ण ! आमच्या प्रवृत्ति **पट्टराणी**साहेब ! मग, ती उत्तम असणारच ! बरें, कोणती बरें मुलगी ?

**प्रवृ०**—महाराज ! "**प्रपंच**" नामें, एक लोकप्रसिद्ध गृहस्थ, माझ्या **भ्रमदादाचे** परममित्र आहेत ! त्यांची एक अशी हुषार व रूपसंपन्न मुलगी आहे ह्मणून सांगूं ? मोठमोठ्यांसही ती सहज फसवून सोडील !

**जीवे०**—काय ? इतकी चलाख ? बरें तिचें नांव ?

**प्रवृ०**—तिचें नांव **भुलीबाई** !

**जीवे०**—वाहवा ! नांवही किती मोहक ! खरोखरच प्रिये ! **मोहास** हीच बायको योग्य ! बरें, पण प्रिये ! मोहास आतां राज्यावर बसवून चतुर्भुज करावयाचा, तेव्हां त्या करितां कांहीं दागदागिने तयार केले पाहिजेत !

**प्रवृ०**—महाराज ! ती सर्व कांहीं मीं पुरी तजवीज करून ठेविली आहे ! फक्त, आपल्या संमतीचीच गरज होती !

**जीवे०**—वाहवा ! स्त्री असावी तर अशी ! बरें, प्रिये ! काय काय तयारी करून ठेविली आहेस ?

**प्रवृ०**—महाराज ! माझ्या मोहासाठीं मी हे दागदागिने केले आहेत. **अभिमान**, हा माझ्या मोहास दिव्य **मुकुट** !

**गर्व**, हा माझ्या मोहाच्या मुकुटावर **तुरा** !
**दुःखोद्गार**, ही माझ्या मोहाचीं सुरेख **कुंडलें** !
**चिंता**, हें माझ्या मोहाचें हृदय**पदक** ! व
**अविद्या** हें माझ्या मोहाचें **कंठभूषण** !

**शिव**—( तिघें हांसतात ) मुलींनो ! लक्ष आहेना ?

**तारा**—महाराज ! नाटक पण नाटक !

**राणी**—महाराज ! ' एका माळेचे मणी ' हेंच खरें !

**जीवे०**—बरें प्रिये ! सूनबाईकरितां तयारी आहेना ?

**प्रवृ०**—हो हो ! ऐका.

**खोटसाळपणा**, हीं माझ्या सूनबाईसाठीं **कंकणें** !
**मी व माझें**, ह्या माझ्या सूनबाई साठीं **पाटल्या** !
**स्व-संशय**, ही माझ्या सूनबाई साठीं **मुद्रिका** !
**विषयलोलुप्यता**, ह्या माझ्या सूनबाई साठीं **वांक्या** !
**ताठा**, हा माझ्या सूनबाई साठीं **कुंकुमातिलक** !

याप्रमाणें उभयतांकरितां तयारी करून ठेविली आहे महाराज !

**जीवे०**—भले शाबास ! प्रिये ! काय तुझी ही कारागिरी ! ठीक आहे. ठरलें ! तूं ठरविल्याप्रमाणेंच करावयाचें ! आणखी काय आहे !

**प्रवृ०**—महाराज ! माझ्या **मोहाच्या** मदतीस त्याचे **काम-क्रोधा**दि बाकी बंधू आहेतच ! शिवाय गरज लागल्यास, **आशा तृष्णा**दि त्याच्या बहिणी आहेत !

**जीवे०**—प्रिये ! सर्व सिद्धता अगदीं बरोबर आहे ! सर्व मला मान्य आहे !

**प्रवृ०**—ठीक आहे. पण हें इतकें काम, लवकर झालें पाहिजे ! कधीं करून घेणार बोला ?

**जीवे०**—आतां काय ! करावयाचें ठरलें. पाहिजे तेव्हां उरकून घेतां येईल !

**प्रवृ०**—तें नाहीं ! उद्यांपासून या कामास लागलें पाहिजे.

**जीवे०**—ठीक आहे. उद्यांपासून या कामास लागून, पांच चार

दिवसांच्या अंत, सर्व काम उरकून टाकतों ! मग तर झालें ? बरें, आतां रात्र फार झाली ! एक साखरेचा !

**प्रवृ०**—( हंसून चुंबन देते ! (पडदा पडतो.)

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**—( निरंजन वन ).

**निवृत्ति**—देवा ! काय हा माझा विनाकारण छळ बरें ! मी कोणाच्या वार्तेस नसतां, मजवर विनाकारण गहजब ! मी यांना दुसरी बायको करूं नका ह्मणून कां सांगत होत्यें ! खुशाल आणखी पांच पंचवीस का कराना ! पण त्यांच्या संगतीनें, सर्व अंदाधुंदी माजवून, आपल्या सर्वस्वाचा नाश करूं पहातां, तसें नका करूं ! असें मी सांगत असतां, तिकडे कान न देतां, सर्वस्वी त्या **प्रवृत्ती**च्या नादीं लागून, तिचा **गुलाम** बनावयाचें, व मला घरांतून **बाहेर** ! शिवाय कांहीं अपराध नसतां ! त्यांतूनही मी **भरल्या दिवसांची** असतां, तुह्मांस कांहींच माझी दयामाया नसावी ना ! शुद्ध विषयांध बनलां काय ! असो ! तुह्मांकडे तरी काय बोल ! माझें प्रारब्धच जर तसें असेल, तर तुह्मी तरी त्यास काय करणार ! असो ! आतां असा स्वतःस ताप करून घेऊन फायदा नाहीं ! आपलें कर्म आपण निस्तरिलें पाहिजे !

आतां प्रथम, माझ्या मनाचें **सांत्वन** करून, हरएक कामीं **सहाय**, व संकटसमयीं **धैर्य** देण्यास उपयोगीं पडावा ह्मणून, घरीं माझा भाऊ ‘ **परमार्थ** ’ नामें आहे, त्याला इकडे आणावें.

पण, त्याला तरी घेऊन येण्यास, येथून पाठवावें कोणाला ? येथें तर हें **निरंजन** वन ! करितां त्यास आत्मस्मरणानेंच आणवावें ! ( ध्यानस्थ होते, तों परमार्थ येतो. )

**परमार्थ**—ताई ! मला इतक्या घाईनें कशाला बरें बोलाविलें ?

**निवृ०**—बा परमार्था ! तूं माझा सख्खा बंधू. संकटसमयीं सहाय करणारा, बंधुशिवाय दुसरा कोण आहे ?

**परमार्थ**—ताई ! काय बरें झालें ?

**निवृ०**—बा परमार्था ! तें सर्व कांहीं मी आतां सांगत बसत नाहीं. फक्त इतकेंच सांगत्यें कीं, मी राजाज्ञेवरून, या **निरंजन** वनांत एकटी वास करित आहें. व दुसरी गोष्ट ही कीं, माझ्या ह्या भरलेल्या दिवसांनिमित्त, मला कोणी विश्वासू दासी येथें पाहिजे. तेव्हां कसें करतोस ?

**परमा०**—ठीक आहे. आमच्या शेजारींच एक **बुद्धि** नामक फारच चांगली बाई राहत असते. तिलाच आणतों. ह्मणजे झालें ! ती पुढें मुलांबाळांसही उत्तम **दायीच्या** कामीं उपयोगीं पडण्यासारखी आहे ! माझ्या मनांत तिला कायमचीच ठेवून घ्यावयाची आहे !

**निवृ०**—ठीक आहे. तशी चांगली असल्यास कायमचीच ठेवून घेऊं ! कोणी तरी चांगली बाई जरूर पाहिजे खरी.

**पर०**—असें आहे तर, मी तिला आतांच घेऊन येतों.

**निवृ**—ठीक आहे. जा लवकर घेऊन ये. ( तो जातो. )

मनुष्य विषयासक्त झाला ह्मणजे, कसा भ्रांत होतो, हें माझ्या यजमानांनीं, स्वतः उदाहृत होऊन दाखविलें ! असो, लवकरच अनुभव येईल. असत्याचा **जय** कधींही व्हावयाचा नाहीं. " **सत्यमेवजयते** " हेंच खरें ! हाय ! अरे ! पोटांत फारच कळा येऊं लागल्या. माझा परमार्थ कधीं येतो कोण जाणें ! (तोंच परमार्थ दासीसह येतो.)

**परमा०**—ताई ! ही पहा आली **बुद्धि** !

**निवृ०**—आली का ? बरें झालें. काय हिचें नांव,**बुद्धि** ? वः नांव तर फार गोड आहे. बरें, बाई **बुद्धि**, तुझी माझ्या या बंधूनें फारच शिफारस केल्यावरून, तुला आणविलं आहे ! तूं आपलें काम चांगलें केल्यास, तुझें बरें करीन !

**बुद्धि**—बरं आहे बाईसाहेब ! माझें काम कसें असतें, तें पाहि॰ल्यावर सहज समजणार आहे.

**निवृ॰**—बरें **बुद्धि** ! चल आंत चल लवकर. तयारी कर. वेदना फारच होऊं लागल्या

**बुद्धि**—चला बाईसाहेब ! तें काम माझ्या हातचें आहे ! तुह्मी बिलकूल डगमगूं नका. **दादा** ! तुह्मी येथेंच बाहेर असा. प्रसूति होतांच तुह्मांस येऊन कळवित्यें. ( दोघी आंत जातात. परमार्थ बाहेर बसतो. )

**शिव**—मुलींनो ! ह्या माळेचे मणी पाहिले काय ?

**तारा**—होय महाराज ! यांचीं तीं नांवेंच किती गोड ! **ज्ञान, निवृत्ति, परमार्थ**, **बुद्धि,** अहाहा ! सर्वच आनंद !

**राणी**—नाहींतर ती अवलाद ! **अज्ञान** ! कुठला **भ्रम,** कुठला **मोह**, कुठली **भुली,** कुठली **दुर्बुद्धि** ! इश्श ! मेलीं नांवेंच बुरशीं !

**राजा**—महाराज ! मला वाटतें, या निवृत्ति राणीला संततिही त्याच मार्गांतली होणार !

**शिव**—उघडच. पहा आतां समक्षच समजेल !

( इतक्यांत **बुद्धि** बाहेर येऊन परमार्थास आनंदानें सांगते. )

**बुद्धि**—चांगली सुखप्रसूति झाली ! काळजी नको बरं कां ! **दादा** !

**पर॰**—काय ! सुखप्रसूति झाली ? ठीक, ठीक, ठीक ! बरें झालें एकदां मोकळी ! झाली माझी ताई ! बरं, अग ए बुद्धि ! गेली का ? अरेच्या, ( मोठ्यानें ) अग ! ए बुद्धि !

**बुद्धि**—काय ह्मणतां दादासाहेब ! मी आंत गेल्यें होतें !

**पर॰**—अग ! सुखप्रसूति झाली म्हणून सांगितलेंस, पण याहून आणखी कांहीं सांगायला नको का ! वेडी कुठली ! सांग आतां, माझ्या ताईला **मुलगा** झाला कीं **मुलगी** झाली ?

**बुद्धि**—दोन्ही !

**पर०**—काय ? मुलगा आणि मुलगी दोन्ही ? काय खुळी आहे ही.

**बुद्धि**—होय दादा ! खरंच दोन्ही आहेत !

**पर०**—ह्मणजे ! जुळीं झालीं आहेत का ?

**बुद्धि**—दादा, **एकच** नव्हे, **चार** !

**पर०**—ह्मणजे !

**बुद्धि**—महाराज ! प्रथम चार **मुली** होऊन, नंतर आणखी चार **मुलगे**ही झाले आहेत.

**पर०**—( साश्चर्य ) खरेंचका ? असो ! परमेश्वरी सूत्र ! जशी त्याची इच्छा असेल तसें व्हावयाचें ! बरें, **बाळें** व **बाळंतीण** सुखरूप आहेतना ? संभाळ बरं का ?

**बुद्धि**—दादा ! त्याबद्दल विलकूल काळजी करूं नका. मी नांवाची **बुद्धि** आहें. कुठें काय पाहिजे, तें सर्व मला माहित आहे !

**पर०**—**बुद्धि** ! तें सर्व मी समजून आहें ! तूं असलीस ह्मणजे मला इकडची मुलींच काळजी करण्याचें कारण नाहीं. बरें, आंत जाऊन ताईला विचारून ये पाहूं, रानांतून कांहीं कंदमूळ, फळें आणूं कीं काय ?

**बुद्धि**—ठीक आहे. ( आंत जाऊन येते. ) दादासाहब, त्यांनीं सांगितलें, हा वनवास संपेपर्यंत, सर्वांनीं दुसरें कांहींही न खातां फक्त आत्मनिवेदन **वृक्षफळें** खाऊन राहिलें पाहिजे ! करितां, तीं सर्वांना पुरण्यासारखा दररोज आणीत जावीं, अशी त्यांची आज्ञा आहे. दादा !

**पर०**—ठीक आहे. मी जाऊन येतों तर लवकर ! ( जातात ).

**शिव**—मुलींनो ! समजतें आहेना नाटक ? तुह्मांस आतां यांत कांहींही जड वाटणार नाहीं; माझी खात्री आहे. पण कांहीं दुर्बोधता वाटल्यास लागलेंच समाधान करून घ्या !

**तारा**—महाराज ! आत्मनिवेदन **वृक्ष** तो कसला ?

**शिव**—हा वेडे ! अग **वृक्ष** कसला ? आत्मनिवेदन, ह्मणजे आपल्यास स्वतःविषयीं, ह्म० आत्म्याविषयीं **चर्चा** !

**राणी**—बरोबर ! महाराज ! **आत्मनिवेदन** करीत असतां आह्मांस कुठें तहानभूक लागत होती ?

**तारा**—बरोबर आहे महाराज ! त्या सुखापुढें बाकी सर्व रद्द आहे !

**शिव**—खरेंचना ? पहा पुढें पहा !

( इतक्यांत परमार्थ फळें घेऊन येतो. )

**पर०—बुद्धि** ! अग, ए **बुद्धि** !

**बुद्धि**—ओ ! आल्यें ! ( बाहेर येऊन ) काय **दादा** !

**परमार्थ**—अग हीं फळें ठेव. ( तिच्या ओटींत घालतो. )

**बुद्धि**—बरें आहे दादा ! ठेवल्यें. पण, दादा ! लहान मुलींचीं नांवें काय ठेवायचीं ?

**पर०**—ताईलाच विचारना ?

**बुद्धि**—होय; पण त्या ह्मणतात, आपल्यासच विचार.

**पर०**—( विचार करून ) मला वाटतें, थोरल्या मुलीचें नांव **भक्ति** असें ठेवून, बाकी मुलींचीं नांवें अनुक्रमें **दया, क्षमा, शांति** अशीं ठेवावीं !

**बुद्धि**—आहाहा ! काय यांचीं हीं नांवेंच किती गोड ! बरें **दादा**, मुलांचींही लागलींच सांगा.

**पर०**—ठीक आहे. वडील मुलाचें नांव “ **भाव** ” असें ठेवून बाकी तिघांचीं अनुक्रमें **वैराग्य, विवेक** व **निजबोध** अशीं ठेवावीं. असें मला वाटतें ह्मणावें.

**बुद्धि**—बरं आहे, दादा ! बाईसाहेबांना जाऊन सांगत्यें. व त्याप्रमाणें नांवें ठेववित्यें !

**पर०**—ताईलाही ह्मणावें आणखी विचार कर. ठीक आहे. जा लवकर. पण ए बुद्धि, मला तीं मुलें पहावींशीं वाटतात !

**बुद्धि**—दादा, तीं फार लहान आहेत ! अमळ मोठीं झालीं ह्मणजे येतील ना बाहेर !

**पर०**—इकडे पहा ! काय केलींस तीं आतां दिलेलीं फळें ?

**बुद्धि**—हीं, आहेत हीं !

**पर०**—ऐक तर ! हीं आत्मनिवेदनवृक्षफळें ! यांचा थोडथोडा रस त्यांसही पाज. ह्मणजे तीं आतां पहा गरगर मोठीं होतील !

**बुद्धि**—बरं आहे महाराज ! ( आंत जाते ).

**निवृ०**—( आंत ) अग ! बुद्धि ! काय बाई चमत्कार हा ! माझ्या परमार्थानें आणून दिलेल्या फळांचा काय हा प्रभाव ? त्यांच्या अमृततुल्य मधुर रसपानानें, हीं सगळीं मुलें अल्पावकाशांत कशीं वाढून थोर झालीं !

**बुद्धि**—बाईसाहेब ! परमार्थ दादा मोठे **जादुगार** आहेत !

**निवृ०**—बरें ! यांना सांभाळ ! मी बरेच दिवस **परमार्थाला** भेटल्यें नाहीं, ह्मणून भेटून येत्यें. !

**पर०**—( बाहेरच्या बाजूस डुलत बसले आहेत ! )

**निवृ०**—परमार्था ! तूं आपला जन्मापासून, पहावा तेव्हां डुलतच असतोस !

**पर०**—( वृत्तीवर येऊन ) काय ताई ! नाहीं ह्मटलें, कोणी बोलावयास नाहीं, काय नाहीं ! रिकामें बसून काय करणार ! ह्मणून बसलों होतो, स्वरूपाशीं खेळत, झालें !

**निवृ०**—बरें परमार्था ! काय त्या आत्मानिवेदन फळांचा महिमा ! त्यांच्या सेवनानें आह्मांस तर तहान भूक नाहींच; पण मुलेंही चांगलीं हिंडूं फिरूं लागलीं !

**पर०**—ताई ! त्या रसाचा तसाच माहिमा आहे ! तीं चांगलीं आतां दहा बारा वर्षांच्या मुलाएवढीं दिसूं लागतील ! सांभाळ ! त्यांस त्या **प्रवृत्ती**च्या पोरांचें वारेंही लागूं देऊं नको ! कारण, तीं पोरें महानष्ट असून, त्यांची नजर मोठी **पापी** आहे ! ह्मणून, यांस

त्यांची दृष्ट होण्याचा फार संभव ! याकरितां, त्याजवरून प्रतिदिनीं पंच विषयांची **ओंवाळणी** करून टाकावी !

**शिव**—राजा ! ऐकलें काय ? यांच्यावरून ओंवाळून टाकावयाचे, **पंचविषय** ! सर्व विषयच जर मुळी ओंवाळून टाकून दिले, तर मग, **विषय**बाधा ती कसली होणार ?

**तारा**—आणि **प्रवृत्ती**ची दासी **दुर्बुद्धि**, ही तर त्या तिच्या पोरांस पंचविषयांचें खाजें तयार करून दररोज चारते ! दुर्दैव त्यांचें.

**राणी**—महाराज ! खरोखरच ! **आई, बाप, गुरु, बंधु, दाई, मित्र, सेवक** वगैरे चांगले मिळणें, हें महापुण्याई शिवाय होणें नाहीं ! आतां याच **प्रवृत्ती**चीं पोरें पुढें काय ध्वज लावणार, त्याची कल्पना सहज होते आहे !

**शिव**—बरोबर आहे ! तीं पहा ! **निवृत्ती**चीं सर्व मुलें, आज आपल्या, **बुद्धि** नामक दाईबरोबर, बाहेर फिरावयास चाललीं आहेत!

**तारा**—होय काय ? चला तर आपणही तिकडेसच जाऊं !

( सर्व जातात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ५ वा.

( **स्थळ.** )—निरंजन वनांतील **आत्मानंद** स्वामींचा मठ. शिष्य—**कल्याण.** )

**आत्मा०**—**कल्याणा** ! काय सांगूं ! हें **भगवन्नाम महात्म्य** किती अवर्णनीय आनंदरूप आहे ह्मणून सांगूं !

**कल्या०**—महाराज ! आपल्या सान्निध्यानें मला आतां आतांशी कोठें भगवन्नामाची **थोरवी,** जराजरा कळूं लागली आहे ! खरोखरच ! फार आश्चर्य खरें ! मनुष्य कितीका तापग्रस्त असेना ! भगवन्नामाश्रय केल्यास, क्षणभर तरी समाधान ह्मणून झाल्याशिवाय रहावयाचेंच नाहीं !

**आत्मा॰**—पण **कल्याणा**! तीं समोरून मुलेंरे कोणाचीं येत आहेत ?

**कल्या॰**—होय ! महाराज ! एक कोण मोठी बाई, त्यांस घेऊन येते आहे खरी ! त्यांत कांहीं मुलगे व मुलीही दिसतात ! हो हो, तीं इकडेसच येताहेत ! हीं आलींच जवळ ! (तोंच बुद्धि सर्वांसह येते.)

**बुद्धि**—बाळांनो ! इकडून या ! **भक्तिबाई** ! हो तूं सर्वांपुढें. मुलांनो ! तुह्मी, त्याच्या दोहों बाजूस **दोन**, व मागें **एक**, अशा रहा. चला आतां, सावकाश, विचारपूर्वक पाय टाका !

**तारा**—महाराज ! कवाइतीची रचना तरी किती मजेदार केली आहे हो ही ! सर्वांच्यापुढें **भक्ति** ! बरोबरच आहे ! भक्तीशिवाय, कांहींच होणें नाहीं. मागाहून **भाव, वैराग्य** आहेतच ! शिवाय, सभोंवार **दया, क्षमा, शांति**, ह्या आहेतच ! आतां यांना कां बरें वाईट वासना होणार ? इतकेंही असून, **बुद्धिरूपी** दाईची संगति ! शाबास ! मुलांनों ! धन्य आहे तुमच्या भाग्याची !!

**शिव**—मुलींनों ! अशाप्रकारें ज्याचें बालपण जात असेल, त्यांस पुढें आनंद **साम्राज्य** कां बरें मिळणार नाहीं ? असो, पुढें बघा !

**बुद्धि**—बाळांनों ! त्या झाडास स्पर्शही करूं नये बरं का !

**भाव**—कांग बुद्धि ! त्यांना स्पर्श केल्यास काय होतें ?

**बुद्धि**—बाळांनो, ते सर्व **विषयवृक्ष** आहेत ! त्यांच्या फळांच्या सेवनानें, जीवमात्राचें स्वास्थ्य **भंग** होऊन, त्यांना त्याचें वेड लागतें, ह्मणून त्यांना मुळापासून स्पर्शच करूं नये !

**भाव**—बरें आहे, बुद्धि, आह्मीं आजपासून या वृक्षाला हातही लावणार नाहीं !

**वैराग्य**—बुद्धि ! हा या रानांत मठ कोणाचाग ? आंत कोणी एक दोन माणसेंही दिसताहेत !

**बुद्धि**—बाळांनो ! हा कोणी साधुपुरुषाचा **मठ** आहे असें वाटतें. चला आपण जाऊं, कांहीं तरी सत्संगति घडेल.

**भक्ति**—चल ग, चल!

**बुद्धि**—चल, हो पुढें ! मी आहेंच बरोबर !

**भक्ति**—( पुढें होऊन, मागून सर्व मुली चालत जाऊन, साधुचरणीं लीन होतात ).

**आत्मानंद**—बाळांनो ! परमेश्वर तुमचें कल्याण करो ! कायग ! हीं मुलें कोणाचीं ?

**बुद्धि**—महाराज ! येथें जवळच, **निवृत्ति** नामें आमच्या बाईसाहेब, **निरंजन** वनांत आश्रम करून राहत असतात. त्यांचीं हीं मुलें !

**आत्मा०**—समजलें ! मुलांनो ! इकडे या ! तुमचीं क्रमानें नांवें सांगा पाहूं !

**सर्व**—(आपापलीं नांवें सांगतात. )

**आत्मा**—( स्वगत ) अहाहा ! नांवें तर किती कर्णमधुर आहेत ! पण, या नांवाप्रमाणें यांच्यांत कांहीं गुण आहेत काय पाहूं !

**आत्मा०**—मुली ! घ्यावें काय ?

**भक्ति**—महाराज ! काय घ्यावयाचें असेल, तर फक्त **भगवन्नाम** घ्यावें !

**आत्मा०**—( डुलतो ) बरें, तें निरंतर तोंडीं लागण्यास, प्रथम साधन काय ?

**भाव**—**भक्ति**!

**आत्मा०**—भक्ति दृढ होण्यास आंगीं कोणता गुण कडकडीत असावा लागतो ?

**वैराग्य**—**वैराग्य** !

**आत्म०**—आणि तुझें नांवही.

**वैरा०**—**तेंच** !

**आत्मा०**—बरें द्यावें काय ?

**दया**—**अन्नदान** !

**आत्मा०**—सर्वांत मोठें **दान** कोणतें ?

**शांति—विद्यादान !**

**आत्मा०**—सर्वांत मोठी **विद्या** कोणती ?

**क्षमा—ब्रह्मविद्या.**

**आत्मा०**—आणि सर्वांत मोठी **शिक्षा** कोण ?

**क्षमा—क्षमा !**

**आत्मा०**—शाबास! बरें पण **तारतो** कोण ?

**विवेक—लीनता.**

**आत्मा०**—व **बुडतो** कोण ?

**निजबोध—अभिमान !**

**आत्मा०**—सर्व धर्मांचें **मूळ** कोणतें !

**बुद्धि—भूतदया !**

**आत्मा०**—( अत्यानंदानें डुलतो ) बाळांनों ! तुमचें हें सशिक्षण पाहून, तुम्ही सर्व मला फारच प्रिय वाटूं लागलां आहां ! **कल्याणा** पाहिला काय ? सत्संगतीचा **महिमा** कसा असतो तो ?

**कल्या०**—महाराज ! मी यांचीं हीं मार्मिक उत्तरें पाहून, अगदींच चकित होऊन गेलों आहें ! खरोखरच, यांस उत्तम संगति असली पाहिजे !

**आत्मा०—कल्याणा** ! अरे, हीं महद्भाग्यशाली मुलें आहेत ! अरे, प्रत्यक्ष **ज्ञानराज** यांचे **मातामह** ! **निवृत्ति** यांची **मातुश्री** ! **परमार्थ** यांचा **मामा** ! **बुद्धि,** यांची **दाई** ! मग अशांच्या सान्निध्यांत, असलीं सद्गुणी मुलें उपजलीं, यांत आश्चर्य तें कोणतें ?

**कल्या०**—महाराज ! आपण यांच्या **आईचें, मामाचें, मातामहाचें,** व **दाईचें**ही नांव सांगितलें ! पण मुख्य यांच्या **ताताचें नांव** मुळींच सांगितलें नाहीं, याचें कारण काय !

**आत्मा०—कल्याण** ! यांचें उत्तर मी तुला मग, हीं मुलें गेल्यावर सांगेन.

**भाव**—महाराज ! कां बरें ? आमच्यामुळें, आपल्याला आमच्या **तात**महाराजांचें नांव सांगण्यास, कोणती बरें हरकत ?

**आत्मा०**—बाळांनों ! हरकत वास्तविक कांहीं नाहीं. पण तुह्मांस उगीच वाईट वाटणार. ह्मणून एव्हां नको ह्मणतों.

**विवे०**—तर महाराज ! आह्मां सर्वांची आपल्याला हात जोडून अशी प्रार्थना आहे कीं, आह्मांला आमच्या **तात**महाराजांची माहिती सांगावी !

**आत्मा०**—बाळांनो ! ही माहिती, तुह्मांला तुमच्या आईनें अद्याप नाहीं का सांगितली ?

**भाव**—नाहीं महाराज ! आह्मी आतांपर्यंत केवळ बाल्याव-स्थेंत असल्यामुळें, आमची आई, आमचा सर्व वेळ, साधुसंतांच्या गोष्टी सांगण्यांत व सृष्टिवैचित्र्य दाखवून परमेश्वराचें निरुपम बुद्धि-सामर्थ्य,विस्तृत रीतीनें सांगण्यांतच घालवीत असते ! यामुळें,आह्मांस आतां पर्यंत ' **तात** ' हा शब्दच माहित नाहीं !

**वैरा०**—आणि ज्याअर्थीं, महाराज ! आपण तो आतां उच्चारिला आहे, त्याअर्थीं त्यासंबंधीं माहिती ऐकण्याची उत्कट इच्छा आहे !

**भक्ति**—आणि, महाराज ! ती ऐकल्यापासून कदाचित् आह्मांस वाईट वाटेल, असें ज्याअर्थीं आपण ह्मणत आहां, त्याअर्थीं ती हकिगत आमची आई तर आह्मांस मुळींच सांगावयाची नाहीं ! करितां, ती हकीगत कृपा करून आपण आह्मांस सांगावी महाराज !

**आत्मा०**—ठीक आहे. माझ्या लाडक्यांनो, सांगतों ऐका. ( कानांत सर्व हकीगत सांगतो. )

**विवेक**—असें काय ? ह्मणजे आह्मी हक्कदार **राजपुत्र** असतां, केवळ भिकाऱ्याच्या पोरांसारखे, रानांत फिरत आहों ! व ज्यांचा राज्यावर हक्क नाहीं, असे ते **प्रवृत्तिपुत्र** खुशाल चैनीनें **काया-पुरचें राज्य** भोगित आहेत ? वः ! महाराज ! आपल्याला तरी ही गोष्ट योग्य वाटते काय ?

**आत्मा०**—मुळींच नाहीं. बाळांनों ! **कायापुरचे** खरे हक्कदार तुह्मींच आहां ! असें असतां, तुमचे वडील **जीवे**श्वर हे, अज्ञानांध होऊन व **प्रवृत्ती**च्या नखऱ्यांस भुलून, केवळ तिच्या आधिन झाले, नव्हे तिचे **दास** बनले ! हें कांहीं त्यांनीं बरोबर नाहीं केलें !

**कल्याण**—महाराज ! बरोबर नाहीं कसें ? त्यांना ती बायको आवडली ! शिवाय, त्यांनीं दुसरी बायको जर लग्न करून आणिली आहे, तर तिला काय हाकून लावायची ?

**आत्मा०**—अगोदर, एक बायको असतां दुसरी केली, हीच मोठी चूक ! त्यांत आणखी मोठी चूक ही कीं, पहिली बायको हक्कदार असतां, तिला **वन**वास; व जी हक्कदार नाहीं, तिला **पट्ट**राज्ञित्व !

**कल्याण**—महाराज ! ही त्यांची फारच मोठी चूक. दुसरी-पेक्षां, पहिलीचाच हक्क जास्त पोंचतो ! आपण आतां यांना, काय संमति देतां ?

**आत्मा०**—माझी संमति अशी आहे कीं, यांनीं आपले स्नेह संबंधी एकत्र करून, आपलें साम्राज्य संपादन करावें, असें मला वाटतें !

**निजबोध**—महाराज ! आह्मांस आज्ञा व्हावी ! आह्मी आतां आश्रमास पोंचतांच, या गोष्टीची आमच्या मातुश्रींकडे चौकशी करून, लागलेच या कामास लागतों.

**आत्मा०**—ठीक आहे ! बाळांनो, लागा आपल्या कामाला !

**निजबोध**—पण महाराज ! या निराश्रित बालकावर आपली कृपादृष्टि असली पाहिजे !

**आत्मा०**—ठीक आहे, बाळांनो ! आपले सर्वांचे सद्‌गुण पाहून, माझें तुह्मांवर अप्रतिम प्रेम बसलें आहे ! अर्थात, आपणा सर्वांस माझा पूर्ण आशीर्वाद आहे कीं, शेवटीं कायापुरांतील **आनंद-साम्राज्य**, तुह्मांसच प्राप्त होईल !

**सर्व**—ठीक आहे. महाराज ! आतां आज्ञा !

**आत्मा०**—या, या बाळांनो !

**सर्व**—( साष्टांग प्रणिपात करितात. )

**आत्मा०**—तुमचा सर्वांचा **विजय** असो ! सर्व जातात.

( पडदा पडतो ).

---

## प्रवेश ६ वा.

**स्थळ**, निरंजनवन—निवृत्तीची झोंपडी.

**परमार्थ**—ताई ! तूं या **निरंजन वनांत** वास करूं लागल्यापासून तुझ्या मनाची स्थिति कशी बरें आहे ?

**निवृ०**—परमार्था ! वास्तविक जर ह्मणशील, तर मला **या स्थितींत** जें **सुख** आहे, तें **राज्यवैभवांत** खचित नाहीं !

**राजा**—**शिवगुरो** ! राज्यवैभवाच्या सुखाचा **खरा अनुभव**, आह्मींही त्रिवर्गांनीं पूर्ण घेतला आहे !

**राणी**—नको नको तें राज्यसुख ! पुरे झालें !

**तारा**—आणि या **निवृत्ति** मातुश्रींचें ह्मणणें, स्वानुभवाचेंच आहे ! आणि वास्तविक तें खरेंही ! कारण, आधीं स्थळ **निरंजन** ! ह्मणजे, ज्याला कोणत्याही प्रकारचें **अंजन** ह्मणून नाहीं ! अर्थात्, जगत् संबंधीं आवरण ह्मणून नाहीं ! मग येथें लौकिक **दुःखाचें** नुसतें वारेंसुद्धां येण्याचा संभव नाहीं ! शिवाय, स्वतः मूर्तिमंत **निवृत्ति** ! ह्मणजे **वृत्तिशून्य** ! मग काय ? इकडूनही **वृत्तिशून्यत्व**, व तिकडूनही वृत्तिशून्यत्व आणि ज्या ठिकाणीं वृत्तिशून्यत्व तेथें सर्व **सौख्यच सौख्य** ! अर्थात्, हें सौख्य, राज्यवैभवांत नाहीं हें प्रवृत्तीचें बोलणें रास्त आहे !

**शिव**—शाबास ! **तारे**, बरोबर बोललीस ! पुढें ऐका.

**परमार्थ**—ताई ! विचारदृष्ट्या तुझें ह्मणणेंच बरोबर आहे ! पण, ताई ! आज मुलें कोठें दिसत नाहींत तीं ?

**निवृत्ति**—आज, तीं **बुद्धिबरोबर** सहल करावयास गेलीं

आहेत ! जाऊन बराच वेळ झाला, पण अद्याप कां बरें आलीं नाहींत ?

**पर०**—( लांब नजर फेंकून ) तीं पहा ! येताहेतशीं वाटतात. खूब लांब गेलीं होतीं फिरायला ! आलीं, जवळ आलीं. ( सर्व मुलांसह बुद्धि येते. सर्व, मातुश्रीस व मामास नमन करितात. )

**निवृ०**—( मृदुस्मितमुखें सर्वांस आशीर्वाद दिल्यावर ) काय बाळांनो ! आलां फिरून ?

**निजबोध**—आई, आलों फिरून ! पण आई, आज तुला ए गोष्ट विचारावयाची आहे ! तूं एक गोष्ट आह्मांस छपवून ठेवली आहेस. कोणती बरें आई !

**निवृ०**—मी छपवून ठेवली आहे ? ती कोणती बरें बाळा ?

**भक्ति**—आज आह्मीं एका साधु पुरुषाकडून, एक नवीन गोष्ट ऐकिली आहे !

**निवृ०**—बाळे ! कुठले साधु ? आणि त्यांनीं तुह्मांस काय सांगितलें ?

**विवेक**—आई ! येथेंच पलीकडच्या त्या राईत, **आत्मानंद** ह्मणून कोणी एक साधु पुरुष, आपल्या शिष्यांसह रहात असतात. त्यांनीं आह्मांला एक बातमी कळविली आहे !

**निवृ०**—काय बरें ? ( स्वगत ) बहुधा तीच असावी !

**विवेक**—आई ! या कायापूरच्या **जीवेश्वर** महाराजांची तूं **पट्टराणी** असतां, तुला म्हणे, त्या **प्रवृत्तीच्या** सांगण्यावरून त्यांनीं बाहेर या रानांत आणून टाकली आहे !

**निवृ०**—बाळांनो ! तुह्मीं त्या **प्रवृत्तीचें** नांवही काढूं नका ! कारण, ती बया तशीच आहे ! तिचीं मुलें तर काय विचारूं नका ! ते **काम, क्रोध, मोहादि** तर आमच्या पाठीस हात धुवून लागले आहेत ! आह्मीं करतों काय, आहों कोठें ? खातों काय, बोलतों काय, वगैरे यांचीं, त्यांनीं गुप्त हेर ठेवून एकसारखी टेहळणी चालविली आहे ! न जाणो कदाचित्, त्यांतून कोणी तुमचें बोलणें

ऐकेल तर पुनः नसतें संकट उभें राहील ! ते दुष्ट, न जाणो कदाचित् तुमच्या जिवावरही संकट आणण्यास कमी करणार नाहींत ! याकरितां, माझ्या बाळांनो ! त्यांचें नांवही काढूं नका ! आणि मी तुह्मांस ही गोष्ट कळविली नाहीं, त्याचें अंतस्थ कारणही हेंच !

**विवेक**—आई ! काय बरें, हें तूं बोलतेस ? गादीचे **खरे हक्कदार** आह्मी असतां, त्या **अनधिकारी** पोरांनीं, राज्योपभोग घ्यावा, व आह्मी **खऱ्या हक्कदारांनीं**, असे रानांवनांत **भिकार** स्थितींत दिवस काढावे, हें आधीं योग्य आहे का ? इतकेंही असून, ती गोष्ट बोलण्याचीही आह्मांस मनाई. वः ! ह्मणजे, **प्रवृत्ति** व तिचीं पोरें, हींच कायतीं जगांत **पराक्रमी** ! आणि बाकी सर्व **मेलेल्या बारेचे** ! असेंचना ?

**निवृ०**—पण, बाळांनो ! येथें तुह्मांला काय कमी आहे !

**विवेक**—आई ! राज्यांत नाना प्रकारच्या महायातना असतात, ही गोष्ट आह्मांस कबूल आहे ! व येथें आम्हांस तुझ्या चरणकृपेनें कांहीं कमी नाहीं. हेंही खरें आहे ! तरी पण, **कायापुरावर खरा हक्क निवृत्तिपुत्रांचाच** अहे, असें सिद्ध झालें पाहिजे ! कायापुरचे खरे हक्कदार आह्मी असें ठरल्यावर मग पाहिजे तर, तें राज्य त्यांकडे स्वसंतोषानें आह्मीं देऊं. पण त्यांस दगलबाजीनें तें पचूं देणार नाहीं !

**निवृ०**—बाबा, परमार्था, काय बरें या मुलांना आतां सांगावें !

**पर०**—ताई ! त्यांचें ह्मणणें बरोबर आहे. कारण, आपला स्वतःचा जो **हक्क** आहे, तो कोणीही कधींच गमावतां नये.

**निवृ०**—तर मग आतां कसें करावें ?

**पर०**—ताई ! हा प्रश्न बराच महत्वाचा आहे. याकरितां, मला वाटतें आपले वडील **ज्ञानराज,** यांस बोलावून आणावें. त्यांच्याशिवाय हा न्याय निवडणार नाहीं.

**विवेक**—मामा ! बरोबर आहे. आमचे आजोबा **ज्ञानराज** हे आल्याशिवाय, या गोष्टीचा खुलासा होणें नाहीं. आणि ते येऊन

त्यांनीं आह्मांस हातार्शी धरलें, ह्मणजे त्या **प्रवृत्तीचा प्रधान अज्ञान,** यांच्याशीं किती दिवस टिकाव धरतो, तें पाहूं! जी **सूर्यापुढें अंधाराची,** तीच त्याची गति होऊन जाणार! करितां, आजोबांनाच इकडे आणले पाहिजेत.

**निवृ०**—ठीक आहे. आतां त्यांना त्यांच्या थोर योग्यतेनुरूप कोणी तरी बहुमानानें आणण्यास गेलें पाहिजे. तेव्हां हें काम कोणा-कडून बरें चांगलें होईल ?

**परमार्थ**—मला वाटतें, **दया, क्षमा,** व **शांति** ह्या, या कामीं साफ निरुपयोगी. हें काम केलेंच, तर **भक्तिबाई** मात्र पार पाडील. करितां, माझ्यामतें, **भक्तीलाच** पाठवावें.

**निवृ०**—होय. योजना बरोबर आहे. घरचा कोणी योग्य पुरुष पाहिजे.

**पर०**—ताई! तुझें ह्मणणें बरोबर आहे. पण आतां पाठवावें कोणास ? **वैराग्यास** कांहींच नको! **विवेकास** पाठवावा, तर तो आपला सारा दिवस **विचार**च करीत असतो! बरें, **निज-बोधास** पाठवावें तर तो आपला सदा **ध्यानमुग्ध**! ह्मणून मला या कामीं या तिघांचाही उपयोग होईलसें वाटत नाहीं. झाला तर **भावाचा** मात्र चांगला उपयोग होईल. कारण, सोबत **भक्ति** व हा स्वतः **भाव**! मग काय! तात महाराज! **ज्ञानदेव** आलेच पाहिजेत!

**निवृ०**—ठीक आहे. बा परमार्था! निवड फारच सुरेख झाली! बरें, बाळे **भक्ति**! इकडे ये! तसेंच माझ्या तान्हुल्या **भावा**! इकडे ये पाहूं! (भक्तिभाव हात जोडून उभे.)

बाळांनो! सर्व प्रकार तुह्मीं आतां ऐकलाच आहे. करितां, लव-कर जाऊन **तात** महाराजांस घेऊन या. त्यांस हरयुक्तिप्रयुक्तिनें आणल्याशिवाय राहूं नका.

**भाव**—आई! त्याबद्दल तूं कांहींच काळजी करूं नको. **भक्ति** ताई माझ्या सोबत आहे. तिच्या सेवेला, ते तत्काळ वश होतीलच

होतील मीही शुद्धांतःकरणानें त्यांची प्रार्थना करीन, हरयुक्ति प्रयुक्तीनें, त्यांस आणल्याशिवाय रहात नाहीं !

**भक्ति**—पण आई ! त्यांचें राहणें सांप्रत कोठें असतें !

**निवृ**—बाळांनों ! तेही सांप्रतच्या महाराजांच्या झोटिंग पादशाहीस कंटाळून, मजप्रमाणेंच या जवळच्या **चिदानंद** नामक आश्रमांत रहात असतात. करितां, तेथें जाऊन काम फत्ते करून या !

**दोघे**—ठीक आहे. मातुश्री ! निघतों तर ( नमस्कार करून जातात. )

**शिव**—काय ! नाटकांतलि सर्व रूपकालंकार लक्षांत येतो आहेना ?

**तारा**—महाराज ! आपल्या कृपेनें सर्व कांहीं बरोबर समजत चाललें आहे ! मोठी मजा खरी !

**राणी**—महाराज ! चला, आपणही तिकडे आतां **ज्ञान**राजाच्या आश्रमाकडे जाऊं !

**शिव**—चला. ( सर्व जातात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

**स्थळ**—मार्गक्रमण, चिदानंदाश्रम.

**भक्ति**—भाऊ ! आपण कितीवेळ चालत आहों, तरी अद्याप आजोबांचा आश्रम कां बरें मिळत नाहीं !

**भाव**—ताई ! **थोर** वस्तूची प्राप्ति, **विशेष** परिश्रमानेंच होत असते ! त्यांतून, **भक्तिभा**वानें कोणतेंही काम केलें कीं, यश आहेच आहे ! आतां आजोबांचा आश्रम फार लांब नसावा. मिळेल लवकरच ! पण ताई, आजोबांकरितां कांहीं नजराणा घेतला आहेसना सोबत !

**भक्ति**—हो हो ! ऐक. आजोबांकरितां मी सोबत **दशालंकार** घेतले आहेत !

**शिव**—मुलींनो, हे **अलंकार** नीट ऐका.

**राणी**—ठीक आहे, महाराज !

**भाव**—कोणते बरें !

**भक्ति**—ऐक.

> **वंदन**—हीं सुवासिक **पुष्पें** !
> **अर्चन**—हें सुवासिक **गंध** !
> **सख्य**—हें **पीतांबर** !
> **पादसेवन**—ह्या **पादुका** !
> **आत्मनिवेदन**—हा **नैवेद्य** !
> **स्मरण**—हा **तांबूल** !
> **संतवचनें**—हीं **कर्णभूषणें** !
> **नेम**—ही **माला** !
> **दास्य**—हे नाना **उपचार** !
> **कीर्तन**—ही **दाक्षिणा** !

हे **दशालंकार** सोबत घेतले आहेत ! यांच्यायोगें, त्यांचें पूजन करावयाचें !

**भाव**—शाबास ताई ! तूं हा नजराणा, आजोबांना अगदीं योग्य असाच घेतला आहेस. ओहो ! ताई ! आपण बोलतां बोलतां, अगदीं आश्रमाच्या नजीक येऊन पोंहोंचलोंना ! हा पहा त्यांचा आश्रम !

**भक्ति**—असंका ? चल तर, आपण आंत जाऊं !

**भाव**—हो, चल, हो पुढें ! ( आंत जातात. )

**ज्ञान**—( ध्यानस्थ ! )

**दोघे**—( दर्शन होतांच, त्यांना साष्टांग प्रणिपात करून, वरील दशालंकार त्यांस अर्पण करितात. व हात जोडून उभे राहतात. )

**ज्ञान**—( यथासांग पूजन झाल्यावर, कांहीं वेळानें नेत्र उघडतात. )

**दोघे**—( पुनः साष्टांग प्रणिपात करितात. )

**ज्ञान**—( हात वर करून ) बाळांनो ! तुमचें कल्याण असो ! मुलांनो ! तुह्मी स्वकीय दिसतां

**भक्ति**—महाराज ! आह्मी आपलीं नातवंडें आहोंत !

**ज्ञान**—ह्मणजे ? माझ्या **निवृत्ती**चीं का मुलें ?

**भाव**—होय महाराज! हिचें नांव **भक्ति** ! व माझें नांव **भाव** !

**ज्ञान**—असें काय ? यारे ! माझ्या जिवलगांनो ! या या, मला आधीं आलिंगन द्या पाहूं ! ( दोघे जातात. त्या उभयतांस दोन मांड्यावर बसवितात. ) काय बाळांनो ! आई खुशाल आहेना ?

**भक्ति**—**आजोबा** ! आई व मामा हीं **निरंजन** वनांत खुशाल आहेत. आह्मीहीं सर्व भावंडें, आपल्या आशीर्वादेंकरून खुशाल आहों !

**ज्ञान**—मग ? मध्येंच एकाएकीं येण्याचें कारण ?

**भाव**—आजोबा ! आईनें आपल्यास कांहीं जरूरीच्या कामाकरितां बोलाविलें आहे. " घेऊनच या " असें आह्मांस बजावून सांगितलें आहे.

**ज्ञान**—पण बाळांनों ! इतकें ताबडतोबीनें मुद्दाम बोलावण्यासारखें निकडीचें काय काम आहे ?

**भक्ति**—तें सर्व, तीच आपल्याला सांगेल !

**ज्ञान**—ठीक आहे. चला व्हा पुढें. आलोंच पहा.

**दोघें**—( पुढें जातात. व आईस येत असल्याचें कळवितात. कळतांच, तीं उभयतां सामोरीं येतात. )

**ज्ञान**—( स्वगत ) काय बरें इतकें जरूरीचें काम असावें, समजत नाहीं. असो. आपण जावेंच आतां. ( जातो. )

**दोघें**—( पुढें येऊन नमन करून, बहुमानानें त्यांचा हात धरून आसनावर बसवितात. )

**ज्ञान**—मुली ! तूं अशी ही अरण्यांत झोंपडींत कां ! व इतक्या जरूरीचा निरोप पाठविण्याचें कारण काय ?

**निवृ०**—महाराज ! यजमानांनीं **प्रवृत्ति** नामें दुसरी भार्या करून, तिच्या सांगीवरून, मला हा वनवास भोगविण्यास लाविला आहे ! त्यांत हीं मुलें झालीं ! तरी मी आपली माझ्या स्वभावानुसार यांतच सुख मानून होतें. परंतु, या सर्व मुलांस, आपला हक्क आहे ! तो, आपण संपादिलाच पाहिजे, असें साधुसंताच्याही संमतीनें वाटल्याकारणानें त्यांनीं ती आपली इच्छा मजकडे प्रगट केली. परंतु, मला त्या **प्रवृत्तिबाईचें** भय वाटत असल्यामुळें, व या मुलांनीं तर एकसारखा हट्टच घेतल्यामुळें मलाही गोष्ट विचारांत आणावी लागली. परंतु या राज्यप्रकरणीं कामांत, मला **गति** नसल्यामुळें, व **परमार्थ** भाऊचेंही मत आपल्याला बोलावून आणविण्याचें पडल्यामुळें, **तात महाराज** ! आपल्याला येथवर येण्याची तसदी दिली आहे ! याबद्दल क्षमा होऊन, आधीं या मुलांनीं जो हा हट्ट धरिला आहे, तो **योग्य** आहे का ! हें मला सांगा ?

**ज्ञान**—मुली ! ज्याअर्थी तूं **जीवेश्वर** महाराजांची पट्टराणी आहेस, त्याअर्थी, त्या राज्याचे **खरे हक्कदार, तुझेच मुलगे** आहेत. आणि ह्मणूनच, त्यांचें ह्मणणें अगदीं **रास्त** आहे ! मला तर ही यांची **वीरश्री** पाहून फारच कौतुक वाटत आहे !

**निवृ०**—पण **तात** ! माझा कैवारी आतां आपल्यावांचून दुसरा कोणीही नाहीं ! महाराज ! सर्व **साधुसंत, सिद्ध** वगैरे, जे **स्वानुभव सुखसंपन्न** झाले आहेत. ते सर्व आपल्या सांसर्गानें झालेले आहेत ! आणि हा विचार ध्यानीं आणूनच, मी आपले पाय धरले आहेत ! ( पायांवर मस्तक ठेविते. ) तरी, महाराज ! या गोष्टीचा विचार करून, पुढील सर्व कामगिरी, आपणच पुढाकार घेऊन केली पाहिजे !

**विवेक**—आजोबा ! आपण मनावर घेऊन आमचा हक्क आह्मांस मिळवून दिल्यास, मुख्य **प्रधान**की आपल्यासच मिळणार आहे !

**ज्ञान**—बाळांनो ! मला प्रधानकी मिळणार, ह्मणून मी या प्रयत्नास लागणार आहें, असें मुळींच नव्हे. तुह्मी कोणाही **योग्य** मनु-

ध्यास ती द्या. पण माझा मुख्य हेतु हा आहे कीं, **कायापुरी**सारखी **अमोल्य नगरी,** ह्या दुष्ट **प्रवृत्ति पुत्रांनीं,** दुराचरणरूपीं अग्निप्रळयानें खाक करून टाकण्याचा सपाटा चालविला आहे. हेंच अधिक वाईट आहे! आणि, मी जो या प्रत्यनास लागावें ह्मणतों; तें इतक्याच करितां. तुमच्या प्रधानकीकरितां नव्हे!

**निवृ०—तात म**हाराज! आपण काय कराल तें मला मान्य आहे. हीं सर्व मुलें आपलींच आहेत. याकरितां, यांस यापुढें सुशिक्षण द्यावयाचें, तें आपणच दिलें पाहिजे. हीं मी आज आपल्या पदरांत देत्यें. या पुढें, तीं व आपण, काय पाहिजें तें करा!

**ज्ञान**—ठीक आहे. मुली **नि**वृत्ती! तुझी ही **पि**तृश्रद्धा पाहून मी फारच संतुष्ट झालों आहें! यापुढील सर्व कार्य माझ्याकडे! तूं आतां स्वस्थ बैस! मी सर्व कांहीं पाहून घेतों!

**निवृ०**—मुलांनो! आजपासून सर्व प्रकारें तुमचे वडील, व मार्गदर्शक, हे **आ**जोबा! यांच्या आज्ञेप्रमाणें तुह्मीं सर्वांनीं चालावें. त्यांच्या शब्दाबाहेर पाय टाकावयाचा नाहीं! तुमचें **आ**नंदसाम्राज्य तुह्मांस पाहिजे असेल तर, तुह्मीं, **यां**चाच आश्रय केला पाहिजे!

**विवेक**—आई! आह्मी **सर्व**काळ आजोबांच्या आज्ञेप्रमाणें चालूं. शिवाय, तूं प्रत्यक्ष **नि**वृत्ती आमची **आई, पर**मार्थ आमचा मामा; व **बुद्धि** आमची **दासी** आहे! तेव्हां आह्मांकडून वांकडें पाऊल पडण्याची काळजी, तूं मुळींच करूं नको!

**ज्ञान**—वाहवा! बाळांनो! हें तुमचें शहाणपणाचें बोलणें ऐकून, मला फारच सुख वाटतें बरें, मुली **निवृ**त्ती! आतां दुसरा विचार नको. जर त्या **अन**धिकारी **प्र**वृत्तीपुत्रांनीं, तुमचा हक्क बळकाविला आहे, तर आपणही, सर्व राज्यमंडळाची स्थापना करून, त्यांजपाशीं आमचें राज्य, **हक्कानें** मागावयास पाठविण जरूर आहे. बरें मुली! या तुझ्या चार पुत्रांपैकीं, **को**णास **राजा** करावें असें तुझें मत?

**निवृत्ति**—महाराज ! मी एकदां सांगितलें आहे, कीं मला राज्यप्रकरणीं कांहींएक समजत नाहीं. करितां, **तात**महाराज जें कांहीं करतील, तें मला मान्य ! आपण, आणखी **परमार्थ**भाऊचें पाहिजे तर मत घ्या.

**पर०**—तात ! मला वाटतें, या राज्यपदास खरा हक्कदार ह्मटला ह्मणजे, **"भाव"** हा आहे. कारण, ज्येष्ठत्वाच्या दृष्टीनें युवराजपद, त्यालाच यावयाचें !

**ज्ञान**—हक्कदार खरा. पण राज्यसूत्र चालविणें, हें काम फारच जबाबदारीचें आहे. तें या **भोळसरा**च्या हातून पार पडणार नाहीं. बरें, **वैराग्यास** द्यावें, तर त्याला आपली कशाचीच गरज नाहीं. ह्मणून, **विवे**कास द्यावें, असें एका अर्थी वाटतें. पण, त्याचा एक विलक्षणच स्वभाव ! सारादिवस आपला **विचार** करीत बसतो ! एकच गोष्टीचा असा विचार करीत बसल्यास एवढा राज्यभार कसा हांकला जाणार ! करितां, सर्वतोपरी असें ठरतें कीं, वयानें सर्वांहून लहान असला तरी, या राज्यपदास " **निजबोध** " हाच योग्य आहे ! का ? परमार्था ! कसें वाटतें ?

**परमा०—तात** ! आपलें ह्मणणें सर्वथा योग्य आहे. कारण, राज्यसूत्रांसारखें नाजूक काम, ज्याच्या हातीं द्यावयाचें, त्याच्या गुणावगुणांबद्दल पूर्ण विचार करूनच, योजना झाली पाहिजे ! मी मघां फक्त, **भाव** याचा ज्येष्ठपणा दाखविला, इतकेंच !

**भाव**—आजोबा ! " मी सर्व बंधूंत **वडील** ह्मणून **मलाच** राज्याधिकार पाहिजे " असा **खुळा हेका**, मी मुळींच करणार नाहीं ! **आह्मां चौघां भावांतून कोणीही जरी राज्याधिपति झाला, तरी आह्मांस चालतो** ! पण, हक्क आमचा स्थापित झाला; इतकेंच. राज्यपदावर आपण ज्याची योजना कराल त्यास आह्मीं, व **भक्त्यादि** या सद्गुणी भगिनी, मनोभावें मदत करूं. काय ? ( सर्व भावांस ) असेंचना, बुआंनो !

**भक्ति**—होय, होय! असेंच. आह्मी आमच्या **राजास** सर्व प्रकारचें **उत्तम सहाय** करूं!

**ज्ञान**—मुलांमुलींनो! या निजबोधाचे आंगीं, दुसरेही आणखी ऐकण्यासारखे **अप्रतिम** गुण आहेत! त्यांतून कांहीं सांगतों.

१—तो **सत्वगुणसंपन्न** असल्यामुळें, सदा **शांतवृत्तीनें** असतो!

२ तसेंच, त्याच्या चित्ताच्या ठिकाणीं, **पूर्ण बोध** जागृत असून त्यास **राजा व रंक** हे दोन्ही सारखेच वाटतात!

३—शिवाय, तो सदा **योगयुक्त, आनंदी, नम्र, चतुर्देह-द्रष्टा, जीवशिवज्ञ, ज्ञानमणि, संतविरक्त महानुभाव-मान्य,** असा असल्यामुळें तर **खरा** अधिकारी **हाच** ठरतो!

**निवृ०—तात**! आपण जें ठरवाल, तें यथायोग्यच असणार! अशी आह्मां सर्वांची पूर्ण खात्री आहे. करितां, त्यांचीं कारणें आह्मांस सांगत बसण्याची मुळींच अवश्यकता नाहीं.

**परमा०**—पण **महाराज**! माझी एक विज्ञप्ति आहे.

**ज्ञान**—कोणती बरें?

**पर०**—मला वाटतें, आधीं, आमच्या **निजबोधाचा विवाह** करुन त्यास राज्याभिषेक करावा!

**ज्ञान**—( सस्मित ) बायकांना घरांत अगोदर **सून** लौकर आणण्याची हौस! असो. ठीक आहे! मुली! तुझें मत कसें काय?

**निवृ०**—( मंदस्मित ) तात! आपण ठरवाल, तेंच माझें मत.

**ज्ञान**—असें कसें? तूं जर सासूबाई, तर घरांतली सून आणावयाची, ती तुला पसंत, अशीच पाहिजे.

**निवृ०**—महाराज! आपण काय कराल तें सर्व मला पसंत. आपणच कोणती ती वधू ठरवा!

**ज्ञान**—( विचार करून ) माझा एक **"आनंद"** नामक मित्र आहे. त्याची **"उन्मनी"** नांवाची एक कन्या आहे. काय मुलगी

सद्गुणी आहे ह्मणून सांगूं! पाहिली तर, **क्षुधातृषादिकांचीही** विस्मृति पडते! करितां, आमच्या निजबोधास तीच वधु ठरवावी.

**परमा०**—पण तात! विवाहाची कांहीं तयारी?

**ज्ञान**—अरे, तयारीस काय? ऐक, एकेकाला कसें काम नेमून देणार तें!

**भक्ति व भाव,** यांनीं **अंतरपाट** धरावा.
**वैराग्य,** यानें **अक्षता** टाकाव्या.
**तूर्या** हिनें **ओंवाळणी** करावी.
**आनंद स्त्री, विश्रांति,** हिनें **शेंस** भरावी.
नाना **मंगलध्वनि,** हींच **वाजंत्रें** समजावीं.
**ध्यान,** ह्याच **ध्वजपताका** समजाव्या!

इतकें केल्यावर, मग काय तुझें ह्मणणें राहिलें?

**परमार्थ**—मग काय, तात महाराज! मोठी बहारच उडाली! पण आणखी एक विनंति आहे.

**ज्ञान**—काय बरें?

**परमार्थ**—राज्याभिषेकसमयीं कांहीं अलंकारांची तयारी पाहिजे!

**ज्ञान**—ती योजना मी केली आहे. ऐक.

**शिव**—मुलींनो! नीट लक्ष आहे ना?

**तारा**—होय महाराज! नीट लक्ष आहे. नाटक मोठें **मनोरंजक खरें**!

**राणी**—खरोखरच महाराज! या नाटकाच्या योजनेमुळें आह्मांस फारच फायदा झाला!

**शिव**—ठीक आहे. आतां **निजबोधाचे अलंकार** ऐका!

**पर०**—कोणती बरें तात महाराज, योजना केली आहे?

**ज्ञान**—योजना अशी केली आहे!

१—**आसन, पूर्णत्व** हें ठरविलें आहे.
२—**वस्त्र, व्यापकत्व** हें ठरविलें आहे.
३—**विभूति पावनत्व** ,, ,, ,,

४—**चंदन**, **अदाह्यत्व** हें ठरविलें आहे.
५—**तांबूल**, **अशोकत्व** ,, ,, ,,
६—**सुवर्ण**, **अजरत्व** ,, ,, ,,
७—**अमृत**, **अमरत्व** ,, ,, ,,
८—**माला**, **निर्मलत्व** ,, ,, ,,
९—**हार**, **मुक्ति** ,, ,, ,,
१०—**वज्र**, **अच्छेदत्व** ,, ,, ,,
११—**मुद्रा**, (शिक्का) **ॐकार**,, ,, ,,

पुरेत ? कीं आणखी पाहिजेत ?

**पर०**—अहाहा ! तात ! कायही आपली अतर्क्य योजना ! या अलंकारांनीं आमच्या **बोध**राजास किती अप्रतिम शोभा चढणार आहे ह्मणून सांगूं ?

महाराज ! त्याप्रमाणें आतां कामगारांचीही योजना व्हावी.

**ज्ञान**—ठीक आहे. ऐका.

१—**सकल राज्यभाराचें** काम, **बोध** यानें करावें.
२—**एकनिष्ठा** ठेवण्याचें काम, **भाव** ,, ,,
३—**अलिप्त वृत्ति** ,, ,, **वैराग्य** ,, ,,
४—**नित्यानित्य** विचार, करण्याचें ,, **विवेक** ,, ,,
५—**एकनिश्चय**, ठेवण्याचें ,, **धैर्य** ,, ,,
६—**सत्यव्रत**, पाळण्याचें ,, **तूं** करावयाचें.
७—**सर्व सौ**ख्यवृद्धीचें काम, **भक्त्या**दिकांनीं करावयाचें!

काय ? होईल यांच्याकडून कामगिरी ?

**पर०**—तात महाराज ! हें काय विचारावें ? सर्व नेमणुका अगदीं **यथार्थ** आहेत ! पण, आणखी एक गोष्ट, याच बैठकीस ठरल्यास बरीशी वाटते.

**ज्ञान०**—कोणती बरें ?

**पर०**—वरील सर्व व्यवस्था राज्यप्रकरणीं झाली. आतां ठरल्याप्रमाणें सर्व गोष्टी अमलांत आणावयाच्याच ! पण हें राज्याभिषे-

कार्चे कार्य झाल्यावर, लागलीच त्या **प्रवृत्ति**पुत्रांवर **स्वारी** करावयाची, कीं **सामोपचारा**नें शुद्धीवर येतात कीं काय, हें पहावयाचें?

**ज्ञान**—तुला कसें वाटतें.

**पर०**—काय ताई ! तुझें मत काय या बाबतींत ?

**निवृत्ति**—आपण उभयतां काय ठरवाल, तें मला मान्य ! पण त्यांतूनही, प्रथम **सामोपचारें** त्यांस सांगून पहावें असें वाटतें.

**पर०**—**तात** ! माझेंही मत असेंच आहे.

**दया**—आजोबा ! अपराध्यास प्रथम सामोपचारें सांगून पहाणें योग्य.

**क्षमा, शांति, भक्ति**—महाराज ! आमचेंही मत तसेंच आहे.

**ज्ञान**—झालें तर ! मी तरी तेंच ह्मणत होतों. आपल्याकडील ही सर्व तयारी झाल्यावर, आपण त्याजकडे **शिष्टाई** करण्याकरितां, कोणास तरी पाठवूं.

**पर०**—"कोणास तरी" ह्मणून मोघम ठरविण्यापेक्षां, आत्तांचे आत्तां, तोही ठराव करून टाकल्यास बरासा वाटतो.

**ज्ञान**—ठीक आहे ( विचार करून ) शिष्टाईचें काम करणारा, चांगला विचारी, समयसूचक, व उत्तम वक्ता, असाच पुरुष असला पाहिजे. करितां, या कामीं उत्तमांत उत्तम, असा आमचा "**विवेक**" हाच योग्य आहे. ह्मणून, त्यासच त्या **प्रवृत्ति पुत्राच्या** कचेरींत पाठवावें.

**शांति**—पण, **आई** सगळेंच मुसळ केरांत ?

**निवृ०**—तेंग काय ?

**शांति**—आई ! तुह्मीं सर्व कामगारांच्या नेमणुका केल्या. पण **प्रधान**जीचा मुख्य अधिकार कोणाकडे सोंपविला ?

**निवृ०**—शाबास ! बाळे, बरी आठवण केली ! **तात**महाराज ! आपण तें काम मुळींच गाळलें, असें कसें ? मी हात जोडून पुनः विनवितें, कीं **प्रधान**कीचा सर्वाधिकार, **आ**पणच पत्करिला पाहिजे.

**पर०—तात** ! तें काम आपल्या शिवाय, दुसऱ्या कोणासच होण्यासारखें नाहीं.

**सर्व मुलें—आजोबा !** प्रधानकीचें काम, **आपणच** पत्करिलें पाहिजे. आह्मीं **नि**राधार मुलें ! आपल्याशिवाय, आह्मांस कोणाचा बरें आधार ?

**ज्ञान**—बरें आहे, बाळांनो, तुह्मां सर्वांच्या आग्रहास्तव, मी तें काम पत्करितों.

**विवेक**—आतां पाहूं ! ते **अना**दि **प्र**वृत्ति—**मं**त्रिजन, या आमच्या आजोबांपुढें कसा काय टिकाव धरतात तो !

**ज्ञान**—झालें आतां सर्व ! पहा आणखी कांहीं काम ठरवावयाचें राहिलें असेल तर !

**पर०**—नाहीं, तात ! आतां कोणतेंही काम ठरवावयाचें राहिलेलें नाहीं !

**ज्ञान**—चला तर. लागा आपापल्या कामाला. हें विवाहाचें, व राज्यारोहणाचें सर्व काम पुरें करून, ताबडतोब, **विवेक** यास **मोह**कचेरीस **शिष्टाई**करितां पाठवावयाचें. झालें ठरलें ना ?

**सर्व**—होय.

**ज्ञान**—चला तर. ( सर्व जातात ).

**शिव**—तारे ! पाहिलेंसना ! **सत्संगतीचा** महिमा कसा असतो तो ?

**तारा—महाराज** ! आपलें हें नाटक फारच **विचारणीय** खरें ! यांतील प्रत्येक पात्राची योजना, व त्याचें भाषण, **सूक्ष्म दृष्टीनें** विचारांत आल्यास, मनास पराकाष्ठेचा **आनंद** व **कर्मणुक** झाल्याशिवाय रहात नाहीं ! आतां, हे यांचे अलंकारच पहा ! हे किती मजेदार रीतीनें ठरविले आहेत !

**राजा**—बरोबर आहे ! नांवासारखा थाट ! प्रत्यक्ष जेथें **ज्ञान, निवृत्ति, परमार्थ, दया, क्षमा, शांति**; तेथें **अविचार**

होऊन, **नाशवंत** वस्तूंस स्थळ कसें मिळेल ? याच्या उलट प्रवृत्तीचा दरबार !

**राणी**—छीः ! छीः ! तिच्या दरबारी मंडळींचीं नांवें सुद्धां किती बुरशीं व तिरस्करणीय बरें, पण महाराज ! आतां पुढें, यांच्या शिष्टाईचा कांहीं उपयोग होणार नाहीं ना ? कीं पालथ्या घागरीवर पाणी ?

**शिव**—छेग ! ते अविचारी **मदांध शिष्टाइस कसचे** कबूल होतात ?

**तारा**—तर मग कसें होणार ?

**शिव**—होणार काय ? शेवटीं युद्धप्रसंगावर पाळी येणारच ! तो सर्व प्रकार आतां समक्षच दृष्टीस पडेल. चला आतां पुढें काय होतें तें पहा. ( सर्व जातात ).

---

## प्रवेश ८ वा.

**स्थळ**—कायापूर—( मोहराजाची कचेरी. )

**मोहराज**—प्रधानजी !

**अज्ञान**—( उठून ) आज्ञा ! ( हात जोडून नम्र )

**मोह०**—आई प्रवृत्तीच्या आग्रहावरून माझ्या तीर्थरूपांनीं, मला या राज्यावर बसविलें आहे खरें, पण, मला त्या **निवृत्ती**-बद्दल मोठी **भीति** वाटत आहे !

**अज्ञान**—महाराज ! या **अज्ञान** बहादरासारखा **प्रधान,** आपल्या सान्निध्यास असतां, त्या यःकश्चित् **निवृत्तीची** आपण कसली भीति बाळगीत बसलां आहां ? शिवाय, तिला अगदीं घोर निबिड अरण्यांत सोडून दिल्यास, आज बरेच दिवस झाले. तेव्हां ती इतक्यांत हिंस्र पशूंच्या भक्ष्यस्थानींही कदाचित् पडली असेल ! ( इतक्यांत एक शिपाई येऊन मुजरा करितो ).

**मोह**—काय आहेरे ?

**शिपाई**—सरकार ! खालीं एक **गुप्तहेर** आला आहे.

**मोह०**—( स्वगत ) खचीत ! यानें कांहीं तरी बातमी आणली असली पाहिजे. ( उघड ) बरें आहे येऊंदे त्याला ! ( हेर येतो. )

**हेर**—महाराज ! मी सरकारी आज्ञेवरून, आज कित्येक वर्षें, एकसारखा **निवृत्ती**च्या शोधांत आहे ! परंतु इतकी वर्षें तिचा कोठेंही पत्ता नव्हता. परंतु, फिरतां फिरतां हल्लींच तिचा सुगावा लागला !

**मोह०**—काय बरें तिजबद्दल माहिती ?

**हेर**—महाराज ! दूर " **निरंजन** " म्हणून एक **एकांतस्थळ** आहे. त्यांत ती असून, तिला चार मुलगे व चार मुली अशीं आठ मुलें झालीं आहेत!

**मोह०**—प्रधान ! आलाका अनुभव ! " ती मेली ही असेल " नव्हे का ?

**प्रधा०**—( खिन्न. )

**मोह०**—अरे, आणखी काय तिजसंबंधीं माहिती ?

**हेर**—महाराज ! आपण राज्याचे **खरे हक्कदार** असतां, आपल्यास थोरल्या सरकारांनीं रानोमाळ भटकावयास लाविलें, असें तिच्या मुलांच्या मनांत आल्यावरून, त्यांनीं आपली राज्यस्थापना करून " **निजबोध** " नामें एका मुलास गादीवर बसवून, ''**ज्ञान**' हा मुख्य प्रधान नेमिला आहे !

**मोह०**—( मनांत भितो. ) बरें, आणखी काय तिजबद्दल माहिती आहे ?

**हेर**—नाहीं महाराज ! याहून कांहीं ज्यास्त माहिती मला नाहीं.

**मोह०**—ठीक आहे. जा-तूं.

**हेर**—जी सरकार ! ( मुजरा करून जातो. )

**मोह०**—**मंत्री जनहो** ! पाहिलेंना ? या **निवृत्तीनें** केवढा परिवार माजविला तो ?

**अज्ञा०**—महाराज ! आपल्या पदरीं, **काम क्रो**धादि महापराक्रमी अजिंक्य वीर असतां, आपण त्या **निवृत्तीची**, व तिच्या

**काल**च्या **अर्भ**कांची मनांत किंचित्‌ही भीति बाळगण्याचें विलकूल कारण नाहीं. तो थेरडा तिचा प्रधान **ज्ञान,** मजपुढें काय पराक्रम करितो! पाहून घेईन. एकक्षणांत पळवीन क्षणांत!

**काम**—**म**हाराज! मजसारखा आपल्यास **बंधु** असतां, आपल्यास दिक्कत कशाची? माझा तडाका **देवा**दिकांसही **अस**ह्य! मग त्या पोरांस काय सहन होणार! नुसत्या एक **नेत्र–कटाक्षा**नें त्यांस मूर्च्छित करीन! स्वस्थ असावें.

**क्रोध**—**महा**राज! आणि मी, **एका** क्षणांत काय करीन, हें थोरथोरांस समजून चुकलें आहे! हीं तर कालचीं पोरें! पाहिजे तर, त्यांना एका निमिषांत **नाहींशीं** करून सोडीन!

**मोह०**—**मंत्रीजनहो**! आपणां सर्वांचें आपापल्या कारभारांतलि नैपुण्य पाहून, मला सर्वतोपरी मोठी हिंमत वाटत आहे. पण, युद्ध प्रसंगच आला, तर पुष्कळ सैनिकांची हानि होणार आहे.

( तोंच, त्यांचें बोलणें आडून ऐकणारी **प्रवृत्ति** रागानें पुढें होऊन )

**प्रवृत्ति**—कायरे, ए **मोहा**! तूं अगदींचरे **षंढ** कसा? तुला हें **स्त्रैण** पांघरण्यास लाज नाहींना वाटत? अरे! **अज्ञाना**सारखा तुझा **प्रधान, कामक्रोधा**सारखे तुझे साह्यकर्ते **बंधु,** व मज **प्रवृत्ति** सारखी तुझी प्रत्यक्ष **माता** असतां, तुला त्या **सटवीची** व तिच्या **पोरांची** दिक्कत वाटावी, यापेक्षां आणखी आश्चर्य तें कोणतें? अरे! माझा प्रभाव तुला एवढ्याशा पोरास कोठून कळणार? अरे मी स्त्री असतां.

१—रावापासून तो रंकापर्यंत यच्चयावत्‌ जीवजंतु, मी माझ्या प्रभावजालांत नुसते गुरफटून सोडले आहेत!

२—सर्व चराचरांच्या **आदि** व **अंतीं**हो **मीच** आहें!

३—शास्त्रें व पुराणें, हींही मला सोडून जाण्याची **प्राज्ञा** नाहीं!

४—मुख्यतः सर्वारंभीं कोणी "**ब्रह्म**" ह्मणून आहे, असें ऐकतें. पण, त्यास तरी रूपास आणण्यास कारण कोण? **मीच**!

५—नाना अवतार झाले, तरी ते सर्व **माझ्याच** प्रभावानें !

६—मी **त्रैलोक्य** व्यापिलें असून ब्रह्मांदिकांसही वेड लावून सोडलें आहे !

७—मी त्या अवदसे **निवृत्तीचा बुचडा** धरून, सारखा हालवीन !

८—इतकेंच नव्हे, त्या थेरड्या **ज्ञानोबाच्या मिशाच** उपटून टाकीन ! मग तीं भ्याड **पोरें** धूम पळत सुटतील !

एवढा पराक्रम करण्याचें माझ्या आंगांत **सामर्थ्य** असून, तूं पुरुषासारखा पुरुष असतां, भिऊन गर्भगलीत होतोस, तेव्हां काय ह्मणावें !

**आशा**—आई ! काय हा **मोह** दादा, कसली काळजी करीत बसला आहे ? त्या **निवृत्ती**चा व तिच्या **पो**रांचा, क्षणार्धांत नुसता चुरा करून सोडीन ! तसा प्रसंग आल्यास, मी त्या सगळ्यांनाच सबंध गट्ट करून सोडीन !

**मोह०**—मातुश्री ! आला आतां सर्व प्रकार लक्षांत. आतां कृपा करून रागावूं नको !

**प्रवृत्ति**—आलास आतां रस्त्यावर ? भिऊं नये, प्रसंगाला छाती घट्ट ठेवावी.

**मोह०**—ठीक आहे. वीरहो ! ( धैर्यानें ) आपणा सर्वांचा पराक्रम मला पूर्णपणें ठाऊक आहे. येऊंद्या कोण तो आतां राज्य घ्यावयाला; दाखवितों कसा आहे तो या **मोहाचा सपाटा** !

( इतक्यांत एक शिपाई येतो ).

**शिपा०**—( मुजरा करितो ).

**मोह०**—काय आहेरे ?

**शिपा०**—महाराज ! कोणी एक बाहेर आला आहे !

**मोह०**—कोण आहे तो ! त्याचें नांव काय ?

**शिपा०**—सरकार विचारून येतों

**मोह०**—मग, विचारल्याशिवाय कशाला आलास ? जा लवकर.

**शिपा०**—जी सरकार ! ( धांवत जाऊन येतो ) महाराज ! त्यांचें नांव **विवेक** !

**मोह०**—ठीक आहे. येऊंदे आंत.

( विवेक आंत येऊन नमस्कार करितो. )

**मोह**—काय तुझें नांव **विवेक** ?

**विवेक**—होय महाराज ! आपली **सावत्र** माता जी **निवृत्ति** तिचा मी तृतीय पुत्र, अर्थात् आपला **बंधु** !

**मोह०**—( मनांत दचकतो पण तसें न दाखवितां ) काय, तूं निवृत्तिपुत्र **विवेक** ? ह्मणजे माझा **बंधु** ? निवृत्ति मातुश्री गर्भवति असतां एकाएकीं कोणीकडे गेल्या ह्मणून बऱ्याच वर्षांपूर्वीं ऐकिलें होतें खरें ! परंतु, त्यानंतर ती कोठें असते, व तिला काय अपत्यें झालीं, हें मला माहित नसल्यामुळें, अर्थातच मी आपल्यास ओळखिलें नाहीं ! त्याबद्दल राग नसावा. पण **विवेका**,आज सूर्य कोणीकडे उगवला ?

**विवेक**—बंधो ! तशाच कांहीं महत्वाच्या कामानिमित्त आलों आहे !

**मोह०**—( स्वगत ) बहुधा तेंच ! गुप्तहेरानें दिलेल्या वर्दीवरून तेंच ठाम ठरतें ! ( उघड ) कोणतें बरें, **विवेका** ! असें महत्वाचें काम ?

**विवेक**—बंधो ! ज्याअर्थी आपण एवढा मोठा राज्यकारभार हांकतां आहां, त्याअर्थी, तुमच्या ठायीं कांहीं तरी सारासार विचार असलाच पाहिजे, असें समजून, चार शब्द बोलतों. सावधानपणें ऐका:—

आपली सावत्र मातुश्री “ **निवृत्ति** ” ही **जीवेश्वर** महाराजांची **पट्टराणी**, हें आपणा सर्वांस माहितच आहे. अर्थात् राज्याचे **खरे**

हक्कदार **निवृत्तिपुत्र** हे आहेत. ही गोष्ट ध्यानीं आणून, आमच्या मातुश्रीनीं, तुह्मांस असा निरोप कळविण्यास मला पाठविलें आहे कीं, "तुह्मीं फार दिवस राज्य भोगिलें. आतां तें आमचें आमच्या हवालीं करावें, आणि तुह्मीं **प्रवृत्तीसह, निवृत्ति** मातुश्रीशीं लीन असावें; आमचा **बोधराजा** सांगेल त्याप्रमाणें तुह्मीं सर्वांनीं वर्तन ठेवावें. ज्ञानाचें वचन पाळावें. त्याच्या वचनास क्षणाचाही विलंब करूं नये. तसेंच **निवृत्ति** मातेस मान द्यावा. **प्रवृत्तीनें** तिचे आधीन असावें." ( हे शब्द ऐकतांच )

**प्रवृत्ति**—( चवताळून अंगावर जाते ) कोणरे तूं मेल्या ! तोंड आटपतोस कीं घालूं शेंडीस हात ?

**विवेक**—**मो**हराज ! ही **रा**जसभा आहे, कीं गांवचा **चवा-**ठा आहे ? येथें या बायकांचें काय काम ? आपण **राजे** आहां ! मी आपल्या विरुद्ध पक्षाकडून, **शिष्टाई**करितां आलों आहें. त्याचा जो निरोप असेल, तो अक्षरशः मी आपल्यास सांगितला नाहीं, तर मी अपराधी होईन. आतां, त्याप्रमाणें वागणें न वागणें हें आपल्या मर्जीचें काम आहे. पण एकाग्र ऐकून घेण्याचें सोडून व्यर्थ क्रोधवश होऊन आपल्या प्रतिष्ठितपणास आपणच आपल्या कृतीनें **कलंक** लागणें, हें चांगलें काय ? ही **रा**जसभेची रीत नव्हे.

**मोह०**—बरोबर आहे. मातुश्री ! आपण, **आ**शादिकांस घेऊन घरीं स्वस्थपणें बसा. सर्व हकीगत मी आतांच घेऊन आपल्याला कळवितों. राजपद्धतीची अमर्यादा करणें बरोबर नाहीं.

**प्रवृ०**—ठीक आहे. सर्व हकीगत सभाविसर्जन होतांच येऊन कळीव.

**मोह०**—ठीक आहे. त्याच प्रमाणें, मंत्रीजनहो ! तुम्हीही त्याचें बोलणें संपेपर्यंत कांहीं बोलूं नका. तो पाहिजे तितकें बोलला, तरी राज्य आमच्या हातीं आहेना ?

**कामादि**—आज्ञा महाराज !

**मोह०**—होऊंद्या ! आणखी त्यांचा निरोप आहे ?

**विवेक**—ऐकावें महाराज! **कामक्रोधादि** तुमचे बंधु, त्यांस ज्ञानाचें भाषण मुळींच प्रिय वाटत नाहीं. त्यांनींही **बोधराजाचे** आज्ञेंत वागावें.

**क्रोध**—काय, पुनः बोल?

**विवेक**—महाराज! आतांच आपण काय आज्ञा केली?

**मोह**—अरे! तुम्हांस एव्हां बोलूं नका ह्मटलें ना? चालूं द्या.

**विवेक**—त्याचप्रमाणें **विषयांनीं** सुद्धां, विषयलोलुप्यता सोडून, सदा **तृप्त** असावें. तसेंच तुमचे दुसरे सभासद **भ्रम** व अविवेक, यांस कामावरून **दूर** करावें. अज्ञानास **हद्दपारी** द्यावी!

**ज्ञान**—( दांत ओंठ चावून अस्तन्या वर करितो. )

**मोह**—( तोंच मोहराजानें डोळे वटारून पाहिल्याबरोबर चूप बसतो. )

**विवेक**—प्रपंचास **नीतिपं**क्तीस बसवावें. **दुर्बुद्धि** तर नगराबाहेर हांकून द्यावी, व तिला नगरांत येण्याची बंदी करावी. **सद्धर्म** वाढवून, अधर्मास थारा देऊं नये. **साधुसंतांची** शुद्ध भावानें **सेवा** करावी व त्यांचा अमृतप्राय उपदेश श्रवण करावा.

त्याचप्रमाणें, **आशा**, **तृष्णा**, **भ्रांति**, **कल्पनादि**, ज्या तुमच्या बहिणी, त्यांसही निरोप द्यावा. त्याचप्रमाणें सेनापति **मनो**वीर, यानें तुमचा आसरा सोडून, निरंतर **बोधराजासन्निध**, ज्ञानप्रधानाबरोबर बसून असावें. ह्मणजे त्यास **सुख**प्राप्ति होईल. नाहीं तर, त्यास तुमच्या सहवासानें **दुःखी** व्हावें लागेल. **ऐक्य**भाव धरा, **भक्तिमार्गानें** चाला. **ज्ञानास** मान देऊन, क्षेत्रक्रिया त्याच्या **संम**तीनें करा. ह्मणजे त्याच्यायोगें **साधुसंत** सुखी होतील.

असा **निवृत्ती** मातुश्रींचा आपल्यास निरोप आहे! यावर आपलें काय ह्मणणें असेल, तें कळूं द्या. ह्मणजे, तें जाऊन त्यांस कळवितों.

**मोह**—काय! झालें बोलून?

**विवेक**—होय महाराज!

हक्कदार **निवृत्तिपुत्र** हे आहेत. ही गोष्ट ध्यानीं आणून, आमच्या मातुश्रींनीं,तुह्मांस असा निरोप कळविण्यास मला पाठविलें आहे कीं, "तुह्मीं फार दिवस राज्य भोगिलें. आतां तें आमचें आमच्या हवालीं करावें, आणि तुह्मीं **प्रवृत्तीसह, निवृत्ति** मातुश्रीशीं लीन असावें; आमचा **बोधराजा** सांगेल त्याप्रमाणें तुह्मीं सर्वांनीं वर्तन ठेवावें. **ज्ञानाचें** वचन पाळावें. त्याच्या वचनास क्षणाचाही विलंब करूं नये. तसेंच **निवृत्ति** मातेस मान द्यावा. **प्रवृत्तीनें** तिचे आधीन असावें." ( हे शब्द ऐकतांच )

**प्रवृत्ति**—( चवताळून अंगावर जाते ) कोणरे तूं मेल्या ! तोंड आटपतोस कीं घालूं शेंडीस हात ?

**विवेक—मोहराज** ! ही **राजसभा** आहे, कीं गांवचा **चवाठा** आहे ? येथें या बायकांचें काय काम ? आपण **राजे** आहां ! मी आपल्या विरुद्ध पक्षाकडून, **शिष्टाईकरितां** आलों आहें. त्याचा जो निरोप असेल, तो अक्षरशः मी आपल्यास सांगितला नाहीं, तर मी अपराधी होईन. आतां, त्याप्रमाणें वागणें न वागणें हें आपल्या मर्जीचें काम आहे. पण एकाग्र ऐकून घेण्याचें सोडून व्यर्थ क्रोधवश होऊन आपल्या प्रतिष्ठितपणास आपणच आपल्या कृतीनें **कलंक** लागणें, हें चांगलें काय ? ही **राजसभेची** रीत नव्हे.

**मोह०**—बरोबर आहे. मातुश्री ! आपण, **आशादिकांस** घेऊन घरीं स्वस्थपणें बसा. सर्व हकीगत मी आतांच घेऊन आपल्याला कळवितों. राजपद्धतीची अमर्यादा करणें बरोबर नाहीं.

**प्रवृ०**—ठीक आहे. सर्व हकीगत सभाविसर्जन होतांच येऊन कळीव.

**मोह०**—ठीक आहे. त्याच प्रमाणें, मंत्रीजनहो ! तुम्ही ही त्याचें बोलणें संपेपर्यंत कांहीं बोलूं नका. तो पाहिजे तितकें बोलला, तरी राज्य आमच्या हातीं आहेना ?

**कामादि**—आज्ञा महाराज !

**मोह०**—होऊंद्या ! आणखी त्यांचा निरोप आहे ?

**विवेक**—ऐकावें महाराज ! कामक्रोधादि तुमचे बंधु, त्यांस ज्ञानाचें भाषण मुळींच प्रिय वाटत नाहीं. त्यांनींही बोधराजाचे आज्ञेंत वागावें.

**क्रोध**—काय, पुनः बोल ?

**विवेक**—महाराज ! आतांच आपण काय आज्ञा केली ?

**मोह**—अरे ! तुम्हांस एव्हां बोलूं नका ह्मटलें ना ? चालूं द्या.

**विवेक**—त्याचप्रमाणें **विषयांनीं** सुद्धां, विषयलोलुप्यता सोडून, सदा **तृप्त** असावें. तसेच तुमचे दुसरे सभासद **भ्रम** व अविवेक, यांस कामावरून **दूर** करावें. अज्ञानास हद्दपारी द्यावी !

**ज्ञान**—( दांत ओंठ चावून अस्तन्या वर करितो. )

**मोह**—( तोंच मोहराजानें डोळे वटारून पाहिल्याबरोबर चूप बसतो. )

**विवेक**—प्रपंचास **नीतिपं**क्तीस बसवावें. **दुर्बुद्धि** तर नगराबाहेर हांकून द्यावी, व तिला नगरांत येण्याची बंदी करावी. **सद्धर्म** वाढवून, अधर्मास थारा देऊं नये. **साधुसंतांची** शुद्ध भावानें **सेवा** करावी व त्यांचा अमृतप्राय उपदेश श्रवण करावा.

त्याचप्रमाणें, **आशा, तृष्णा, भ्रांति, कल्पना**दि, ज्या तुमच्या बहिणी, त्यांसही निरोप द्यावा. त्याचप्रमाणें सेनापति **मनो**वीर, यानें तुमचा आसरा सोडून, निरंतर **बोधराजासन्निध**, ज्ञानप्रधानाबरोबर बसून असावें. ह्मणजे त्यास **सुख**प्राप्ति होईल. नाहीं तर, त्यास तुमच्या सहवासानें **दुःखी** व्हावें लागेल. **ऐक्य**-भाव धरा, **भक्तिमार्गा**नें चाला. **ज्ञानास** मान देऊन, क्षेत्रक्रिया त्याच्या **संम**तीनें करा. ह्मणजे त्याच्यायोगें **साधुसंत** सुखी होतील.

असा **निवृत्ती** मातुश्रीचा आपल्यास निरोप आहे ! यावर आपलें काय ह्मणणें असेल, तें कळूं द्या. ह्मणजे, तें जाऊन त्यांस कळवितों.

**मोह**—काय ! झालें बोलून ?

**विवेक**—होय महाराज !

**मोह**—मलाही पहिल्यानें वाटलें होतें, कीं ज्याअर्थी तूं **शिष्टाई** सारख्या अत्यंत **नाजूक** कामावर नेमणूक होऊन आला आहेस, त्याअर्थी तुझ्या ठिकाणींही कांहीं **सारासार विचार** असून, बोलावें काय, व न बोलावें काय, हें अल्प प्रमाणानें तरी तुला समजत असेल, परंतु ती माझी समजूत खोटी ठरली !

**विवेक**—ती कशी ? मी तर योग्य तेंच बोललों आहें !

**मोह**—( रागावून ) **मूर्खा** ! आणि "**ती कशी**" ह्मणून विचारतोस ? तूं कोणासमोर भाषण करावयास आला आहेस याचें तुला **स्मरण**ही नसावें ? अरे ! आमच्या हातीं असलेलें राज्य, आह्मीं तुह्मां कालच्या पोरांच्या हवालीं करावें, व सारा जन्म तुमची **सेवा** करून, तुमचे **गुलाम** होऊन असावें. असेंचना तुमचें ह्मणणें ? वारे वः ! काय आला आहे **ब्रह्म**ज्ञान शिकवायला ! मी एकटा **मोह** किती पराक्रमी आहें. याची सर्वांना खात्री आहे. शिवाय, माझ्या **प्रवृत्ती मा**तुश्रीच्या मायाप्रभावाची काय ख्याति आहे, ती तुह्मां **नि**वृत्तीच्या पोरांना कोठून कळणार ? विषयसौख्य तर तुह्मां श्रमिष्टांच्या नशीबींच नाहीं !

**अहंकार**—कोणत्या मायेचा **पूत** आह्मांपासून राज्य हिसकावून घेतो पाहूं ! कुठली **निवृत्ति** आणि कुठला **विवेक** ! बस. आह्मी कोणालाही ओळखीत नाहीं. चल हो, चालता !

**अज्ञान**—महाराज ! आपण या मूढाचें काय ऐकत बसलां आहां ? आपण जसजसे याचें ऐकून घेत चाललां, तसतशी याची **जीभ** अधिक अधिक लांब होत चालली ! यास एकदम खेंचून काढला पाहिजे. आला आहे राज्य मागायला ! संभाळून बोलत जा, नाहीं तर याद राख.

**विवेक**—बाबांनो ? तुह्मी जरी आपल्या स्वभावानुसार रागावलां तरी मी तसा रागावणार नाहीं. तुह्मी आह्मी **बंधुवर्ग** असतां, परस्परांशीं असा द्वेषभाव ठेवणें बरोबर नाहीं. आपण आमचे **बंधु**, इतक्याचसाठीं **शिष्टाईचा** योग जुळून आला आहे.

इतर कोणी असता तर, शिष्टाईचा योगच येऊं दिला नसता, काय करावयाचें, तें **एकदम** केलें असतें !

हे **अज्ञान** व **अहंकार** तुमचे मुख्य प्रधान असल्यामुळें, तुह्मी सर्वार्थी त्यांच्या वचनानुसार चालत आहां ! पण येणेंकरून पुढें खाचित तुमचें **नुकसान** होणार आहे, हें पक्कें लक्षांत असूंद्या.

तुह्मी असा विचार करा, **अज्ञान** हा तर बोलून चालून **अज्ञान** ! त्यास ज्ञानाचा **लवलेशही** नाहीं. मग हा, आपल्यास जो हितोपदेश करणार तो त्याच्या नांवरूपास साजण्यासारखाच असावयाचा !

तसाच, हा **अंहकार** ! यास तर जगांत आपल्याशिवाय दुसरा कोणीच **थोर** वाटत नाहीं. असल हा विचारशून्य असून याच्याठायीं फक्त, ' **अहंपणा** ' मात्र भरपूर भरला आहे.

तसेंच, तुझे बंधु **कामक्रोधादि** ! ते तर सर्वांत मूर्ख ! ते तर प्रसंगीं तुलाही ऐकत नाहींत !

**विकल्पानें**, राजाच्या मनांत **निवृत्ति मातुश्री**बद्दल विनाकारण **किंतु** आणून दिल्यामुळें, **प्रवृ**त्ति व **निवृ**त्ति यांमध्यें वितुष्ट पडलें. हाही प्रकार बरा नाहीं !

**जीवेश्वर** तातमहाराजांनीं, **निवृत्तीस** हांकून देऊन, **प्रवृत्तीचाच** एकसारखा **नाद** धरिला आहे. हाही प्रकार साफ वाईट आहे. **आशा तृष्णादि** तुझ्या बाहिणी, ह्या तर साक्षात **राक्षसी** आहेत. त्यांनीं तर सर्व जगास ग्रासून टाकिलें आहे !

**शिव**—मुलींनो **लक्ष** आहेना ? पाहिलें का **विवेकाचें** भाषण कसें **युक्तिबाज** व **बोध**पर आहे तें ?

**राणी**—महाराज ! मला आनंदाच्या नुसत्य उकळ्याच येताहेत !

**तारा**—महाराज ! या विवकाचें भाषणोद्यान, उत्कृष्ट विचारकुसुमांनीं शोभायमान झाल्यामुळें, अंतःकरणास किती आल्हादकारक होत आहे ! मला तर तें एकसारखें ऐकतच राहावेंसें वाटतें.

**राजा**—तें तसेंच **मार्मिक** व **रसभ**रित आहे !

**शिव**—ऐका. तो पहा पुनः कांहीं बोलूं लागला !

**विवेक**—**मोह**राज ! तुह्मी अमुकच करावें, ह्मणून सांगण्याचा माझा अधिकार नाहीं. परंतु जें **खरें** आहे, तें आपल्या नजरेसमोर आणावें इतकाच माझा मानस आहे !

तुह्मांपैकीं कोणाही एकास **स्वहित** ह्मणून यत्किंचित्‌ही कळत नाहीं. हें तुमचें करणें, सर्वार्थी अगदीं **अन्याय्य** आहे. परंतु यास तुह्मी तरी काय करणार ? तुमचा जर **कालच विपरी**त आला असेल, तर तुम्हांस तरी **सद्‌बुद्धि**, कोठून होणार? कारण "**बुद्धिः-कर्मा**नुसारिणी ! " **दुर्जना**स **सद्‌बुद्धि**, व **सज्ज**नास **दुर्बुद्धि** सांगून कांहीं फायदा नाहीं ! तथापि, मी आपल्याला सांगतों कीं, तुह्मी अद्याप तरी सावध व्हा, कांहीं विचार करा व युद्धाचा प्रसंग आणूं नका.

आपण ज्यावेळीं, या **विवेकाचें** व **वैराग्या**चें अप्रतिम **शर-संधान** पहाल, व **ज्ञाना**चा दिव्य **खड्ग** तुमचे नेत्र दिपवून सोडील त्यावेळीं तुह्मांस या माझ्या शब्दांची **आठवण** होईल !

त्याप्रमाणें, **आनंद**, **पर**मार्थादि वीरपुरुषांचा प्रभाव, ज्यावेळीं आपण अवलोकन कराल, त्यावेळीं आपला सर्व पुरुषार्थ, पाण्यांतील ढेंकळाप्रमाणें पार विरघळून जाईल ! आणि त्यावेळीं मग तुह्मी आपण होऊन, **बोध**राजाची **सेवा** करण्यास स्वसंतोषानें कबूल होणार !

युद्धाचा मुद्दाम होऊन प्रसंग आणून, **रक्तपात** करण्याची, कोणा-सही वास्तविक आवड नसते, व ती असूंही नये, असें असतां, तुह्मांस **खूळ** लागल्यासारखे, युद्धप्रसंग बुद्धया आणून, आपल्या भावी दुःखास **आमंत्रणपत्रिका** पाठवीत आहां !

तुह्मी **विषयासक्त**तेनें धुंद झाल्यामुळें, तुह्मांस **स्वहित**, अमुक एका गोष्टीमध्यें आहे, ह्मणून कितीही **कंठशोष** करून सांगितलें, तरी त्याचा लवमात्रही उपयोग होईलसें वाटत नाहीं. तुह्मी माझी **वाचा** मात्र व्यर्थ व्यर्थ शिणवीत आहां! **धिःकार असो** तुह्मांला!

**मोह०**—( तरवार उपसून ) **मूर्खा** ! तुला येथें येऊन, आपली

चाचा शिणविण्यास, **आह्मी** का सांगितलें आहे ! तुझी जीभ हांहां ह्मणतां, फारच लांबवत चालली ? ये, तिला नीट धडा शिकवितों !

**क्रोध**—महाराज ! काय ह्या मूर्खाशीं, आपल्या अमोल्य वेळाचा दुरुपयोग करित बसला आहां ! हा येथें राजकचेरींत नुसता दूर उभा करण्याच्या लायकीचा नाहीं, मग भाषणास कोठचा ? याकरितां, त्यास हेंच बक्षीस दिलें पाहिजे.

( तरवार घेऊन त्याच्या आंगावर धांवतो. )

कायरे ए हरामखोरा ! जातोस कीं नाहीं, येथून तोंड घेऊन ? कीं करूं जमीनदोस्त, बोल लवकर !

**विवेक**—( स्वगत ) या तामसी विचारशून्य राक्षसाशीं आतां बोलून फायदा नाहीं. याकरितां ( उघड ) बाबांनो ! ठीक आहे ! तुह्मी मला घालविण्याचे पूर्वीं, मीच जातों. ( जातां जातां ) भोगा आतां मूर्खांनो ! आपलें कर्म ! ( जातो. )

**मोह**—चला, आपण ही हकीगत मातुश्रीस सांगूं.

( जातात. )

---

## प्रवेश ९ वा.

( **स्थळ**—निरंजन वन. )

**निवृत्ति**—माझा **विवेक** अद्याप कां बरें आला नाहीं ?

**ज्ञान**—मुली ! **शिष्टाईचा** कांहींही उपयोग नाहीं ह्मणून मी पूर्वीच समजून असल्यामुळें सर्व **सिद्धता** करून ठेवलीच आहे ! फक्त, **विवेक** येण्याची खोटी. कांहीं कम जास्त बोलणें चाललें असावें. ( न्याहाळून पहातो ) आला, पण आलासा वाटतो !

**निवृत्ति**—आला का ?

**बुद्धि**—होय बाईसाहेब ! **विवेकराजच** ते. हे पहा आले !

**विवेक**—( **माता**, मातामह व मातुळ यांस नमून ) आई ! **आजो**बांनी पूर्वी सांगितलें, तेंच ! मी किती किती गळा टाळा फो-

ढून घेतला, पण शुद्ध **काळेथर** पाषणावरील **बीजारोपण** ! शेवटीं मला तरवार उपसून मारावयासही धांवले !

**परमार्थ**—असें का ? ठीक आहे. आतां आपल्याकडे न्यायदृष्टयाहि किंचित् सुद्धां दोष राहिला नाहीं. कारण, आपण परमेश्वरास भिऊन जें करावयाचें तें केलें, तें त्यांना पसंत नाहीं, तर ते आतां आपल्या कर्माचें फळ भोगण्यास **पात्रच** आहेत. तात ! आतां युद्धाची सिद्धता जरूर झाली पाहिजे.

**ज्ञान**—बहुतेक योजना **आगाऊच** करून ठेवली आहे !

**पर०**—महाराज ! कसकशी योजना करून ठेविली आहे बरें ?

**ज्ञान**—ऐका:—

१ **सैन्याधिपत्य**, **परमार्थ** याजकडे द्यावयाचें.

२—**छत्रें—अहिंसा** हीच.

३—**चामरें—निरपेक्षता** हीच.

४—**अन्नपूर्णा—भक्ति, दया, क्षमा, शांति** !

५—**वाजंत्रें—सत्कीर्ति ध्वनि** !

**तारा**—अहाहा ! महाराज ! काय यांची ही युद्धसामग्री ! जेथें साक्षात् **दया**, **क्षमा**, **शांति**, तेथें **अन्नाची** तूट कशी असूं शकेल !

त्याचप्रमाणें **अहिंसा**, हें ज्याचें **छत्र** तेथें **निष्ठुरता** कोठली ! अहाहा ! तशींच **वाजंत्रें** कोणतीं ? तर ह्मणें **सत्कीर्तिध्वनि** ! धन्य धन्य आहे या **निवृतीची** !

**शिव**—मुलींनो ! आणि **प्रवृत्तीकडील** युद्धसामग्री ऐकिली का ?

**राणी**—काय बरें ?

**शिव**—ऐक:—

१—**सेनानायक—अहंपणा** !

२—**छत्रचामरें—अविवेक, असंतोष** !

३—**शस्त्रें—हिंसा** !

४—**वाजंत्रें—कलहगर्जना** !

५—**अन्नपूर्णा—आशा, तृष्णा**

**सर्व**—( खो खो हंसतात )

**तारा**—महाराज ! मला यांच्या **अन्नपूर्णा**बाईच्या नेमणु॰कीची फार मजा वाटते! ज्याठिकाणीं, **आशा, तृष्णा**; तेथें पोटांत दिवसभर **वणवा** पेटत असावयाचा ! मग **अन्नपूर्णा** हें नांव कसें यथार्थ शोभेल ! मला वाटतें युगांतरीं तरी यांचें पोट भरेल कीं काय कोण जाणें !

**राणी**—आणि **वाजंत्रें** ऐकिलीं का ?

**सर्व**—( हंसतात ).

**तारा**—दिवसभर **लट्टालट्टी** व **शंखध्वनि** ! उत्तम वाद्यें ! !

**राजा**—त्यांच्यावर आतां **अवदशाच** आली आहे, तेव्हां त्यांच्या घरीं अशींच **कुलक्षणें** दिसावयाचीं ! डोहाळ्यांवरून पोराचीं चिन्हें ! !

**शिव**—मुलींनो ! आतां पुढें मोठीच गम्मत आहे. लवकरच आतां युद्ध होईल. त्यांत उभयपक्षांकडील योद्धयांचीं भाषणें, परस्परांस उद्देशून होतील, तीं फारच लक्षपूर्वक ऐका. फारच उपदेशपर असतील.

**तारा**—महाराज ! आतांपर्यंत सर्व पात्रें पाहिलीं, तीं सर्व मला वाटतें, **सूक्ष्मदेहा**पैकींच आहेत !

**शिव**—होय. बहुतेक सर्व **सूक्ष्म** देहापैकींच. फक्त **अज्ञान** मात्र " **कारण देह** "

**राणी**—आणि बाकी सर्व **सूक्ष्म** देहापैकीं ?

**शिव**—**अर्धनारी नटेश्वर**, तोच हा **जीवे**श्वर राजा, असें तुह्मांस मागें सांगितलेंच आहे. त्या **जीवे**श्वराच्या, ह्मणजे **महामा**-येच्या, **ज्ञान**युक्त व **अज्ञान**युक्त, अशा दोन स्फूर्ति. **ज्ञान**स्फूर्ति तीच **निवृत्ति** असून, **अज्ञान**स्फूर्ति, तीच **प्रवृत्ति**. कोणतीही स्फूर्ति, **सूक्ष्म**देह, **कारण**देह, किंवा **महाकारण**देह यांपैकीं, **एक** असावयाची. वरील पात्रांपैकीं, **ज्ञान**, **निज**बोध वगैरे उच्च पात्रें, साक्षित्वानें असतां, **महा**कारण देहामध्येंही येतील.

**राणी**—हं समजलें! **ज्ञान निजबोध** हा **महाकारण**; **अज्ञान** हा **कारण**; व बाकी **सर्वही सूक्ष्म**देहापैकीं पात्रें आहेत. होयना!

**शिव**—होय. आतां ऐका पुढें. राजा! आमच्या **आदिमाये**च्या **क्रीडाभुव**नांतील **क्रीडा**, त्या ह्याच! व आपण पाहिलेलें हें संपूर्ण **जगत्**, हेंच तिचें **क्रीडामंदीर**! असो, चला आतां, ते उभय-पक्षीय वीर, रणांगणीं सज्ज झाले असतील. पाहण्यासारखी मोठी **गंमत** आहे. चला लवकर.

**तारा**—चला, पण ते आणखी कांहीं बोलताहेतसें वाटतें, तें ऐकूं चला.

**ज्ञान**—**वीरांनो**! **प्रवृत्ती**च्या सैनिकांशीं, आमच्याकडील योद्धयांनीं युद्ध करण्याचा अनुक्रम असा असावा.

**पर०**—कसा बरें?

**ज्ञान**—ऐका—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १—त्यांच्या | **कामा**शीं, | आमच्या | **वैराग्या**नें | लढावयाचें. |
| २— ,, | **क्रोधा**शीं, | ,, | **विचारा**नें | ,, |
| ३— ,, | **भ्रमा**दिकांशीं, | ,, | **विवेका**नें | ,, |
| ४— ,, | **प्रपंचा**शीं, | ,, | **परमार्था**नें | ,, |
| ५— ,, | **अज्ञानां**शीं | ,, | **ज्ञाना**नें | ,, |
| ६— ,, | **लोभा**शीं | ,, | **आनंदा**नें | ,, |
| ७— ,, | **मोहरा**जाशीं | ,, | **बोधराजा**नें | ,, |

याप्रमाणें युद्ध करावयाचें. याकरितां, शत्रुपक्षाकडील जो जो योद्धा **समरभूमी**वर उभा राहील, त्याजबरोबर त्यानें त्यानें युद्ध करावें.

**सर्व मुलें**—ठीक आहे. **आ**जोबा, आपली आज्ञा आह्मांस शिर-सामान्य आहे. आई येतों आतां! (तिला अनुक्रमें नमन करितात.)

**आई**—(सर्वांस कुरवाळून त्यांचें अवघ्राण करित्ये! डोळे भरून आलेले पाहून.)

**विवेक**—**आई**! तूं कांहीं काळजी करूं नको. आमची सर्व

जय्यत तयारी आहे. तुझ्या **चरणकृपें**करून, **यश** खात्रीनें **आह्मांस** मिळणार ! तूं भिऊं नको, आह्मीं लवकरच येतों.

**सर्व**—( पुनः नमन करितात. )

**निवृत्ति**—बाळांनो ! परमेश्वर तुमचें कल्याण करो ! **तात** महाराज ! मुलांना सांभाळा बरं का ? ( डोळे चोळते. )

**ज्ञान**—मुली ! तूं इतकी का वेडी आहेस ? चल जा तूं. कांहीं काळजी करूं नको ! **प्र**वृत्तिसह तिच्या सर्व पुत्रांस चतुर्भुज करून, येथें नाक घांसवून घेतों कीं नाहीं तें पहा !

**निजबोध**—आणि आई ! मी **बा**बांलाही तुझी **क्षमा** मागावयास लावणार !

**निवृ०**—( हंसते ) बरें महाराज, या !

**सर्व**—ठीक आहे. ( सर्व जातात. ) ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश १० वा.

**स्थळ**—समरभूमि. (उभय पक्ष आपापल्या योद्धयांसह, रंगभूमीच्या डाव्या व उजव्या बाजूस एकेका रांगेनें, समोरा समोर तोंडें करून बसले आहेत. तों पडदा उघडतो.)

**बोध०**—आजोबा ! काय हें प्रवृत्तिसैन्य विस्तीर्ण समुद्रासारखें पसरलें आहे !

**अविचार**—वीरहो ! पाहिलीत का एक गंमत ?

**काम**—कोणती बरें ?

**अविवेक**—अरे! त्या **बोध**राजाची मुद्रा पहा कशी, आमचा **सेना**सिंधु पाहून भयभीत झाली आहे ती !

**क्रोध**—अरे, ज्याला नुसतें आमच्या सैन्याकडे पाहण्याचेंही **धैर्य** नाहीं, तो आमचा **परा**भव करून आमच्यापासून **राज्य** हिसकावून घेणार ! पहा आतां त्यांची कशी **फ**टफजीती उडल ती !

**ज्ञान**—**नि**जबोधा ! कापूस किंवा तृण,यांचे ढिगाचे ढीग, पुष्कळ कोसपर्यंत एकसारखे रचून ठेवलेले असले, तरी त्यांना भस्म करून टाकण्याला, **अग्नि** कितीसा बरें लागतो ? हें सैन्य जरी पुष्कळसें

वाटलें, तरी त्यांत अर्थ कांहींच नाहीं. भिऊं नको. मी तुझा साह्यकर्ता असतां, तुला गडबडण्याचें कारण नाहीं. तो पहा, त्यांचा **कामवीर** आपल्या नांवास अनुरूप असा लवाजमा घेऊन, युद्धास उभा राहिला आहे. त्याबरोबर आपल्या **वैराग्यास** पाठविलें पाहिजे. बा **वैराग्या**, हो पुढें ! भिऊं नको ! **कडकडीत** वृत्तीनें वाग !

**वैराग्य**—ठीक आहे **आजोबा** ! याची मला मुळींच क्षिति वाटत नाहीं ! आपण स्वस्थ असावें महाराज ! ( **कामास** ) कसें काय ? बंधो **कामा** ? **शिष्टाई**निमित्त, मुद्दाम आमच्या **विवेकास** आपल्या दरबारीं पाठविलें असतां, शेवटीं तुह्मी युद्धाचा प्रसंग आणलाचना ? ठीक आहे, मर्जी तुमची ! अरे **ज्ञानशून्या** ! तूं आपल्याबरोबर ह्या सुंदर तरुणी, सुगंधित पुष्पहार व हा नृत्य गायनाचा थाट या युद्ध प्रसंगींही बाळगिला आहेस, यावरून तूं किती शुद्धींत आहेस, हें उघड दिसत आहे. अर्थात् ज्याला मुळीं स्वतःचीच शुद्धी नाहीं. तो दुसऱ्याची **कार्यस्मृति** काय राखणार व **जय** कसला मिळविणार याचें अनुमान सहज होण्यासारखें आहे !

**काम**—(स्त्रियांच्या खांद्यावर हात टाकलेला) जारे मूर्खा **वैराग्या** ! तूं मला अद्याप ओळखिलें नाहींस. माझे बाण किती **तीक्ष्ण** असतात, त्याचा तुला खुळ्याला अनुभव कसला असणार ? अरे !

१—**ब्रह्मादिक** देवही, मला थरथर कांपत असतात !

२—**चंद्राच्या** तोंडास **काळें** फांसणारा, हाच **बहाद्दर** !

३—**देवेंद्रालाही** भगांकित करणारा हाच **वीर** !

४—**विश्वामित्र** व **नारद** यांस फशीं पाडणारा **मीच** !

५—प्रत्यक्ष देवाधिदेव **शंकर** यांसही **भिल्लिणी**मागून नाचविणारा, मजवाचून दुसरा नव्हे !

६—खुद्द **श्रीकृष्णासही** सोळासहस्र स्त्रिया करविणारा **मीच** ! अशा मोठ्यामोठ्यासही मीं जर फशीं पाडलें आहे, तर मूर्खा ! तूं कालचा पोर, मजशीं युद्ध करण्यास धांवलास, त्याची तुला कांहींच लाज वाटत नाहीं ?

**वैराग्य**—हा **मूर्खा** ! **मतिमंदा** ! तूं आपला पराक्रम, फक्त खुळ्या भोळयांना दाखवावा ! मजसमोर तूं आपली प्रौढी मिरवूं नको. तूं जर इतका अजिंक्यतारा, तरः—

१—ब्राह्मणपुत्र **सनत्कुमार**, वायुसुत **हनुमान**, **भीष्म**, **शुकदेव**, इत्यादिकांपुढें तुझे ते तीक्ष्ण बाण कोणकोणता पराक्रम रडले ?

२ **श्रीशंकरास** तूं **भिल्लिणी**मागून नाचविल्याचें सांगतोस पण त्याच **शंकरांनीं** तुला जाळून **भस्म** करून **'अनंग'** हें नांव ध्यावयास लाविलें, तें नाहीं कोठें बोललास तें ? लाज नाहीं वाटत पुढें पुढें तोंड करायला ?

३—**संत**, **महंत**, **योगेश्वर**, **इंद्रियनिग्रही** वगैरे यांस तर तुझें नांवही नको !

अरे **नीचा** ! तूं आपला प्रभाव **बा**यकांत मिरवावा ! याप्रकारें तुझी क्षुल्लक योग्यता असतां, पुनः जास्त बोलून प्रतिष्ठित होऊं पाहतोस ? आज माझ्या सपाटयांत बरा सांपडलास ! तुझ्या मुसक्या बांधून **बो**धराजापाशीं घेऊन जातों पहा !

**काम**—( रागानें लाल होऊन ) काय ? तूं मला मुसक्या बांधून **बो**धराजापाशीं घेऊन जाणार ? जारे मूढा ! चल हो पुढें, आंगांत ताकद असेल, तर कर हे **पं**चशर सहन !

**वैराग्य**—ठीक आहे. येऊं द्या तुझे ते शर ! त्यांचा व सोबत तुझाही विध्वंस करून टाकतों पहा !

( दोघे दारुण युद्ध करितात. )

**शिव**—हे **पं**चबाण समजलेना कोणते ते ?

**तारा**—नाहीं महाराज !

**शिव**—अग **शब्द** **स्प**र्शादि **पं**चविषय, हेच त्याचे **बाण** ! दंपत्यामधील **स्त्री**पुरुषाचा **का**मोत्तेजक परस्पर **शब्द**, यांचा **स्पर्श**, त्यांचें **सुं**दर रूप, **चुं**बनादि **अमृ**तपान, व **सु**वासिक **तैला**भ्यंगादिकांचा **परि**मळ **हे**च ते **पं**चशर !

**राणी**—अस्सं ! मग या पंचबाणांनीं, चांगला विचारी पुरुषही क्षणभर गोंधळल्याशिवाय राहणार नाहीं. !

**शिव**—खरें आहे. ह्मणूनच तो पहा वैराग्यही एवढा कडकडीत महावीर असतांही, त्या त्याच्या बाणांनीं जरासा कमजोर झाला आहे ! असो, पुढें पहा !

**वैरा०**—( जरा चक्कर येऊन बसतो, तोंच आनंदपुत्र विचार पुढें होऊन )

**विचार**—बंधो ! वैराग्या, ( पाठीवरून हात फिरवून ) भिऊं नको ! या याच्या बाणांत काय अर्थ आहे ? मजकडे डोळे उघडून पहा ! ( किंचित् डोळे उघडून पाहतो तों ज्ञान धांवत जाऊन )

**ज्ञान**—बाळा, वैराग्या ! ( प्रेमालिंगन देऊन ) सावध हो ! गडबडूं नको ! हे बाण तुला भ्रमांत पाडण्यास मुळींच योग्य नाहींत ! ऊठ.

**वैराग्य**—अहाहा ! महाराज ! या माझ्या विचार बंधूचा, व लागलाच आपला नुस्ता स्पर्श होतांच, माझा सर्व शीण परिहार होऊन माझें बळ एकदम दुणावलें आहे ! आतां पहातों त्या कामाचें ! पांच सोडून पंचवीस बाण सोडूंदे !

**शिव**—मुलींनो ! याचा अर्थ कळला ना ! स्त्री किंवा पुरुष कामांध होऊन फशी पडतो,याचें कारण फक्त,विचार व ज्ञान यांपासून तो पराङ्मुख असतो, हेंच ! तो तसा नसेल, तर तो कामपाशांत सांपडावयाचाच नाहीं. हेंच पहा या वैराग्याचें प्रत्यक्ष उदाहरण ! त्यास त्या विचार व ज्ञानाचा नुसता स्पर्श झाल्याबरोबर, तो पहा कसा शुद्धीवर आला तो !

**राणी**—होय महाराज ! आलें लक्षांत !

**वैराग्य**—( कामास ) दुष्टा ! चल हो पुढें. नीचा ! मलाही पाशांत अडकविणेस पहात होतास काय ? आतां तुला दाखवितों माझा प्रभाव कसा आहे तो !

**काम**—ठीक आहे ! तुझ्यांत काय असेल तो पराक्रम येऊंद्या बाहेर ! ( दोघे तुंबळ युद्ध करून शेवटीं काम पाशबद्ध होतां होतां ) हे **क्रोधादि** बांधवहो ! मला तर यानें पराजित करून **बंदिवान** केलें. याचा तुह्मी तरी चांगला सूड उगवा !

**वैराग्य**—चांगला सूड उगवतात ! ( शेंडीस धरून वाकवतां वाकवतां ) धीर धर. (नोकरास) **संतू** !( सोबतच्या स्त्रिया पळतात).

**संतू**—जी सरकार ?

**वैराग्य**—अरे, **बुधाजी** कोठें आहे ?

**बुधाजी**—हा मी इकडे आहें सरकार !

**वैराग्य**—पहातां काय ! घाला यास बिड्या ! टाका नेऊन तुरं-गांत ! किल्ली कुलपें बरोबर लावा !

**दोघे**—आज्ञा सरकार ! (त्यास कैद करून दोघे घेऊन जातात).

**बोध**—वः शाबास ! माझ्या प्रिय बंधो **वैराग्या**, शाबास ! शत्रू पक्षाकडील **मुख्य वीर**, तूं आणून कारागृहांत तर सोडलासच ! ही गोष्ट फारच चांगली झाली ! आतां **प्रवृत्ति** पक्षाचें **निम्में** बळ क्षीण झालें असें समज ! जा तूं आतां जरा विश्रांती घे. तो पहा त्याचा दुसरा योद्धा **क्रोध**, रणांगणांत दांतओंठ चावून डोळे लाल करीत येतो आहे ! ( विचारास ) **विचारा** ! तयारी असूंद्या ! तो पहा कोण येतो आहे तो !

**विचार**—ठीक आहे महाराज ! येऊं दे. त्यालाही **कामाच्या** पंक्तीस नेऊन बसवितों ! आपण स्वस्थ असावें.

**मोह०**—( भयभीत ) प्रधानजी ! काय हें ! आमच्यांतला **मुख्य**वीर हा " **काम** " तोच आह्मांस सोडून, त्या निजबोधाच्या **बंदीखान्यां**त जाऊन पडला ! आतां कसें करावें !

**क्रोध**—महाराज ! आपण स्वस्थ असावें. त्याचा सूड मी उग-वितों. हा निघालों पहा ! **कामा**स तर मुक्त करून आणतोंच. पण **बोध ज्ञा**नादि सर्व पुढारी मंडळांस खेंचून आणतों पहा.

आपण तिळमात्र काळजी करूं नये ! ( वैराग्य समजून, विचारास ) कायरे, ए मूर्खा, **वैराग्या** ! माझ्या ज्येष्ठ बंधूस पाशबद्ध करून, आतां पळून जाऊं पाहतोस काय ? पण मी तुला तसा जाऊं देईन का ? तुला आतांच या जगांतून नाहींसा करितों ! ( त्यास बांधतो. तोंच **विचारानें वैराग्यास** आपल्या मागें घेऊन **क्रोधास** एक गचांडी देऊन मागें हटविलें ) अरे ! हा **वैराग्य** नव्हे ! हा त दुसराच कोणी चोर. कायरे ? कोण आहेस तूं ?

**विचार**—मी **आनंद** पुत्र " **विचार** " आहे. तुला **वैराग्यास** जें काय करावयाचें असेल तें **मला** कर. हा मी तयार आहें बोल, काय ह्मणणें आहे ?

**क्रोध**—मूर्खा ! तुला मध्यें पडण्यास कोणी सांगितलें ?

**विचार**—माझ्या **बंधुधर्मानें.**

**क्रोध**—मूर्खा ! ज्यानें माझ्या बंधूस कारागृहवासी केलें, त्याचा जीव घेणार !

**विचार**—**मूढ**मते ! जर तुझ्या अंगांत कांहीं पराक्रम असेल, व जीव घेणें असेल, तर आधीं **माझा** घे ! पण मला वाटत नाहीं कीं तुला तो घेतां येईल ! तो **देतां** मात्र स्वाभाविकपणें येईल !

**क्रोध—हा मूर्खा** ! तुला माझा पराक्रम मुळींच ठाऊक नाहीं ! आणि ह्मणूनच तूं असा भ्रमिष्टा सारखा बडबडत आहेस !

**विचार**—बरें, सांग पाहूं काय काय आजपर्यंत **ध्वज** लाविलेस ते !

**क्रोध**—ऐका:—

१—**गौत**माकडून आहिल्येस **शिळा** करविली, तो **मी** !

२—बृहस्पतीकडून **इंद्रास** योग्य **प्रायश्चित्त** देवविलें, तो **मीच** !

३—**दुर्वासा**कडून, **अंबरिषास शाप**, व **श्री**कृष्णास **संकट** घालविलें तो **मीच** !

४—**कपिल**मुनीकडून **सगर** भस्म करविले तो **मीच** !

५—**परशुरामाकडून** एकवीस वेळा पृथ्वि **निःक्षेत्र** करविली, तो **मीच** !

६—**शुक्राचार्यांकडून ययातीस** शाप देवविला, तो **मीच**!

७—**दशावतारांकडून असुर** संहार करविला, तो **मीच** !

८—फार तर काय, पण साक्षात् **शंकरासही** कल्पांतसमयीं चेतविणारा, **मीच** ! असें असतां, **विचारशून्या** ! आपल्या पराक्रमाची शेखी मिरवितोस ?

**विचार**—अरे, असत्यप्रिया **क्रोधा** ! एकसारखी आत्मस्तुतीची बडबड तूं लाविली असतां, व **मी** आत्मस्तुतीचें एक अक्षरही अद्याप उच्चारिलें नसतां, तो दोष **मला** लावीत आहेस, यावरून तुला खचित **सन्निपात** झाला असला पाहिजे ! अथवा, तो नसल्यास, या बडबडीवरून तुझी योग्यता सहज कळून येत आहे ! **मतिमंदा** ! तूं आपली प्रौढी मिरवितोस, पण तुला सुद्धां कोणीं कोणीं पायाखालीं तुडविलें आहे. तें मला माहित नाहीं ह्मणून समजतोस होय ? अरे !

१—तूं **अपवित्र**, ह्मणून **जमदग्नीनें** तुला **हांकून** लाविलें आहे!

२—**भीष्मास** तर, तुझें **नांवही** नको !

३—**धर्मास** तर तुझा **वाराही** सहन होत नाहीं !

४—**जनक** तर तुला **स्पर्श** करण्यासही कबूल नाहीं !

५—**जडभरत** तर, तुझ्या तोंडावर **नजरही** टाकीत नाहीं !

६—**शुकदेवाच्या** तर, तूं **कारागृहांतच** बसलेला !

७—**संतमहंतादि** तर, तुला पायाखालींच **तुडवीत** असतात !

या सर्व गोष्टी तुला माहित असतां, त्या मजपुढें छपवून, वरती आणखी फुशारकी मारतोस ? तूं जातीचा **दुर्जन मांग** ! कित्येक **साधु संत** तर, तुझा **विटाळ** होतांच, **सचैल स्नान** करतात !

**क्रोध**—ठीक आहे ! व्यर्थ बडबड करून काय ? चल हो पुढें !

**विचार**—संभाळ ! हा बाण सोडतों ! या एकाच बाणानें मूर्छित करून तुला तुझ्या **काम** बंधूच्या भेटीस पाठवितों पहा !

**क्रोध**—ठीक आहे. कोणास कोण पाठवितों पाहूं. हें **क्रूरता** नामक अस्त्र सोडतों आहें, सहन कर.

**विचार**—ठीक आहे. (दोघे लढतात, विचार पडतोसा दिसतांच जलदीनें '**शांति**' धांवत येते ).

**तारा**—महाराज ! ही खुबी काय ती मी सांगूं का ?

**शिव**—सांग पाहूं ?

**तारा**—**राग** हा कधीं कधीं **विचारासही** बाजूस टाकून, आपण पुढें होतो. अशा वेळीं '**शांति**' धरिली कीं झाला पराभव **क्रोधाचा** ! हीच ना ?

**शिव**—होय दुसरी काय ?

**शांति**—**बंधु विचारा** ! सावध हो ! सावध हो ! मी आपली शक्ति तुझ्यांत प्रेरित केली आहे. आतां, आह्मां **विचार शांति**-पुढें, त्या **क्रोधाचें** काय चालतें पाहूं !

**विचार**—अहाहा ! माझे लाडके सुभगिनी ! किती योग्य वेळीं धांवून आलीस हो ! ठीक आहे. जा तूं आतां. पाहतों तो **चोर** आतां कोठें आहे तो !

**क्रोध**—काय ! पळून वगैरे जाण्याचा विचार चालला आहे कीं काय ?

**विचार**—सांगतों कसला विचार चालला आहे तो ! हो सिद्ध ! ही पहा '**विवेचनाशक्ति**' प्रेरित करून, बाण सोडतों, सहन कर. ( युद्ध करतांना क्रोध मूर्च्छित होतो. ) **संतू** ! चल, **बुधाजीला** घेऊन ये !

**दोघें**—सरकार ! ( नमून )

**विचार**—करा चतुर्भुज ! घाला बिड्या ! जाऊं दे कारागृहांत. नीट बंदोबस्तीनें वागण्यास, अंधार कोठडीच्या अधिकाऱ्यास कळवा.

**दोघें**—आज्ञा सरकार ! ( त्यास बांधून नेतात. )

**ज्ञान**—काय, **विचारा** ! **विजय**श्रीनें कोणास माळ घातली ?

**विचार**—महाराज ! आपली **ज्ञानराजा**ची कृपा ज्याच्यावर

असेल, त्यासच ती माळ घालणार ! आपल्या आशीर्वादें करून, या क्रोधासारख्या माकडांस, जन्मभर बंदीवास देण्याचें सामर्थ्य, या **विचाराच्या** आंगीं आहे !

**बोध०**—ठीक आहे ! साऱ्या जगाला त्रास त्रासवून सोडणारे, जे मुख्य **दोन** शत्रु, ते दोन्ही हातापायांत लोहश्रृंखळा घालून बंदीखान्याची हवा खात तर पडलेच !

**ज्ञान**—ह्या सर्व शत्रूंस, तूर्त कसाईखान्यांतील गुरांप्रमाणें, **एका दावणीस** रांगेनें बांधून टाका ! ह्मणजे पुढें युद्धसमाप्तीनंतर काय तें योग्य विचारानें टरवूं. बरें **विवेका**! सावध रहा. तो पहा तिकडे " **भ्रम** " आवेशानें अस्तन्या वर करितो आहे ! हा पहा आलाच ! चल हो पुढें. सांभाळ !

**विवेक**—महाराज ! आपण काळजीच सोडा ! ( भ्रम येतो ).

**भ्रम**—राम राम ! ( मुजरा करून थट्टेनें ) तूंचना तो, **शिष्टाई** करायला आ ा होतास ? तुला त्याच दिवशीं **स्वर्ग** दाखविणार होतों; पण होतें तुझें आणखी थोडे दिवस आयुष्य ! ते दिवशीं आमच्या सभेंतून पळालास, ह्मणून सुटलास !

**विवेक**—खरेंच ! मी पळालों, ह्मणून त्या दिवशीं सुटलों ! पण आतां तरी मी तुझ्यापुढें उभा आहेना ? आतां कर काय तें !

**भ्रम**—हें पाहिलेंसका आधीं माझ्या हातांत काय आहे तें !

**विवेक**—( निरखून स्वगत ) अरे, यानें तर हें " **भ्रांति** " नामक शस्त्र माझा पराभव करण्याकरितां, धारण केलें आहे ! याच्या वर आपणही योग्य शस्त्राची योजना केली पाहिजे. ( विचार करून उघड ) ठीक आहे ! तुझ्या हातांतील त्या भिकार " **भ्रांति** " शस्त्रास मी पक्केपणीं ओळखतों ! आणि ह्मणूनच त्याजवरही योग्य मात्रा हातांत घेऊन उभा आहें !

**भ्रम**—तुझ्या शस्त्राचें नांव काय ?

**विवेक**—अरे तुझ्या त्या " **भ्रांति** " शस्त्राचा नायनाट कर०

णारें, हें ‘ **सावधान** ’ नामक शस्त्र आहे. आतां याच्यापुढें, तुझी ती ‘ **भ्रांति** ’ काय करते पाहूं ! चल हो सज्ज !

**भ्रम**—ठीक आहे. ( युद्ध करून **भ्रम** पडतो त्यास पकडून. )

**विवेक**—चल **संतू** ! **बुधा**जीला हाक मार !

**दोघें**—सरकार !

**विवेक**—चला ! करा याला कैद ! व त्याच दावणींत नेऊन बांधा !

**दोघें**—( बांधूं लागतात पण तो पुनः दांडगाई करितो. ) महाराज ! हा अद्याप चांगला ठेंचला पाहिजे ! याला अद्याप पोटभर औषध नाहीं मिळालें !

**विवेक**—अरे ! त्याच्यांत आतां मुळींच त्राण नाहीं. तो आपल्या नांवाप्रमाणें, उगीच हातपाय हालवीत आहे ! करितां त्यास " **युक्ति**" नाम शस्त्रानें वाटेवर आणून, मग नेऊन बांधून टाका !

**दोघें**—आज्ञा सरकार ! ( त्यास नेऊन बांधतात. )

( त्यावर दंभ, मद, मत्सरादि आले. त्यांनाहि विवेकानेंच पराभूत केलें. )

**ज्ञान**—( आनंदानें ) शाबास ! **विवेका** ! सर्व कि कोळ केरकचरा साफ बेणून जागा ऐस पैस करून सोडलीस ! शाबास ! तीं पहा ! **मोह** व **अज्ञान**'दिकांचीं तोंडें कशीं वाळून चिमणीसारखीं झालीं आहेत ! करूंद्या त्यांना काय तो विचार ! तोंपर्यंत, ये आपण इकडे स्वस्थ **बो**धराजाकडे बसूं !

**विवेक**—होय. चला महाराज! ( जाऊन बसतात ).

**मोहराज**—प्रधानजी ! आतां कसें करावें ? मुख्य मुख्य सर्व कामगार शत्रूंच्या कारागृहांत **बंदी**वान होऊन पडले ! प्रसंग मोठा बिकट आला ! आतां करावें तरी काय ?

**अज्ञान**—( सचिंत ) महाराज! हे **निवृ**त्तिपुत्र, एवढींशीं लहान लहान पोरें असल्यामुळें, त्यांजकडून असा **अद्वितीय** पराक्रम होईल, असें मुळींच वाटलें नव्हतें ! ( इतक्यांत प्रपंच येतो ).

**प्रपंच**—( नमन करून ) महाराज ! आपण सांप्रत बिकट प्रसंगीं असल्याची खबर मला पूर्वींच माझ्या कन्येनें कळवावयाची ! परंतु तिला अम्मळ आठवण **थोडी** असल्यामुळें, तिला तें करावयास सुचलें नाहीं ! तरी ती हुशार ! तिनें ही बातमी कळवितांच मी एकदम हा धांवत आलों ?

**अज्ञान**—शाबास **प्रपंच**राव ! प्रसंगाला जर एकमेकांस मदत द्यावयाची नाहीं, तर तो **शरीरसं**बंध कशाचा ? पक्वान्नाचे टोप खाली करण्यास ? आपण आपल्या जामातांच्या कार्यास या प्रसंगीं धांवून आलां, हें आपलें करणें खरोखर प्रशंसनीय आहे !

**प्रपंच**—असो ! पण आतां कशी काय खबर आहे ?

**अज्ञान**—खबर काय विचारूं नका ! आमच्याकडील झाडून बहुतेक वीं योद्धे, तिकडे त्यांच्या तुरंगांत अडकून पडले !

**प्रपंच**—हात्तेच्या ! मी असतों, तर तुमच्या सैन्यापैकीं एकाच्याही नुसत्या **केशा**सही धक्का लागूं दिला नसता ! असो,(मोहास) महाराज ! आपण बिलकूल कांहीं, काळजी करूं नये ! मी किती प्रतापी आहें, याचा सर्व **जगास** चांगला अनुभव आहे ! आपल्याकडील एकूणएक बंदीवान होऊन पडलेले कामगार, सोडवून तर आणतोंच ! पण शत्रू **बोधरा**जासही, महाराजांच्या कारागृहांत आणून गच्च करून सोडितों, तर होय ह्मणा !

**मोह**—**मामा**साहेब ! आपण या संकटसमयीं, फारच मोठी बाजू राखिली ! हे आपले मोठे आभार आहेत ! असो,आपण मोठमोठ्यांनाही आपल्या पाशांत पुरातन कालापासून गुंतवून सोडिलें आहे, तेव्हां या **अर्भक पोरां**स, आपण **सहज** जिंकून त्यास जेरीस आणाल, अशी माझी पक्की खात्री आहे. या दुर्धर प्रसंगीं माझें मन गोंधळल्यामुळें, मला आपल्याला बोलावण्याचेंही भान राहिलें नाहीं. असो, चला तर ! तो पहा त्याचा योद्धा **परमार्थ**, तयारींत आहेसा दिसतो.

**ज्ञान**—परमार्था ! पाहिलास का, तो **ह्यातारा** आतां कोण आला तो ! **मोहराजा**चा **सासरा**, त्याचें नांव **प्रपंच** ! तो मोठा **धांद**ली मनुष्य आहे. त्याजबरोबर टक्कर देण्यास तुजवांचून दुसऱ्यास साधावयाचें नाहीं.

**पर०**—ठीक आहे. तो **प्रपंच** कितीही वयोवृद्ध असला, तरी तेथें **ज्ञान** तितकेंच ! याकरितां आपण यत्किंचितही डगमगूं नका. ठीक आहे, येतों तर. ( नमन करून जातो. )

**प्रपंच**—( परमार्थ रणांगणांत येतोसें पाहून ) बरें आहे महाराज ! आपण स्वस्थ असावें. मी लागलाच त्यास योग्य शासन करून येतों ! ( युद्धार्थ समरांगणीं येतो ).

**पर०**—वडील बुवा ! या दुष्ट **कामक्रोधा**दिकांच्या पंक्तीस बसून, तुरुंगवासांत दिवस काढण्याची ही कुबुद्धि, तुह्मांस ह्यातारपणीं कोठून बरें उद्भवली ? अद्याप सावध व्हा ! व **बोधराजा**चें राज्य, त्यांच्या हवालीं करण्यास, आपल्या **जांवईबुवास** समजावून सांगा !

**प्रपंच—परमार्था** ! मीही तुला तुझा हितचिंतक या नात्यानें असें सांगतों कीं, आमचे **काम**क्रोधादि सर्व कामगार, बऱ्या गोष्टीनें सोडून देऊन, आमच्या **मोह**राजास शरण ये नाहीं तर याचा परिणाम फार वाईट होईल. हा नांवाचा ‘ **प्रपंच** ’ आहे ! हा माझा सैन्यसमूह पाहिलासना ?

**परमार्थ**—अरे ! जा, तूं वयोमानाप्रमाणें कांहीं तरी **ज्ञानसंचय** केला असशील, ह्मणून तुझ्याशीं बहुमानानें बोलण्यास जात होतों ! पण व्यर्थरे व्यर्थ आपलें आयुष्य गमावलेंस ! असो. आपला सैन्यसमूह पाहण्यास मला सांगतोस, पण तुझा सैन्यसमूह ह्मणजे काय, तर **असंख्य असत्कृत्यें** ! त्यांचें एका बाणानें **भस्म** करून टाकीन !

**प्रपंच**—तें विसरच आतां ! पण हीं माझीं **छत्रचामरें** पाहिलीं क ?

**परमार्थ**—हो, हीं दिसताहेत हीं! वर वेलबुट्टीदार अक्षरें तरी किती मोहक केलीं आहेत! '**अविचार**'! धिःकार असो तुला. व्यर्थरे व्यर्थ जन्मलास! तुला आपलें हित, कांहींच कळत नाहीं! शिवाय, पुनः पुनः बोलण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं?

**प्रपंच**—पण हीं शस्त्रें पाहिलींस का, कशीं लखलखताहेत तीं?

**परमार्थ**—अरे, तूं खरोखरच **निर्लज्ज**! आग लाव तुझ्या त्या शस्त्रांना! अरे, '**परद्वेष**' हींच ज्याचीं दिव्य शस्त्रें. व '**अपशब्द**' हींच ज्याचीं दिव्य **वाद्यें**, त्याचें मुखावलोकनही करूं नये!

**प्रपंच**—परमार्थी, तोंड आटोप! तूं अद्याप मला ओळखिलें नाहींस. ऐक!

१—अरे, मला जो जो ह्मणून जिंकीन ह्मणतो, तो तो माझ्या भवपाशांत अडकल्याशिवाय रहात नाहीं.

२ मला भिऊन कित्येक तर गिरिकंदरांतही पळून गेले आहेत! तरी सुद्धां मी त्यांस सोडिलें नाहीं! जेथें तेथें त्यांस अडकवून धरिलें आहे! कारण त्या अरण्यवासांत सुद्धां '**माझा मठ, माझा आश्रम, माझा दंड, माझा कमंडलु**; माझें **आसन**, माझी **लंगोटी**; हा तरी **जप**, निदानपक्षीं त्याजकडून करवितोंच करवितों!

३—**निःसंग, अजरामर, निराहारी** जरी झाले, तरी ते सर्व **माझ्या** स्वाधीन!

४—**यज्ञ, दान, पुराण, व्युत्पत्ति, व्रतोद्यापन** करणारेही माझ्या आधीन!

५—तूं हा चमत्कार पहा कीं, **निवृत्तीस** घर ना दार होऊन, तुझीं सर्व देशोधडीस लागलां, याचें कारण काय बरें? फक्त **माझा दरारा**!

६—या **प्रवृत्तीस** तरी आधार **माझाच** आहे! सकल जनांस **माझ्यामुळें** गुंतावें लागत आहे!

७—**मोहास** तरी एवढें सामर्थ्य दुसरें कोणामुळें?

८—**काम क्रोधास** तरी, आधारभूत स्थळ **मीच !**

९—**आशा तृष्णा**दि, **माझ्यामुळेंच** दृग्गोचर होतात !

१०—संपूर्ण **चराचर मला** वश असून, तुला कोणी विचारित सुद्धां नाहीं !

११—मी अद्भुतप्रकारें विस्तारलों असून, मज **प्रपंचास** जिंकणारा एकही वीर या पृथ्वीवर नाहीं !

१२—तुह्मीं तर बिचारीं गरीब पोरें ! तुह्मांस तर क्षणांत गट्ट करून टाकीन ! इत्यादि गोष्टींवरून माझा पराक्रम किती आहे, याची कल्पना सहज होण्यासारखी आहे, ह्मणून ह्मणतों. तुह्मांस प्राणाची आशा असल्यास, तुह्मीं आमच्या **मो**हराजास **शरण** या !

**परमार्थ**—( हंसून ) **थेरड्या !** व्यर्थ बडबड कशास ! तुझें सैन्य तुझी शस्त्रें, तुझीं छत्र चामरें, व तुझा वाद्यध्वनि पाहून, तुझ्या पराक्रमाची योग्य कल्पना कोणाही सूज्ञ मनुष्यास तेव्हांच होईल! तूं आपल्याला **अजिंक्य** समजतोस, पण तुझ्याही छातीवर पाय देणारे, जगांत कोणी तरी आहेतच आहेत ! ऐक.

१—सकल **संत**सज्जनांस तुझी संगतिही नको !

२—**सन्याशी, पर**महंस, हे तर तुझ्या तोंडावर **नजर**ही टाकण्यास कबूल नाहींत !

३—**योग**श्वरांनीं तर तुला **का**सावीसच केलें आहे !

४—हीं **पुराणें**च पहा तुझी पदोपदीं **निंदा** करीत असून, सर्व लोकांस तुझे अवगुण कथन करित आहेत !

५—तुला दंडावयासाठीं. नाना जन नाना यत्न करीत आहेत! कोणी **श्री**गुरुभजन, कोणी **तीर्थाटणें**, कोणी **प**तिव्रतानेम, कोणी **सहज** विचार, कोणी **कीर्तनें**, कोणी **श्रवण**, या प्रमाणें प्रयत्नें चालविले आहेत ! असें असतां, हे **म**तिमंदा ! तुला बोलण्यास कांहीच **लाज** वाटत नाहीं ?

**प्रपंच—पर**मार्था ! तूं स्वपक्षसिद्धतेकरितां जे आधार दिलेस त्यांच्यायोगें उलट **मा**झ्यांच बोलण्याला बळकटी येत आहे. माझी

पिडा होऊं नये, ह्मणून जे जन यत्न करितात, ते मला **भितात,** ह्मणूनच यत्न करितात हें उघड आहे !

**पर०**—एखादा कर्मठ **ब्राह्मण**, रस्त्यानें येणारा **अतिशूद्र** पाहून बाजूनें जरा **दुरून** जाऊं लागला तर, त्याला तो **भ्यालाच** ह्मणावयाचा ! अरे **निर्लज्जा** !

१—**भक्ति भावा**समोर तर, तूं नुसता **उभा** राहण्यासही योग्य नाहींस !

२—**विवेक, वैराग्य, विचार,** हे तर वारंवार तुला **दंडीत**च असतात !

३—**वेदांती** तर " **प्रपंच** मिथ्या " असें वरचेवर सिद्ध करित असतात ! असें असतां, पुनः दिमाख दाखवितोस ?

**प्रपंच—परमार्था**! आतां हा असा बडबडत राहून, कालाचा व्यर्थ दुर्व्यय कां करित आहेस ? आतां हा पहा ! या बाणावर ' **आधि व्याधि** ' शक्तींचें अभिमंत्रण करून, हा सोडतों पहा ! सहन कर.

**पर०**—ठीक आहे. ( दोघें युद्ध करतात. व **पर**मार्थ मूर्च्छित होण्याच्या बेतांत येतो, तोंच, )

**दया-क्षमा**—( धांवत येतात, व त्यास सावध करण्याचा प्रयत्न करितात. ) **मामा ! मामा !** सावध व्हा ! सावध व्हा ! ( वारा घालतात.

**पर०**—( सावध होऊन ) अहाहा ! धन्य आहें मी ! मुलींनो ! तुह्मीं अगदीं ऐन प्रसंगीं येऊन, मला सावध केलें, याबद्दल मी आभारीं आहें ! या प्रपंचाब्धीस, सदा **आधिव्याधीं**चीच भरती याव-याची ! पण त्या त्या प्रसंगा, **दया, क्षमा**रूपी **पात्र**च, होईल तितकें मोठें **विस्तृत** केलें पाहिजे ! हें तुह्मीं आपल्या नांवांवरून, मला सुचाविलें ! याबद्दल **आनंद** होत आहे ! जा, तुह्मीं आतां ! कांहीं काळजी करूं नका ! ह्या **प्रपंचास** हा पहा, मी आतांच चतुर्भुज करून आणतों. ( त्या जातात. )

**प्रपंच**—काय **परमार्था** ! कोठें गेला तुझा **वेदांत** ? कसा आहे तडाका ?

**पर०**—**प्रपंचा** ! इतक्यांतच चढूं नकोस ? तुझ्या शक्तीचा साफ निःपात करण्याकरितां, हें पहा ' **ऐक्य** ' नामें **चक्र** सोडीत आहें ! सांभाळ !

**प्रपंच**—ठीक आहे. ( दोघे युद्ध करतात; प्रपंच पडतो. )

**पर०**—बांधारे यास, आणि घेऊन चला !( संतु, बुधाजी त्यास नेतात. )

**बोध**—वाहवा ! ( हातांत हात घालून ) **परमार्थ मामा** ! आपण तर आज फारच मोठी कामगिरी बजाविली ! सर्व दुःखांचा जो केवळ **सागर** तोच अगस्तीरूपानें आपण आज **बंदी**वान करून सोडिला ! आपल्याला फारच परिश्रम झाले ! अरे, संतू ! मामांना वारा घाल !

**संतू**—जी सरकार ! ( वारा घालतो ).

**परमार्थ**—नाहीं **बोध**राज ! परिश्रम कशाचे ? **तातमहाराजांची** कृपा असल्यास, सर्व ताप क्षणांत भस्म होतात !

**बोध**—पण मामा ! ही ओरड कशाची ?

**परमार्थ**—महाराज ! ही **मोह**राजाच्या बाजूची ! त्यांच्याकडील संपूर्ण योद्धे आह्मी बंदीवान करून टाकल्यामुळें, जो तिकडे सर्वच **हाहाःकार** चालला आहे त्याची ही ओरड !

**विवेक**—ठीक झालें ! त्यांना मी आरंभीं किती समजावून सांगितलें ! मुळीं कानावर घेत नव्हते ! आतां तरी शिक्याच्या मापानें ठरलें कीं नाहीं ?

**बोध**—बरें **आजोबा** ! आतां आपणच **स्वतः** पुढें रणांगणांत गेलें पाहिजे असें वाटतें, कारण तो पहा शत्रूच्या बाजूस ' **अहंकार** ' अज्ञानासह उभा आहे ! त्याच्या पारिपत्यास **आपणच** पाहिजे आहां !

**ज्ञान**—ठीक आहे. आपण स्वस्थ असावें.

**तारा**—महाराज ! या एकट्या **ज्ञाना**बरोबर युद्ध करण्यास, हे **अहंकार** व **अज्ञान**, असे दोघे वीर येण्याचें कारण काय ?

**शिव**—अग अज्ञान व अहंकार हीं पात्रें, साधारणतः एकच आहेत. आत्मस्वरूपास जी प्रथम **स्फूर्ति** ' **मी** ' अशी झाली, तेंच ' अज्ञान ' !

**तारा**—आणि अहंकार कोणता ?

**शिव**—अग ! तीच स्फूर्ति फार उन्मत्त होऊन, **बे**फाम झाली ह्मणजे तोच **अहंकार** !

**राणी**—ह्मणजे, दोन्हीं एकच आहेत!

**शिव**—होय. ह्मणजे, **अज्ञान** हें **अहंकाराचें मू**ळरूप आहे ! समजलीस ?

**तारा**—होय महाराज ! आलें लक्षांत.

**शिव**—राजा लक्ष आहेना ? आतां पुढें, या **ज्ञाना**चें व **अज्ञा**-नाचें भाषण, फारच विचार करण्यासारखें होईल. तिघजणही एकाग्रतेनें ऐका. सर्व काय तें यांतच आहे.

**तिघें**—आज्ञा ! महाराज, ते पहा ! रणांगणांत **ज्ञान** व **अहंकार** सज्ज होऊन राहिले आहेत !

**शिव**—होय. पहा आतां नीट लक्षपूर्वक ऐका.

**अहंकार**—अरे ए ! थेरड्या, **ज्ञाना** ! तूं विचार न करितां, मज अहंकाराशीं येऊन भिडला आहेस ! परंतु ध्यानांत ठेव, तुला एका क्षणांत या रणभूमीवरून **पळवीन** ! ऐक.

१—अरे ! **त्रिगुणांचा** विस्तार मीच केला असून, **सत्व**, **रज** व **तम**, या तीन रज्जूंना अनुक्रमें **विष्णु**, **ब्रह्मदेव** व **शंकर** या देवतात्रयांस मीच फटावून टाकिलें **आहे** !

२—**त्रिगुणा**त्मक जो हा **प्रपंच**, त्याचाही विस्तार कर-णारा, **मीच** !

३—संपूर्ण **चराचर** पिंडब्रह्मांड यांचा विस्तार करणारा **मीच** !

४—सृष्टींतील सर्व अहंकारात्मक **जीवजंतु**, **अज्ञानरूप** असून, त्यांच्याठायीं उद्भवणारे सर्व विचार, फक्त **म**जमुळें चालले आहेत ! कारण **आत्मा** तर निर्गुण आहे ! ह्मणून सर्व **सृष्टिव्यवहार** चालविणारा **मी** आहें.

५—पूर्वीचे थोर थोर आचार्य, एक वाक्यतेनें ह्मणतात कीं, '**अहंकारासारखा शत्रु नाहीं**' व ही गोष्ट तुझ्याही दृष्टोत्पत्तीस आली असली पाहिजे, कारण तूं '**ज्ञानदीप**' आहेस.

६—तुला, "**ज्ञान**" हें नांव तरी, **मज**मुळेंच प्राप्त झालें आहे

७—या संपूर्ण विश्वाच्या अंतःकरणांत, अगदीं **मुळा**शीं, दृढतेनें **मी** जाऊन बसलों आहें ! तुज **ज्ञा**नास, कोणाच्या अंतः-करणांत जागा मिळाली तर, क्वचितच मिळेल. नाहीं तर **सर्व सत्ता माझी** आहे !

८—तूं **मला** भिऊन, **साधुसं**तांच्या **हृदय**कपाटांत जाऊन दडून बसला आहेस ! पण, प्रसंगीं त्यांची सुद्धां मी भीड-मर्यादा ठेवीत नाहीं !

असें असतां, तुह्मी विनाकारण युद्धाची हांव मनांत धरली आहे ! अर्थात् "**ज्ञान**" हें नांव, तुला **व्यर्थ** आहे !

**ज्ञान**—अंहकारा ! तूं आपल्या सामर्थ्याचा व्यर्थ **फुगारा** करून दाखवित आहेस, पण तो सर्व **नाश**वंत आहे; हें तूं जाणत नाहींस.

१—अरे, तुह्मां **अज्ञान** अहंकाराचा जो विस्तार, तेंच **संसार मूळ** आहे !

२—**विषयांचा** तरी **बडीवार**, तुमच्याच संगतीनें माजला आहे !

३—जे कोणी, **धर्म, याग-व्रतादि** करितात, त्यांस जर का तुमचा जरासा **स्पर्श** होईल, तर तें सर्व सुकृत **व्यर्थ** जातें ! असे तुह्मीं दुष्ट आहां !

४—तशा प्रकारचा मी **ज्ञान** नव्हें. मी तिन्ही लोकांस **पावन** असून, जगाला **उद्धारक, मीच** आहें !

५—ज्यास माझी **सं**गति असते, त्यास **सं**सारबाधा होत नाहीं. तो सदा **आ**नंदी व **तृप्त** असतो ! तो तुह्मां उभयतांस मानीत सुद्धां नाहीं, इतकेंच नव्हे पण तुमचा मनापासून **नि**षेध करितो ! शिवाय, माझ्या सहवासानें, तो पक्का **ज्ञानी** बनल्यामुळें, त्याला **स्वर्गप्राप्ति,** अगर **सायुज्य**मुक्ति सहज मिळते !

६—अरे, **चारी** देह, व **चारी** अवस्था यांस जाणणारा **मीच** असून, **चारी** मुक्तींचा संपादकही **मीच** आहें !

७—**सत्संगप्राप्ति,** व **भूत**दयाप्रीति हीं मजमुळेंच जन्मास येतात !

८—**भक्ति** व **भाव** हीं मजमुळेंच **वृद्धिं**गत होत असतात !

९—सकल भजनाचें **मूळ** मीच असून, “ **आ**त्मज्ञान ” ह्मणून जें काय, तें **मज**पासूनच उद्भवतें !

१०—**स्फूर्ति** ह्मणून जी काय उद्भवते, ती **मज**पासूनच असून, कीर्तनाचा **सौरस्य सुखानु**भव, माझ्यामुळेंच प्राप्त होतो !

११—**भा**व, **वै**राग्य,**वि**वेक, **वि**चार हे सर्व मजमुळेंच **समर्थ** झाले असून, **नि**जबोध, **नव**भक्ति, **स**त्क्रिया, **सु**बुद्धि, **निवृ**त्ति, **द**या, **क्ष**मा, **शां**ति, **की**र्ति, **स्व**धर्म **विश्रां**ति, **आ**नंद, **पर**मार्थ, **धै**र्य, **सारा**सार **वि**चार, इत्याद्यनेक गुण, माझ्यापासूनच उद्भवले आहेत !

१२—विमल **आ**त्मचर्चा, व **कवि**त्वोत्पत्ति हीं माझ्यामुळेंच जन्मास आलीं असून, **ऋषि, मुनि, भाग**वत, **संत, म**हंत, **वि**रक्त, हे सर्व, माझ्यामुळेंच **समर्थ** झाले आहेत !

१३—**वाल्या**कोळी, हा जगप्रसिद्ध **पा**पात्मा, पण **ऋ**षिपद पावून, जगद्वंद्य होऊन बसला, तो माझ्याच आश्रयानें !

१४—**ध्रुव, प्र**ल्हाद, **ना**रद, **व्यास,** इत्यादिकांस जो आज **मा**न आहे, तो **मज**मुळेंच !

१५—**अर्जु**नास प्रथम गोत्रवधाची **भीति** वाटत होती, पण

माझी प्राप्ति होतांच त्याचा सर्व **भ्रम** दूर होऊन, तो युद्धाला उद्युक्त झाला !

१६—मज **ज्ञाना**शीं **सम**, असें दुसरें **कां**हींहि नाहीं !

१७—ज्याच्या अंतःकरणांत **मी** नाहीं, त्यालाच तुह्मीं गांठावें. पण जेथें माझी **वस्ती** आहे, तेथें तुमचा **रि**घाव होतोसा पहा बरें ?

अशाप्रकारें तुह्मी दोघेही **नीच** असतां, पुनः मजपुढें व्यर्थ आत्मस्तुतीची बडबड करीत बसण्यास,तुह्मांला लाज कशी वाटत नाहीं? तुह्मी प्रत्यहीं **कु**कर्म करित असता; ह्मणून तुह्मांस योग्य शासन देण्याकरितांच मी आलों आहें.

**अहं०**—ठीक आहे. तुझा सर्व **गर्व** परिहार करण्याकरितां, ही पहा तुजवर “ **अहंकार शक्ति** ” सोडीत आहें ! सहन कर.

**अज्ञान**—थांब ! अहंकारा, मीही तुला सहाय करितों.

**ज्ञान**—ठीक आहे. येऊं द्या ! तुमची **अहंताशक्ति**, ही पहा या **ज्ञानाग्नीनें** एका निमिषांत **भस्म** करून टाकतों ! ( लढतात )

( अहंकार पडतो. संतू बांधून नेतो. )

( स्वगत जयमुद्रेनें ) ठीक आहे ! **अहंकार** तर उडालाच ! अर्थात् वृक्षाचा सर्व **शा**कार छाटून टाकल्यावर, त्याचें **मूळ** हाणून पाडण्यास कितीसा वेळ ! आतां हा **अज्ञान**, **पां**गळ्यासारखा झाला आहे ! यालाही गति दिली पाहिजे !

**अज्ञान**—( स्वगत ) हायरे माझ्या जिवलग **अहंकारा** ! इतर अधिकाऱ्यांप्रमाणें, तूंही मला सोडून गेलास ना ? अरे, तूं तर माझे **हात**पाय ! यामुळें, हातपाय तोडलेल्या प्राण्याची जी दशा, तीच आतां माझी झाली आहे ! तुझ्याशिवाय मी असून नसल्यासारखाच झालों आहें. ( उघड ) असो, पण आतां मला कोण साह्य करणार ?

**ज्ञान**—( त्वेषानें ) तुला साह्य पाहिजे इतकेंच ना ? हें पहा **मूर्ति**मंत **ज्ञानशस्त्र**, तुझ्या साह्यास पाठवून देत आहें. हें पहा

आलें ! ( ज्ञानशस्त्र त्याच्या मस्तकावर हांणून त्यास मूर्छित करितो. हा प्रकार पाहून मोहराज मूर्छित होतो. )

**मोह**—( स्वगत ) अरेरे ! आतां थोड्या वेळापूर्वी, माझा केवढा मोठा सेनासमुदाय होता ! या बाजूस उभें राहण्यासही जागा नव्हती ! पण आतां ही सर्व बाजू **साफ** मोकळी होऊन गेली ! किती मानमानकरी, मला फुलांत घालून राखण्यास, मज-भोवतीं तयार होते ! पण, आतां हा मी येथें एकटा पडलों आहें ! शत्रूनें सर्वप्रकारें मला हतवीर्य करून टाकलें ! हाय ! हाय ! देवा आतां मी काय करूं ? आह्मीं आजपर्यंत जें थोरपण मिळविलें होतें, तें सर्व फुकट गेलें ! जगांत आमचा फार मोठा बडेजाव होता, पण या **निवृत्तिपुत्रांनीं** तो मोडून, त्याचा चकाचूर करून टाकला ! हीं निवृत्तींचीं पोरें लहान अर्भक, यांच्या हस्तें काय होणार ! असें आजपर्यंत समजत होतों, परंतु, तो समज चुकीचा ! त्यांनीं प्रत्यक्ष ज्ञानास मुख्य प्रधानकी दिल्यामुळें, आह्मांस लढाईत पराभूत व्हावें लागलें. ही गोष्ट आह्मांस आतां फारच लाजिरवाणी झाली ! जगांत तोंड दाखविण्यासही मार्ग नाहींसा झाला ! आतां **बोध-राजास** शरण गेल्याशिवाय, तरणोपाय होण्यास दुसरा मार्गच राहिला नाहीं ! ( पुनः विचार करून वीरश्रीनें. )

तरी पण धैर्य धरून संकटसमय निभावण्याचा प्रयत्न करणें, हें खऱ्या **वीरा**चें काम आहे.भिऊन गर्भगळित होणें हें **वीर**लक्षण नव्हे! शत्रूबरोबर चार हात करून, आपलाही प्रभाव त्यास दाखविणें, जरूर आहे. आणि निरुपायच झाला, तर मग पुढें पाहूं. ( दंड ठोकून उघड. )

१—हा मूर्खा ! **बोधा** ! तूं युद्धाची आटाआट व्यर्थ करीत आहेस. मज **मोहा**चा प्रभाव तूं जाणत नाहींस !

२—या सर्व विश्वजनांचा **प्रेमा म**जवर आहे !

३—सारें त्रैलोक्य, माझीच इच्छा करीत आहें, तुझी कोणास गरजही नाहीं !

४—कदाचित्, कोणीं एखाद्या भिकाऱ्यानें तुझी आठवण केली तर केली !

५—एखादा, गृहस्थाश्रम करून राहणारा सुखवस्तु **प्राणी** तर तुझी **आ**ठवणसुद्धां करींत नाहीं ! ज्या कोणास खरा स्वाभिमान व कुलाभिमान असेल, किंवा जो एकांत राहून मनाची वृत्ति साफ सोडून दृढ मति धारण करणारा, असाच जर कोणी **अभागी** असेल किंवा ज्याला साधुसंगति, हरिभक्ति, अखंड जपमाळ किंवा ज्याला आध्यात्म यांची खरी प्रीति असेल, असाच पुरुष मात्र तुला कदाचित् स्मरतो !

६—बरें, जो तुझी आठवण करितो, तो तरी खाऊन पिऊन आपला सुखी आहे; अशी तरी आशा आहे का ? मुळींच नाहीं. तो आपला सदा **दरिद्री** असावयाचा ! त्याला जगांत कोणीच मानीत नाहीं !

७—आम्हांस **ज्ञान**प्राप्ति, तुमचेच संगतीनें होते, ही गोष्ट खरी, पण विषयाचे स्वभाव मजपासून वाढावयाचे असल्यामुळें, मी त्रिभुवनासही व्यापून उरलों आहें !

८—अरे मूढा ! मज **मोहापुढें** कुठलें **ज्ञान** ! कुठलें **ध्यान**! कोठचा **विचार** व कोठचा **आचार** ! व **देव** तरी कोठचा ?

९—**संसार खोटा** असें मजपुढें म्हणणारा कोण आहे पाहूं बरें ? तुझ्या त्या **वैराग्य-विवेकास** तर, मजपुढें उभें राहण्याचें सामर्थ्य नाहीं.

१०—**पर**मार्थ तरी मजपुढें काय करणार ? तुझा तो **ब्रह्मा**-नंद व **निज**बोध, यांस तरी कोठें मी विचारतों आहें ?

११—माझ्यापुढें तुमची ती **निवृत्ति,भक्ति, दया, क्षमा, शांति, स्फूर्ति** व **युक्ति** वगैरे काय टिकाव धरणार ? तुमचे ते **होम, व्रत, याग, साधु, तीर्थ, भावार्थ** हीं सर्व मजपुढें व्यर्थ आहेत !

१२—तसेंच, **सेवा**, **भूतदया**, **धर्म**, **ब्रह्मज्ञान**, **अध्यात्म** व **जप** हीं सर्व मजपुढें केवळ **वाय**फळ आहेत !

१३—अरे ! जगाचें **मूळ** मीच आहें, मायेचें **महाबळ** मीच आहें, त्रिगुणांचें **महाबळ** मीच, **घरदार व्यवहार शरीरसंबंध**, **विषयप्रीति**, हीं सर्व **मजमुळेंच**. !

१४—नाना **श्रृंगारभोग**, **प्रीति**, **प्रेम** हीं सर्व मजमुळेंच उद्भवलीं आहेत ! **विषयाचें** वारेंही तुझ्या नशिबीं नाहीं ! मग तुला भोग कोठून मिळणार ?आणि सर्व जग तुझा कंटाळा करतें यांचें कारणंही **हेंच**!

१५—मी आहें, ह्मणूनच जगांत **आप्त**जनांचें **लालन पालन** चाललें आहे, मी नसल्यास, **आई** तरी मुलाला विचारती काय ?

१६—" **मी** " व " **माझें** " हे शब्द जगांत मजमुळेंच ऐकूं येतात !

१७—तुमचे मनांत यत्किंचितहि **भेद**बुद्धि नाहीं. ह्मणूनच तुह्मांस सगळेंच **ब्रह्म**रूप भासतें ! सदा सर्वकाळ, **आत्मबुद्धि** निश्चळतेनें ठेवून, **मी** व **माझें** साफ सोडून दिल्यास, तुह्मीं राज्य कसलें करणार ?

१८—प्रापंचिक जनांची तुमचे ठायीं प्रीति नाहीं, याचें कारण ही हेंच. ह्मणून तुह्मीं आतां **राज्य-तृष्णा** सोडा !

१९—तुमचा तो **विवेक**, **वैराग्य**, व **बोध** आमच्या तर दृष्टीस नको. **ज्ञाना**चा तर आह्मांस कंटाळाच येतो ! **परमार्थास** जवळ सुद्धां **बोलावूं नये** असें वाटतें ! **आनंदाचें** तर, आह्मांस **वारें**ही नको ! **धीर** व **हर्ष** हे तर आह्मांस भिऊनच **दूर** पळतात. तुमच्या त्या **दया**, **क्षमादिकांस** आह्मीं तर हद्दपारीच दिली आहे !

२०—आह्मांस आपल्या आमच्या **प्रवृत्ति**, **आशा-तृष्णादि** फार आवडतात. **काम-क्रोधादि** तुह्मांस अप्रिय ! पण आमचे तर ते

**प्रा**णसे वाटतात. त्याचप्रमाणें, आमच्या बाजूस जो **दुर्बुद्धि**, आशा, **भ्रां**ति, इत्यादिकांचा एकसारखा **प्रेम**कलह चालून परस्परांची पाठ थोपटण्याची क्षणोक्षणीं सुसंधि येते, तो प्रकार तर आह्मांस फारच प्रेक्षणीय भासतो !

२१—तुमच्याकडे तर, पाहावें तेव्हां सर्वत्र सामसूम ! कोठें **जप**माळा, कोठें **अ**रण्यवास, कोठें **दृढा**सन, कोठें **प्रा**णायाम, कोठें **सोहं**भाव यांतच सदा गर्क !

२२—या लौकिकाच्या भीतिस्तव, तुह्मी **मौ**न्य धरून बसलां आहां ! **श**ब्द व **निः**शब्दही, तुह्मी साफ **वर्जि**ला आहे !

२३—" सर्व विषयांचें **गो**डपण हेंच **चै**तन्य **धन** आहे, " व " चैतन्य हें **निर्गु**णही नाहीं व **स**गुणही नाहीं " हीच काय ती तुमची समजूत !

२४—मज **मो**हाला सर्वजन **सो**डून देतील, व तुला **ज्ञा**नाला-धरतील, असें कधींही होणें शक्य नाहीं !

२५—शिवाय, तुह्मीं **निर्गु**ण ! **नाम**रूपातीत ! तेव्हां तुह्मांस राजा कोण ह्मणेल ? या करितां, तुह्मी ही **राज्य**तृष्णा सोडा. व घरची वाट धरा !

या गोष्टीस कबूल असाल तर तुह्मांस **जीव**दान देतों !

**बोध—मोहा !** तुझीही सर्व बडबड आतां पुरे कर. ती **बा**यफळ आहे ! हें मी बरोबर जाणत असल्यामुळें, तुला मुळींच **उत्त**र द्यावयाचें नाहीं ! ( आनंदानें डुलतो. हीं संधी पाहून. )

**मोह**—वाहावा ! ही संधी चांगली आहे ! हा यावेळीं धड शुद्धीवर नाहीं. तेव्हां इतक्यांतच आपलें कार्य साधून घेतलें पाहिजे. ( त्यावर **मो**हनअस्त्र सोडतो. )

**बोध—मोहा** ! मला साक्षीरूपानें, सर्व कांहीं तत्काळ समजत असतें. याकरितां, तुझ्या या कपटाचा, मजपुढें कांहींच उपयोग व्हावयाचा नाहीं. हें तूं पक्कें समज ! हें तुझें " **मोहन** " नामें **अस्त्र**

सर्वजगास **मोहून टाकणारें** आहे, ही गोष्ट खरी. पण माझ्या नुसत्या दृष्टिप्रभावानें त्याची काय स्थिति होते पहा !

( अस्त्राकडे नुसतें पहातो, तों तें भस्म होतें. )

**शिव**—तारे, मुली राज्ञी ! लक्ष आहे ना ? पाहिलाका निजबोधाचा प्रभाव ? " **सर्वंखल्विदंब्रह्म** " या माहावाक्याचा **पूर्ण स्वानुभव**, असा आधिकार उत्पन्न करितो !

**तारा**—खरें आहे महाराज! **अग्नीपुढें कापूस** काय करणार ?

**राणी**—या मोहामुळेंच संपूर्ण सृष्टीची उभारणी झाली आहे. ही गोष्ट खरी. पण तो मोह ह्मणजे, केवळ चकचकीत जिल्हई दिलेल्या रौप्यपात्रावरील, नानारंगांच्या बाह्यवर्ती वस्तूंची **छायाच** ह्मणावयाची ! रौप्यपात्रावरील प्रभा जरी वस्तूंच्या रंगानुरूप, तांबडी, हिरवी भासली, तरी, तो शुद्ध **भ्रम** आहे ! वरील तबकडीचा मूळवर्ण पांढरा शुभ्र हेंच खरें.

**शिव**—मुलींनों ! तुह्मांस हें **नाटक** सुरू करण्यापूर्वी, मी ज्या **तीन** गोष्टी सांगितल्या आहेत, त्या अंतःकरणांतून लवमात्र ढळूं देऊं नका. त्यांतच सगळें **साराचेंही सार** आहे ! बरें, ऐका पुढें.

**मोह**—( आश्चर्यानें थक्क होतो. ) अबबब ! काय हा चमत्कार ! माझी एवढी प्रचंड शक्ति असतां, **बोधाच्या** नुसत्या दृष्टिप्रभावानें, ती नुसती **भस्म** होऊन गेली ! यावरून, हा खचीत खरा **पुरुषार्थी** आहे ! खरोखर यांत तिलप्राय संशय नाहीं ! आतां मला वाटतें, या बोधालाच शरण गेलें पाहिजे. मला त्या **कर्कशा प्रवृत्ति मातुश्रीस " आई "** ह्मणणें सुद्धां, अयोग्य वाटूं लागलें ! **त्या चांडाळ अज्ञानास**. आणून, **आमच्या घरांत** भरल्यादिवसांपासून, आमच्या **सर्व सौख्याचा ऱ्हास होत** चालला! **खोटें नाणें** किती दिवस चालणार ? या दुष्ट बुद्धिमुळें, हे सर्व **आपण** खड्डयांत पडून, **मलाही** आंत ओढून घेतलें ! आतां यास **शरण गेल्या** शिवाय, तरणोपायाचा दुसरा **मार्गच** राहिला नाहीं ! करितां तसें करूं. ( धांवत जाऊन, **बोधराजाचे पाय** घट्ट धरतो.)

**बोध**—अरे ! हें काय, हें काय ! ऊठ, ऊठ !

**मोह**—नाहीं महाराज ! मी उठावयाचा नाहीं ! मला अभय दिल्याशिवाय, मी उठावयाचा नाहीं !

**बोध**—अरे, पण काय, तें तर समजूं दे !

**मोह**—तें कांहीं नाहीं महाराज ! मला आपलें अभय पाहिजे.

**बोध**—( विचार करून ) ठीक आहे ! जर तुझें हें वर्तन निष्कपट असेल, तर तुला अभय आहे ! उठ ! सांग काय तें !

**मोह**—( उठून हात जोडतो ) महाराज ! मी आपल्यास अनन्यभावें शरण आहें ! माझे प्राण रक्षण करा, मी आपली सेवा करण्यास तयार आहें ! मी ज्ञानाची अवज्ञा केली, हा मजकडून फारच मोठा प्रमाद घडला ! यानंतर त्याची कधींच अवज्ञा करणार नाहीं. निवृत्ति मातुश्रीशीं विरुद्धपणा करणार नाहीं ! आमच्या त्या थेरड्या अज्ञान आजोबाचे पांढरे पाय घरास लागल्यापासून, आमची ती प्रवृत्तिमातुश्री, मूर्तिमंत कर्कशा बनली ! आतां सर्वांचेच डोळे उघडले ! हा पहा, मी आपल्या चरणीं नाक घांसतो ! माझ्या सर्वापराधांची क्षमा करून, मला पदरांत ध्यावें !

**बोध**—सत्यमेव जयते ! असें ह्मणून स्वानंदानें डुलतो !

**मोह**—हें काय ! अरे हा तर पुनःही स्तब्ध होऊन डोलूं लागला आतां, माझी दाद कोण घेतो ?

**ज्ञान**—ठीक आहे ! आलासका शुद्धीवर ! जिरालाना सगळा मद ? कीं आहे अद्याप कांहीं शिल्लक ?

**मोह**—महाराज ! आधींच जखम झालेल्या जागीं, तापवून लाल केलेल्या आणखी डागण्या देऊं नका !

**ज्ञान**—ठीक आहे ! संतू !

**संतू**—जी सरकार !

**ज्ञान**—बुधाजीस बोलवून, हा एक अमोल्यमणी, त्या माळेंत गुंफा !

**दीर्घ**—आज्ञा महाराज ! ( मोहास ) चलावें, महाराज ! या असे इकडून !

**मोह**—( ज्ञानास ) पण महाराज ! मी **शरणांगत** आहें. **क्षमा** मागतों !

**ज्ञान**—ठीक आहे ! '**शरणांगतास मरण नाहीं**,' हा न्याय आमच्या प्रभूंस पूर्णपणें अवगत आहे. करितां, उदईक याचा योग्य विचार होईल !

**दीर्घ**—( मोहास ) चलावें महाराज ! ( त्यास घेऊन जातात. )

**ज्ञान**—अरे ? हे **बोध**राज तर स्वस्वरूपस्थ झाले ! मुलांनों ! चला आपणही आत्ममंदिरांत क्षणभर **विश्राम** पावूं ! आपणा सर्वांस युद्धामुळें श्रम फार झाले आहेत !

**सर्व**—चलावें महाराज ! ( सर्व जातात. ) ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ११ वा.

**स्थळ**—बोधराज कचेरी—प्रवृत्ति, निवृत्ति कुटुंब परिवार.

**निवृ०**—( स्वगत ) अहाहा ! आज माझ्या आनंदास पारावारच नाहींसा झाला ! माझें सर्व साम्राज्य माझ्या हातीं आलें ! आतां सर्वतोपरी मी निष्कंटक झाल्यें !

( उघड आनंदानें ) **तात**महाराज, आपल्या कृपेनें माझें माझ्या आपत्यांसह सर्व पारतंत्र्य दूर होऊन सर्वतोपरी आह्मीं सुखी झालों ! आतां मला वाटतें, पुढील व्यवस्था अशी झाली पाहिजे:–

**ज्ञान**—कशी बरें ?

**निवृ०**—ऐकावें महाराज !

१—आमचें राज्य आमच्या हस्तगत झाल्याबद्दल, गांवभर **द्वंडी** पिटवावी !

२—**स्वानुभवाचीं गुढ्या तोरणें** उभारावीं !

३—**प्रवृत्ति पुत्रांनीं, मत्पुत्रांचे गुलाम** व्हावें !

४—स्वतः **प्रवृत्ति** ही, माझी **दासी व्हावी.** व
५—सर्व **प्रवृत्ति**कन्या, **कारागृहवासिनी** व्हाव्या !
यावर आणखी आपणही विचार करून ठरवावें !

**ज्ञान**—ठीक आहे. तू सुचविलेल्या पांचही गोष्टी योग्य आहेत. करितां, त्याप्रमाणेंच हुकूम देववितों. विवेका, इकडे ये. जा ! आणि **प्रवृति**राणी, व तिची संतति, यांस वरील पांचही अटी कबूल आहेत कीं काय, तें विचारून ये. सर्वांस कबूल असल्यास त्यांस आतांच राजकचेरींत आणवून, त्यांस कांहीं **अनुकूल** असा न्याय करावयाचा; व कबूल नसल्यास त्या सर्वांस जन्मयात्रेंतून मुक्त केलें पाहिजे ! करितां, या दोहोंतून कोणती गोष्ट त्यांना कबूल आहे, तें लवकर विचारून ये.

**विवे०**—आज्ञा महाराज ! ( जातो. )

**पर०—तात** महाराज ! या बाबतींत माझें मत असें आहे कीं, **प्रवृत्तिपुत्र** हे, बोलून चालून :अज्ञान **शि**क्षेंत वर्तन करणारे ! अर्थात् त्यांच्याठायीं अविचार उद्भवणें, साहाजिक आहे. तो त्यांचा **प्र**धान बंदीवान झाल्याबरोबर आतां बहुतेक सर्वांचे डोळे उघडले आहेत !

शिवाय दुसरें कारण असें कीं, **प्रवृत्ति**पुत्र हे, यांचे **सावत्र** बंधूच आहेत. कोणी परकी नव्हत. करितां, यांस ठार मारून टाकूं नये, असें मला वाटतें,

**शिव**—मलींनो ! या बोलण्याचा अर्थ कळला ना ?

**तारा**—होय महाराज ! ज्याप्रमाणें डोळा **डा**वा असो कीं, उजवा असो, पण **दृष्टि एक,** किंवा **ओंठ, खा**लचा असो कीं **वर**चा असो, पण **शब्द** एक. त्याचप्रमाणें विचारतरंग **बरे** असोत, कीं, **वाईट** असोत, पण त्यांचें **मूळरूप** एकच आहे. अर्थात् ब्रह्मरूपापासून कांहीं **सु**विचार व **कु**विचार उठावयाचेच ! समुद्रावर असुकच प्रकारच्या लाटा याव्यात म्हणून कोठें नियम आहे ? **अज्ञान** व **ज्ञान** हीं एका परब्रह्माच्याच पोटचीं पोरें !

**शिव**—बरोबर ! ज्याप्रमाणें समुद्रावरील लाटा; बंद करणें दुर्घट त्याचप्रमाणें मूळ ब्रह्मरूपापासून बरे वाईट विचार उठावयाचेच. असो, पुढें पहा !

**ज्ञान—परमार्थी** ! तुझें ह्मणणें तुझ्या स्वभावानुसार योग्यच आहे. पण या कामीं, तुझें व माझें मत काय कामाचें ? मुख्य मत मुळीं **निवृत्ती**चें आहे. खरें ना मुली ?

**निवृ०**—तातमहाराज ! त्यांस ठार मारून मला काय मिळणार ? ते माझा व माझ्या मुलांचा **हक्क** कबूल करून, आमचे आज्ञाधारक होतील, असा पक्का बंदोबस्त होत असेल, तर त्यांस ठार न मारतां, फक्त बंदीवानच करावें ( इतक्यांत **विवेक** प्रवृत्ति–परिवाराकडील निरोप घेऊन येतो. )

**विवेक**—आई ! आपण केलेल्या ठरावाप्रमाणें, सर्व एकूण एक मंडळी वागण्याला कबूल आहे.

**निवृ०**—होय का ? आतां कबूल न होऊन काय करतील ?

**ज्ञान**—ठीक आहे. मुली, **निवृत्ति** ! आतां या बाबतींत माझें मत असें आहे.

१—या **प्रवृत्ति**पुत्रांस देहांतप्रायश्चित्त देणें, हें जसें गैर-वाजवी आहे, त्याचप्रमाणें, त्यांस आजन्म **अंधारकोठ**डींत कोंडून ठेवणें हेंही न्याय्य व सोईचें नाहीं.

**निवृ०**—तें कसें तातमहाराज ?

**ज्ञान**—मुली ! यास दुसरें दूरचें उदाहरण देण्यापेक्षां खुद्द तुमचाच दृष्टान्त देऊन सांगतों.

ज्याप्रमाणें " **तरवार** " ही भयकृत खरी, पण शत्रूच्या ठि-काणीं ती उत्तम उपयोगीं पडते, त्याचप्रमाणें, हे **प्रवृत्तिपुत्र वा**-ईट खरे, पण त्यांची योजना नीट केल्यास, त्यांजपासून उत्तम कार्य करून घेतां येईल.

**निवृत्ति**—महाराज ! याचा जरा आणखीं खुलासा व्हावा.

**ज्ञान**—ठीक आहे ! ऐक. फक्त षड्रिपू बद्दलच उदाहरणार्थ सांगतों.

१—**काम** याचा उपयोग **संभोगसुखार्थ** करण्या ऐवजीं, **भगवत्प्राप्त्यर्थ** करावा.

२—**क्रोध**—याचा उपयोग लौकिकवस्तु प्राप्त न झाल्यास करण्याऐवजीं, **भगवत्प्राप्ति** न झाल्यास करून, ईर्षेनें अधिकाधिक भक्तिमार्गास लागावें.

३—**लोभ**—याचा उपयोग, द्रव्यादि **ना**शवंत वस्तूंकारितां करण्याऐवजीं **भ**गवन्नाम महात्म्यार्थ करावा.

४—**मोह**—याचा उपयोग, वैषयिकसुखार्थ वेडा होण्यापेक्षां भगवद्ध्यानधारणेनें वेडा होऊन, प्रापंचिक कृत्यांचा विसर पडण्याच्या कामीं करावा.

५—**मद**—द्रव्य, अधिकार, सामर्थ्यादिकानें उन्मत्त न होतां भगवन्नामसंकीर्तनानें **म**दांध व्हावें.

६—**मत्सर**—याचा उपयोग, परजनांचा हेवा करण्याच्या ऐवजीं, भगवत्प्राप्तीस विघ्न करणारी जी **प्रवृ**त्ति—संतती, याशी मत्सर करावा.

याचप्रमाणें, **आ**शातृष्णादि—नाशवंत वस्तूंची आशा करण्याऐवजीं, **अ**नादि, **अ**नंत, व **अ**जरामर वस्तु, जें **पर**ब्रह्म त्याच्या ठायीं याचा उपयोग करावा.

**निवृ०**—पण, **अज्ञा**नाचा या कामीं कसा उपयोग करावयाचा ? मला वाटतें, **अज्ञान** या कामीं साफ निरुपयोगी आहे.

**ज्ञान**—नाहीं. या जगांत निरुपयोगी असें कांहींच नाहीं ! प्रत्यक्ष ' **विष** ' सुद्धां, योजक वैद्य अमृत बनावितो, ह्मणजे रसायन क्रियांच्या योगें, त्याचा विषारीपणा घालवून, त्यापासून **भस्म, मात्रा** वगैरे करून, मरणोन्मुख अशा कित्येक रोग्यांस तो वांचवितो ! तात्पर्य, **योजक** पाहिजे.

**निवृत्ति**—पण **अज्ञा**नाची योजना या मार्गांत कशीं करावयाची.

**ज्ञान**—ऐक. **अज्ञाना**चा गुण **विस्मरण.** जगांत याचा अम्मल आत्मस्वरूपाच्या ठायीं होत असल्यामुळें, बहुतेक सर्व या

भगवत्प्राप्तीच्या वाटेस मुळींच येत नसतात. करितां, आपण मुळीं प्रथमतःच उलटी किल्ली फिरवावी! ह्मणजे याची योजना, प्रवृत्तीच्याच ठिकाणीं कायमची करून टाकावी.

**निवृ०**—पण, तातमहाराज! या **प्रवृ**त्तीच्या पुत्रांचा आह्मांस कोठें कसा उपयोग झाला आहे?

**ज्ञान**—मुली! आह्मांसही यांनीं **स**हाय्यच केलें आहे! यांचें साह्य नसतें तर आमचें **सा**म्राज्य झालेंच नसतें!

**निवृ०**—तें कसें?

**ज्ञान**—ऐक. तुह्मांस **जी**वेश्वरानें हांकून लावलें. यामुळें तुह्मीं **नि**रंजनवनांत वास करून राहिलां पण तुमच्या ठिकाणीं जर **'काम'** नसता, तर **प्रवृ**तीकडून राज्य हिसकावून घ्यावें, व त्याठिकाणीं **निवृ**त्तीच्या साम्राज्याची **स्था**पना करावी, असें तुह्मांस वाटलें असतें काय?

**निवृ०**—समजलों, तातमहाराज! प्रसंगविशेषीं त्यांचेंही थोड थोडें सहाय्य माझ्या कामीं पाहिजेच.

**ज्ञान**—मात्र, फक्त कारणापुरतें. **त्यां**च्या ताब्यांत आपण सांपडतां नये. त्यांस आपल्या ताब्यांत ठेविलें पाहिजेत. आणि ह्मणूनच, **प्रवृ**त्तिपुत्रांस **ठार मारूं न**ये, व **मो**कळेही सोडून उपयोगी नाहीं. याकरितां, त्यांस नजरकैदेंतच बंदोबस्तानें ठेवावें. कारणपरत्वें बाहेर काढावें.

**निवृ०**—तातमहाराज! आपण वरील तो ठराव विचारपूर्वकच केलेला असावयाचा. करितां, मला तो मान्य आहे.

**ज्ञान**—संतू! जारे, त्या बंदीवानांस आहेत तशाच स्थितींत इकडे घेऊन या!

**संतु, बुधाजी**—आज्ञा सरकार! (जातात व सर्व बंदीवानांची माळाची माळ, दोघें दोन बाजूस राहून, बंदोबस्तानें आणतात).

**संतु**—(पुढें होऊन मुजरा करून) महाराज! सर्व बंदीवान आणलेले आहेत!

**ज्ञान**—ठीक आहे ! **प्रवृत्ति**, व **प्रवृत्तिपुत्र** हो ! तुह्मांस आमच्या ' **विवेका** ' करवीं पाठविलेला निरोप पोंचलाना ?

**प्रवृ०**—महाराज ! निरोप समजला ! व आह्मांस सर्व अटी कबूल असल्याबद्दल जबाबही लागलाच त्यास आह्मीं दिलेला आहे !

**मोह**—( आईस वेडावून ) ' लागलाच दिला आहे ! ' आणि त्याचवेळीं हा विचार केला असतास तर ? हें असें हातांत **लोह**श्रृंखळा घालून शिपाई प्यांद्यां समोर, खालीं मान घालून, उभें राहण्याचा प्रसंग आला असता काय ?

**प्रवृ०**—बाळा **मोहा**! बरोबर आहे तुझें ह्मणणें ! पण आमच्या कपाळीं जर हे सोहाळे करूनच घ्यावयाचें लिहिलेले होते, तर त्यावेळीं कशी वासना होईल ?

**ज्ञान**—बरोबर आहे ! तें जाऊंद्या आतां ! ' बुद्धिःकर्मानुसारिणी ' हेंच खरें ! पण **मोहा** ! तुला सर्व गोष्टी कबूल आहेतना ?

**मोह**—महाराज ! कबूल ह्मणून काय विचारतां ? मी आपल्या परिवारासह, आपल्यास शरण आहें ! ( नाक घांसतो. )

**ज्ञान**—ठीक आहे ! सरकारी ठराव असा झाला आहे:-

१—तुमचा प्रधान **अज्ञान**, यास हद्दपारीची शिक्षा दिलेली आहे. करितां, त्यानें याक्षणीं, येथून कायमचें निघून जावें. ही शिक्षा नको असल्यास, देहांत प्रायश्चित्त भोगण्यास सिद्ध व्हावें.

२—तुमच्या बहिणी, **आशा तृष्णादि**, ह्या मुक्त असण्यास बिलकूलच योग्य नाहींत. करितां, त्यांस आजन्म **कारागृह**वास ठरविला आहे.

३—तुमचे बंधु, **काम क्रो**धादि, यांस तुमच्यासह, फक्त तुमच्या **शर**णागतत्वाकडे लक्ष देऊन, नजर कैदेचीच **साधी** शिक्षा दिलेली आहे.

४—**प्रवृ**त्तीनें, **निवृ**त्तीचा **दासी**पणा पतकरून असावें !

५—तुह्मां सर्वांस, तुमच्या अपराधाच्या मानानें, " **देहांत शिक्षा** " ही कमीच. पण महाराजसरकारनीं दयाळु होऊन, तुह्मांस

ह्या फारच हलक्या शिक्षा ठरविल्या आहेत. करितां, तुह्मीं सर्वांनीं महाराजांशीं इत्युत्तर कृतज्ञताबुद्धीनें असावें. याप्रमाणें सरकारी ठराव झालेला आहे. हा तुह्मांपैकीं कोणास कबूल नसल्यास, त्यानें तसें कळवावें.

**अज्ञा०**—( हात जोडून) महाराज ! मी आपला हद्दपारच होतों.

**क्रोध**—( रागानें ) महाराज ! याला **ठार**च मारणें योग्य ! ही आमची दुर्दशा यानेंच केली आहे !

**ज्ञान**—तें आतां असो ! कोण कोणाची **दुर्द**शाही करीत नाहीं, व प्रगतिही करीत नाहीं. ज्याची तोच करून घेतो. असो ! अज्ञाना, बोल पुढें !

**अज्ञा०**—आज्ञा महाराज ! ज्या ठिकाणीं आपला यत्किंचितही वास सुद्धां नसेल, अशा ठिकाणीं मी आपला गिरिकंदरांतील दिवसाच्या **अंधःकारा**प्रमाणें राहीन.

**प्रवृ०**—महाराज ! मी या **अज्ञा**नाच्या संगतीनें अशी **स्मृ**तिभ्रम झाल्यें ! आतां **ज्ञानमहा**राजांनीं माझे चांगले डोळे उघडले ! याकरितां, मी **निवृ**त्तिबाईसाहेबांची सेवा करून राहण्यास, आनंदानें कबूल आहें. **प**हिला मान **त्यां**चा आहे, हें मी प्रांजळपणें कबूल करित्यें !

**ज्ञान**—मुलींनो ! ( आशादिकांस ) आतां, तुमचें कसें काय ?

**आशादिक**—महाराज ! आह्मांमुळें, राज्ञी **निवृत्ति**बाईसाहेबांस अपमान सोसावा लागला, हें अगदीं खरें आहे ! आणि, त्या अपराधाकरितां, आह्मांस जी शिक्षा ठरविली आहे, तीही यथार्थ आहे. करितां, आह्मीं यानंतर, आमच्या स्वभावाचा उपयोग, इतरत्र न करितां, **बोधप्राप्त्यर्थ** करूं ! **बोध**महाराजांच्या कारागृहांत आह्मी आनंदानें राहतों !

**काम**—महाराज ! मलाही दिलेली शिक्षा योग्य आहे. मी यानंतर अगम्य **गमना**दि अन्यथामार्गांनें कधींही वर्तन करणार नाहीं. फक्त आपल्या प्राप्तीचीच इच्छा करीन.

**क्रोध**—महाराज ! मलाही कृपा करून आपण जें जीवदान दिलें, त्याबद्दल मी आपला जन्माचा ऋणीं आहें. तथापि माझा जन्मस्वभाव साफ जाणार नाहीं. म्हणून मला कारागृहवासच योग्य ! म्हणून मी तेथूनच आपल्या प्राप्त्यर्थ प्रयत्न करीन, परंतु जर मला आपली प्राप्ति न झाली, तर मात्र जरा बाहेर सोडा. !

**दंभ**—महाराज ! मी यानंतर ऐहिक धनप्राप्त्यर्थ यत्न न करितां, पारमार्थिक **सत्य धनप्राप्ती** करितांच प्रयत्न करीन.

**लोभ**—महाराज ! यानंतर माझ्या जिभेला पाणी सुटेल, तें फक्त **आत्मधन** पाहूनच सुटेल !

**मत्सर**—महाराज ! मला जीवदान दिल्यानें मी आपला फारच उपकारी आहें. या नंतर मी **भ**गवन्नाम पराङ्मुखाच्याच ठिकाणीं, आपल्या गुणाचा उपयोग करीन.

**ज्ञान**—शाबास ! **प्रावृत्ति**पुत्रांनो ! याप्रमाणें तुम्ही वागल्यास अंतीं तुमचें कल्याण होईल. अकल्याण खात्रीनें होणार नाहीं. बरें आहे. जा तुम्ही आतां, बुधाजी, संतू !

**दोघे**—जी सरकार !

**ज्ञान**—न्या, यांस घेऊन चला, व नीट बंदोबस्तानें ठेवा. व येतांना, **जीवेश्वर**महाराज-आमच्या सरकारचे वडील यांस प्रशस्त रीतीनें, घेऊन या.

**दोघे**—आज्ञा सरकार ! ( जातात. )

**निवृत्ति**—तातमहाराज! **सर**कार,कचेरींत आल्यावर शरमतील; करितां, त्यांस आदरानें जवळ बसवून,चार स्वहिताचे शब्द सांगावे !

**विवेक**—**आ**जोबा ! आमच्या बाबाना फारसें कांहीं बोलूं नका बरं का ? त्यांजकडे कांहीं दोष नाहीं. हा सर्व गोंधळ त्या दुष्ट **अज्ञानानें** केला आहे,

**ज्ञान**—**पर**मार्था ! पाहिला का ? ( थट्टेनें ! ) पावडें माती आपल्याचकडे ओढणार !

**निवृत्ति**—( सस्मित ) तसं नव्हे **तात** !

**ज्ञान**—समजलें ! ( तोंच संतु व बुधाजी जीवेश्वरास दारीं उभा करून. )

**संतू**—महाराज ! बाहेर **जीवेश्वर**महाराज आले आहेत !

**ज्ञान**—( त्यांस सामोरे जाऊन ! आदरानें आणून योग्य स्थळीं बसवितात. )

**जीवे०**—( लाजून, मान खालीं घालून, स्तब्ध ! )

**निवृत्ति**-व **अपत्यें**--( त्यांस क्रमानें नमन करितात. )

**विवेक**—तात ! आपण यांत इतकें वाईट वाटून कशा करितां घेतां आहां !

**वैराग्य**—आह्मीं पक्कें समजतों आहों, कीं हा सर्व घोटाळा त्या अज्ञानामुळें झाला ! करितां, तातमहाराज ! आपल्यास आम्हीं यत्किंचित्‌ही दोष देत नाहीं !

**निजबोध**—आतां कृपा करून, आमच्या आईसह आह्मांस पदरांत ध्या. ह्मणजे झालें !

**जीवेश्वर**—( धांवत धांवत निवृत्तीचीं क्षमा मागावयास जातो, तों ती त्यास वरचेवर धरत्ये. तो उजव्याहात तिच्या उजव्या हातात, व डावा हात आपल्या डोळ्यावर ठेवून, रडत बोलतो. निवृत्ति आपल्या डाव्याहाताच्या द्वारें, पदरानें त्याचे डोळे पुसते. )

प्रिये ! मी अधम ! महापापी ! तुझ्या **पतिस्थानीं** नव्हेच. पण, **पाद**त्राणस्थानींही राहण्यास योग्य नव्हे ! मला सर्वापराधांची क्षमा कर !

**निवृत्ति**—महाराज ! आपली योग्यता फारच मोटी आहे. हें मी जाणून आहें ! असो ! आतां आपण तें कांहींही लक्षांत आणूं नये. स्वस्थ चित्तानें, या माझ्या **तात**महाराजांच्या **सुसं**गतीनें, **बोध**राजादि **सर्व संत**ति **प्राणा**पलीकडे **राखून धरा**. ह्मणजे झालें !

**जीवेश्वर**—ठीक आहे ! प्रिये, तूं अस्सल सकुलोत्पन्न, ह्मणूनच तुझ्या तोंडून हे **क्षमेचे** शब्द आले ! हीं माझीं अमोलिक **कन्या**

पुत्ररत्नें मज अभाग्यास कोठून मिळणार होतीं ? तुझ्या कृपेनेंच मला यांचा लाभ घडला ! ( मुलांस ) या ! माझ्या जिव्हलगानो ! तुह्मां सर्वांस एकाच समयावच्छेदें करून, प्रेमालिंगन द्यावेंसें वाटतें ! पण, तसें करितां येणें शक्य नाहीं. ह्मणून असेंच करितों. ( प्रत्येकास प्रेमालिंगन देऊन यांचा मुका घेतो ) या आतां इकडे बसा !

**ज्ञान**—मुली ! तुह्मां उभयतांचा; परस्परांवर, व सर्व मुलांवर असलेला, इतका निष्कलंक प्रेमा पाहून, मला परमाल्हाद होत आहे ! परमेश्वर तुह्मां सर्वांचें **अक्षय क**ल्याण करो !

आतां, **जीवेश्वरम**हाराज ! जरा इकडे लक्ष असावें !

**जीवे०**—महाराज ! आपण माझे **श्वशूर** ! अर्थात वडीलच आहां. करितां आपली आज्ञा शिरसावंद्य आहे ! याउपर आपल्या शब्दाबाहेर पाऊल नाहीं टाकणार !

**ज्ञाने०**—**जीवेश्वर**! आपण माझे **जा**मात! अर्थात्, आपल्यास योग्य प्रसंगीं, योग्य सल्ला देणें, माझें पवित्र कर्तव्य आहे. त्यांतून आतांच्या आपल्या भाषणानें मी फारच संतुष्ट झालों आहे. त्या आनंदाच्या भरांत आपल्याला चार शब्द सांगतों, इकडे पूर्ण अवधान असावें.

' तुह्मी आजपर्यंत स्वैच्छ वर्तन करून, सर्वतोपरी आपली अप्रतिष्ठा करून घेतली ! असो, तरी बरें झालें कीं, अंतीं, आपल्यास **निवृत्ति**राणीची, तिच्या **सद्गु**णी **मु**लांसह सत्संगति घडली, ह्मणून माझ्या शब्दाचा कांहीं सदुपयोग होईल असें वाटतें. ऐक.

१—आतांपर्यंत, विपरीत दैवबलानें, तूं **प्रवृ**त्तीचे आधीन होतास. **निवृ**त्तीची तुला आठवणही नाहीं. तरी आतां आजपासून **निवृत्ति**राणीची सत्ता कबूल करून, तिच्या पुत्रांपैकीं **बोधराजास** राज्याभिषेक केला आहे. यांत संतोष मान.

२—**मोह का**मादिक प्रवृत्तीचे पुत्र, त्याचे बंदीवान केले आहेत.

करितां, त्यांच्या वाऱ्यासही न जातां, दृढ एकाग्रता धारण करून नित्य मज **ज्ञाना**बरोबर **बोधा सन्मुख** बसत जा !

३—१—**इंद्रियाधीन** होऊं नये,

२—**विकल्पास** जवळसुद्धां करूं नये.

३—**मोहांत** पडूं नये,

४—**क्रोधादिकांचा** संग करूं नये.

५—**आशा, तृष्णा**दिकांच्या वाऱ्यासही राहूं नये.

६—**ज्येष्ठपुत्र भाव,** यास क्षणभरही विसरूं नये.

७—**धैर्य**, कधींच सोडूं नये, कारण त्याचा मोठा आधार असतो.

८—**सुख** व **दुःख** या दोहोंसही अंतःकरणांत जागाच देऊं नये,

९—**सहजपणें** ज्या गोष्टी होतात, त्यांच्या उलट, **दां**डगाईनें कांहींच करूं नय.

१०—मनास कोणत्याही प्रकारें **उचल** खाऊं देऊं नये.

११—मनांत वासनेची **फल**प्राप्ति इच्छूं नये.

१२—**संतसंग** सोडूं नये.

१३—**आत्मस्मरणा**वांचून, एक क्षणही फुकट घालवूं नये.

१४—देहाचा **भरंवसा** मानूं नये,

१५—**धन, सुत, दारा**दिकांवर अति प्रेम ठेवूं नये, कारण तीं क्षणभंगुर.

१६—**भूतदया** सोडूं नये.

१७—**सृष्टींत** अणुरेणुमध्येंही परमात्मा भरलेला आहे, हें विसरूं नये.

१८—प्रसंगास **डरूं** नये, कारण व्हावयाचें तें होणारच.

१९—**नास्तिक** व दुर्जन, यांचा सहवास करूं नये.

२०—**मी** करतों असें ह्मणूं नये कारण कर्ता वेगळाच !

२१—**देह** हाच **मी** अशी समजूत होऊं देऊं नये.

२२—**सूर्यप्र**काश, पृथ्वीच्या· पृष्ठभागावरील एकूणएक वस्तूंवर पडतो, परंतु तो **कांच**मणि वगैरवर पडला असतां मात्र चकाकतो, **काष्ठ पाषाणावर** कांहीं चकाकत नाहीं, त्याचप्रमाणें, **सजीव** व **निर्जीव** वस्तूंतील परमात्मस्वरूपाच्या **आस्तित्वा**बद्दल प्रकार आहे. ह्मणजे, पाषाणादिकांवर सूर्यकिरण चकाकत नाहींत, ह्मणून आकाशांत **सूर्यच नाहीं**, हें ह्मणणें जसें चुकीचें होईल, त्याचप्रमाणें, निर्जीववस्तु चलनवलन करीत नाहीं, ह्मणून यांत **परमात्मा** नाहीं, हेंहीं ह्मणणें चुकीचें होईल. हें निरंतर ध्यानांत ठेवून, परमेश्वराचें **सर्व व्या**पकत्व कधींच विसरूं नये.

२३—सुख व दुःख या कांहीं प्रत्यक्ष वस्तू नाहींत, त्या **मना**च्या लहरी आहेत. अर्थात, त्या नाशवंत आहेत हें मनांतून लवमात्रही हालूं देऊं नये.

४—त्याचप्रमाणें आणखी ऐकः—

१—प्रत्येक कर्म सावधानपणें करून, तें ब्रह्मार्पण करावें ह्मणजे त्यांत फलप्राप्ति कदाचित न झाली, तरी **शीण** वाटणार नाहीं !

२—**अहिंसा**व्रत पाळावें. गोरगरिबांवर पूर्ण **दया** असावी.

३—अग्निरथ अल्पावकाशांत महत्कार्य करितो, पण तें करणारा **अग्निरथ** नसून दुसराच कोणी आहे. (**वाफ**) त्याचप्रमाणें, आपला **देह** हाही एक **रथ** आहे. ह्मणून, आपण सदैव **करून, अकर्ता. भोगून अभोक्ता**, व **बोलून, मुका**. अशा व्रतानें असावें.

४—स्वरूपानुसंधान **जागृत** ठेवावें. ह्मणजे **का**यिक व **वा**चिक व **मान**सिक तापापासून पीडा होणार नाहीं.

५—**संकल्प करणेंच** असेल, तर **शुद्ध** व **सत्य** असा असेल तोच करावा.

६—**निवृत्ति** हीच सर्व सौख्यदायिनी आहे. करितां, तिलाच **सन्मान** द्यावा.

७—**मनोवीर** हा सेनापति खरा. पण सेनापति झाला, तरी

तो आपला **नोकर** आहे. हें ध्यानांत ठेवून, त्यास **आपल्या हुकुमांत** ठेवावें. व **निवृत्तीशींही** नीटपणें वागण्यास सांगावें.

८—जाल तेथें तेथें, **वैराग्य** समागमें बाळगावें.

९—**विवेक** समीप बसवावा, त्याच्या याग अंत:करण आनंदित होतें.

१०—कार्या कार्याच्या ठायीं **विचार** असावा.

११—त्याचप्रमाणें तुझा **शालक 'परमार्थ'** यास, सदा कंठमण्याप्रमाणें सन्निध बाळगावा,

१२—**भक्ति, दया, क्षमा, शांति** यांस माहेरवासिनीच करावें.

१३—**उन्मनी** व तिची बहिण **तुर्या**, यांस सन्निध बाळगावें.

१४—निश्चळ **वृत्ति** ठेवावी.

१५—**सुख** किंवा **दुःख** हीं आलीं असतां, मनाची उचल न करितां **आनंदयुक्त** असावें.

१६—ज्या ज्या वेळीं **जें जें** व्हावयाचें, **तें तें** त्या त्या वेळीं झाल्याशिवाय रहावयाचेंच नाहीं, हें निश्चित समजावें.

१७—ह्मणूनच सदां **सहज**पणानें असवें.

१८—**भगवन्नामस्मरण** अव्याहत सुरू ठेवावें.

५—आतां सहजपणें कसें असतें त ऐक.

१—तिथि, वार, नक्षत्र, ऋतु, काल, संवत्सर, युग, मन्वंतर हीं ज्याप्रमाणें **सहज**रित्या चालली आहेत; त्याप्रमाणें हें **पिंड ब्रह्मांड, आपो**आप चाललें आहे !

२—सूर्य चंद्रादि स्वस्थ गोल, **आपो**आप उगवतात व मावळतात !

३—समुद्रास नियमितवेळीं भरती ओहटी **सहज**रित्याच येते.

४ मेघांचीं उत्पत्ति **सहज**रित्याच होऊन वृष्टिही योग्यवेळीं **सहज** होते.व त्यायोगें उद्भिज कोटी,सपत्र, पुष्पफल **सहज** होते !

५—इंद्रियांच्या क्रियाही **सह**जच उद्भवून, यांपासून पंचभूतांस्तव पंचविषयही **सह**ज पैदा झाले आहेत !

६—मोहोत्पत्ति **सह**ज होतें, त्यायोगें स्त्रीसंग **सह**जच घडतो. व नंतर **सह**ज प्रजोत्पत्ति होऊन ती **सह**जच वाढत जाते !

७—पुढें बाल्य, तारुण्य व वार्धक्यही **सह**जच अनुक्रमें होतात. तीं आणण्यास कोणींच कधीं तरी यत्न करितो आहे काय ?

८—नंतर सर्व अवयव क्षीण होऊन, नानाविकार, देहास **सह**जच व्यापून टाकतात.

या प्रमाणें **सह**जविचार फारच गहन आहे. याकरितां, **जीवे**श्वरा ! **सहजस्थि**तीनें असावें.

६—आतां कोण कशामुळें तरले, तें सांगून आटोपतें घेतों.

१—**कामानें, गोपिका** तरल्या !

२—**भया**नें, **कौंस**, तरला !

३—**शरीरसंबं**धानें, **पांडव**, तरले !

४—**ममत्**वानें, **वसुदेवदेव**की, हीं तरलीं !

५—**सेवा**केल्यानें, **हनुमान, गरुड, लक्ष्मी** हीं तरलीं !

६—**श्रव**ण केल्यानें, **परी**क्षिती, **अर्जुन**, तरले !

७—**वंद**न केल्यानें, **अक्रुर**, तरला !

८—**कवित्व** करून, **वाल्मिक.** तरला !

९—**आत्मज्ञानानें, जडभ**रतादि तरले !

१०—**व्रतें, उपास**नें केल्यानें, **रुक्मां**गद तरला !

येणें प्रमाणें, **मनोवृत्ति भग**वत्प्राप्त्यर्थ योजिल्यानें, जन्माचें **सार्थ**क्य होतें. म्हणून, **जी**वेश्वरा ! याप्रमाणें वागत जा. म्हणजे तुला **स्वस्व**रूपाची कधींही **विस्मृ**ति पडणार नाहीं. व **स्वरू**पानुसंधान दृढ झालें म्हणजे, कोणत्याही प्रकारचे **ताप** तुला मुळींच स्पर्शही करणार नाहींत !

**जीवेश्वर**—( स्वगत ) अहाहा ! मी प्र वृत्तिसंगतीनें आज-

पर्यंत केवळ विषयांध होऊन **स्वस्वरूपास व्यर्थ** मुकलों ! आतां मला केवढें ह्मणून समाधान वाटत आहे !

१—माझा सर्व भेदाभेद तुटून गेला !

२—**निवृत्ति** संगतीनें **बोधाचा** लळा लागला !

३—**मन** सैरा वैरा धांवत होतें, तें **प्रशान्त** झालें !

४—ज्ञानसंगतीनें, **एकाग्र**चित्त झालों !

५—सर्वतोंपरी माझें मला **विस्मरण** पडून, सर्वत्र **मीच** होऊन गेलों ! ( ज्ञानास साष्टांग प्रणीपात करून उघड ) **ज्ञान**राजा सर्वतोंपरी पावन केलें ! आतां मला इतका **आनंद** झाला आहे कीं, मी सर्वतोपरी अगदीं **निःशब्द** आहें ! ( तोंच स्वरूपस्थ. )

**ज्ञान**—शाबास ! कार्यभाग **सफळ** झाला ! बरें मुली **निवृत्ति** ! तुझें राज्य तुझे हवालीं झालेंना ?

**निवृ०**—होय, तात महाराज ! आपल्या कृपेनें सर्व मनकामना पूर्ण झाली !

**ज्ञान**—( जीवश्वराकडे बोट करून सस्मित) इकडे पाहिलेंस कां ? आतां कशी गेली आहे लागून तंद्री !

**निवृ०**—( तोंडावर पदर धरून सस्मित, लाजते. )

**ज्ञान**—बाळांनों ! आपण सर्व आतां याप्रमाणें वागाः—

मुली **निवृत्ति** ! आतां आपल्या **यज**मानास संभाळ !

**विवेका** ! तूं सर्व इंद्रियांना **सत्**कार्यीं लाव !

**वैराग्या** ! तूं त्यांस **विषयांकडे जाऊं देऊं** नको !

**भक्त्या**दिकांनो ! तुह्मी सर्वत्र **व्या**पून रहा !

**भावा** ! तूं ती व्यापकता दृढ कर !

**बुद्धि** ! सर्व क्षेत्र क्रिया तूं चालीव. !

**सर्व**—( करद्वय जोडून ) आज्ञा शिरसावंद्य आहे **महाराज** !

**ज्ञान**—आतां, **आनंदा** ! ( हातास धरून ) आपण **बोधराजा**-पाशीं जाऊन बसूं ! ( बोध, ज्ञान, आनंद ह्म० सच्चिदानंद, एकरूप होऊन डुलतात ! ) (पडदा पडतो.)

---

## प्रवेश १२ वा.

**स्थळ**—हरिद्वार—त्रिवेणी संगम.

**शिव**—राजा! नाटक खलास झालें! तुह्मां कोणास त्या संबंधानें कांहीं विचारावयाचें आहे तर विचारा.

**तारा**—स्वामिन्!(हात जोडून) सर्व प्रकार अगदीं **सु**बोध प्रकारें उघड करून दाखविण्याची **कृपा** केल्यामुळें, तत्संबंधीं कांहींच शंका राहिलेली नाहीं!

**राणी**—महाराज! आतांच्या नाटकांतील **ज्ञानाच्या** योगें, **जीवेश्वर** महाराजांची जी स्थिति, तीच आपल्या कृपेनें **आमची** झालेली आहे!

**राजा**—महाराज! आतां विलंब नसावा! या देहांत **प्रवृत्ति**, **निवृत्ति** मार्गाचीं कोण कोणतीं **तत्वें** आहेत, तीं स्पष्टपणें कळून आलीं!

**तारा**—महाराज! त्याचप्रमाणें कोणत्या **प्रवृत्ति तत्वास**, कोणत्या **निवृत्ति तत्वरूपी** शस्त्रानें, **कसें** मारावयाचें, हाही प्रकार समक्षच दाखविला!

**राणी**—आणि महाराज! **बोध** ह्मणजे **सत्**.
**ज्ञान** ह्मणजे **चित्** व.
**आनंद** ह्मणजे **आनंद**.

एकरूप होतांच, तिघेही डुलूं लागले, हाही प्रकार **ब**रोबर आहे!

**तारा**—पण महाराज! **जीवेश्वरा**चीही त्याचप्रमाणें स्थिति झाली!

**शिव**—मुलींनो! या नाटकापासून शिकावयाचें, तें हेंच. ज्याप्रमाणें, तो **जीवेश्वर**, **देहा**तीत होतांच तत्स्वरूप झाला, त्याचप्रमाणें आपणही **तत्स्वरूप**च आहों! फक्त वरील नाटकांत दाखविल्याप्रमाणें **प्रवृत्ति**सहवासानें, आपण भलत्याच दिशेनें वहात जातों, इतकेंच!

**तारा**—महाराज! आपण आह्मांस हें नाटक दाखवून, **स्थूळ**,

**सूक्ष्म** व **कारण** हे त्रिदेह उल्लंघन करून **महाकारणरूप** कसें व्हावें, हें समजावून सांगितलें ! पण यावर एक शंका आहे.

**शिव**—काय बरें ?

**तारा**—**ज्ञान,** हा **महाकारणदेह**च आहे. कारण याच्या योगें, **मी, स्थूळ, सूक्ष्म, कारण** यांपैकीं कोणीही नसून, **मी,** " **महाकारण** " आहें. असें कळतें ! असें असतां, तो **ज्ञानम**णीही, आपलें **नामरूप** व **स्वदेह** यांला विस्मृत होऊन **डुलुं** लागला ! यावरून, **ज्ञानाहून**ही कांहीं तरी **वरची** पायरी असली पाहिजे !

**शिव**—शाबास ! **तारे,** फार चांगला प्रश्न केला ! आतां सर्व कांहीं सांगतों. पण तुह्मांस आपल्या **मुख्य कर्तव्या**ची विस्मृति नाहीं ना पडली ?

**तारा**—छे ! छे ! महाराज ! असें कसें होईल ? आह्मीं, आमचें सर्व लौकिकी **नाशवंत वैभव** सोडून, व आपल्या कृपनें, **चहूं देहां**ची पक्की ओळख घेऊन, " **मी आत्मा** " हा अनुभव, **पक्का** बिंबवून घेतला आहे !

**शिव**—ठीक आहे ! तर मग आतां ऐका. **राजा** ! आपण शहरांत प्रवेश करतांना, मी तुला फक्त **पंचवीस** दिवसांची मुदत दिली होती. पण तुजकरितां, मी आणखी **पांच** दिवसांची मुदत घेतलेली होती. तो **तिसावा** दिवस **आजच** आहे !

**राजा**—ठीक आहे! मला **अत्यानं**द होतो आहे कीं, मी माझ्या **मूळस्वरूपां**त जाऊन लीन होण्याचा काल अत्यंत **सन्निध** आला, पण, महाराज ! या उभयतांचें कसें करीत आहां ?

**शिव**—**राजा** ! मी जरी यांस तुजसोबत आणलें नसतें, तरीही या उभयतांच्या **जडदेहां**ची आयुर्मर्यादा, **आजच** खलास व्हावयाची आहे ! आणून फायदा इतकाच झाला कीं, तुजबरोबर यानांही **स्वस्वरूपस्थान** प्राप्त होईल !

**राजा**—तर मग ! आपण जाणून बुजूनच यांस मजबराबर आणिलें !

**शिव**—होय. मी असा विचार केला कीं, राजधानींत ठेवून गेल्यास, त्यांच्या देहाची **दुर्दशा** होऊन, शिवाय **पुनर्जन्मा**ची पाळी येणार ! ती न यावी,

**राजा**—पण महाराज ! आपण बरोबर **तीस** दिवसांचीचशी मुदत घेतली ?

**शिव**—याचें कारण, तुह्मांही तिघांच्या देहांचें आयुर्मान तीसच दिवस, हें **एक बलवत्तर** तर आहेच. पण त्याशिवाय ती आणखीही एक सूचक संख्या आहे. तिचा खुलासा मागाहून करीन.

**तारा**—महाराज ! आतां आह्मांस आमच्यां **दिव्यरूपां**त लवकरच नेऊन मिळवा !

**शिव**—ठीक आहे ! राजा ! त्याचप्रमाणें, माझ्या लाडक्या मुलींनो ! या इकडे ! ( त्यांस नदींत बोलावितो. )

**तिघें**—( नदींत उतरतात. )

**शिव**—ऐका ! आतां आणखी **पावघटका**, तुह्मां तिघांना, या **पंचमहाभूतात्मक** आपापल्या **जडदेहा**ची संगति आहे ! याकरितां, आतां, **सावध व्हा ! सावध व्हा ! सावध व्हा !**

**शिव**—बसा खालीं पाण्यांत !

**तिघें**—( बसतात. )

**शिव**—मिटा डोळे !

**तिघें**—( मिटतात. )

**शिव**—पंचमहाभूतांच्या **स्थूळ**रूपानें बनलेला, हा ‘ **स्थूळदेह** ’ तुह्मी काय ?

**तिघें**—नाहीं.

**शिव**—त्याचप्रमाणें, त्यांच्याच **सूक्ष्म**रूपानें बनलेला, हा ‘ **सूक्ष्मदेह** ’ तुह्मी काय ?

**तिघें**—**नाहीं** !

**शिव**—बरें तुह्मी **कारण**देह काय ?

**तिघें**—नाहीं !

**शिव**—बरें! ज्याचा आपला संबंध नाहीं, त्याचा अभिमान धारण करणें **न्याय्य** आहे काय ?

**तिघे**—नाहीं !

**शिव**—सोडा तर त्यांचा **अभिमान** !

**तिघे**—सोडला !

**शिव**—पहा ! **साफ** सुटला ?

**तिघे**—हो **साफ** सोडला !

**शिव**—बरें, तर मग तुह्मीं **कोण** !

**तिघे**—महाराज ! आह्मी **महाकारण**देह !

**शिव**—पण **महाकारण**देहाची वाणी, **वैखरी** काय ?

**तिघे**—( चूप. )

**शिव**—समजलों ! **महाकारण** देहाची वाणी '**परा**' असल्यामुळें, तुह्मी त्यावाणीनें '**मी आत्मा**' ह्मणून सांगत आहां ! ठीक आहे ! संभाळा ! आतां अगदींच थोडा, फक्त **एकाक्षणाचाच** अवकाश राहिला आहे ! स्वरूप दृढ धरा !

**तिघे**—( स्वरूपस्थ. )

**शिव**—**शाबास ! संभाळा** ! ( तोंच एक लाट येऊन, तिच्यायोगें, ते रिकामे झालेले देह गडप होतात ! )

ठीक आहे ! आतां तुमचे त्याच नमुन्याचे दुसरे **दिव्यदेह** निर्माण करितों !

**तिघे**—( **दिव्यदेह** होऊन, पुन्हा येतात. )

**शिव**—या इकडे ! आतां तुह्मी कोण सांगा पाहूं !

**तिघे**—( क्रमानें ) **मी आत्मा–मी आत्मा–मी आत्मा** !

**शिव**—ठीक आहे. ( तोंच एक **अकरा** पायऱ्यांचा **जिना**, व त्याच्या शिरोभागीं प्रथमारंभींचें, **परब्रह्माचें दिव्यतेज** दिसतें. ) आतां हा **जिना** पहा !

**तारा—महाराज** ! या जिन्याला **अकरा** पायऱ्या दिसताहेत? यांचा खुलासा व्हावा !

**शिव**—या इकडे ही पहा **पहिली** पायरी! हिचें नाव **पृथ्वि,** हीं तुम्ही काय ?

**तिघे**—नाहीं महाराज!

**शिव**—चढा तर वर.

**तिघे**—( चढतात. )

**शिव**—हा पहा दुसरी पायरी **आप** ! हें तुह्मी काय ?

**तिघे**—नाहीं महाराज ! **पंचमहाभूतात्मक** देह कांहीं, **मी** नव्हें !

**शिव**—चढा तर वर !

**तिघे**—( चढतात )

**शिव**—हें पहा **तेज** ! चढा वर !

**तिघे**—( चढतात )

**शिव**—हा पहा **वायु** ! चढा वर !

**तिघे**—( चढतात )

**शिव**--हें पहा **आकाश** ! चढा वर !

**तिघे**—( पांचव्या पायरीवर चढतात )

**राणी**—पण महराज ! यांत **स्थूळ**देहाची पायरी कोणती ?

**तारा**—या **पांच** पायऱ्या व ही **तमोगुणाची** पायरी, मिळून **स्थूळ** देह ! नव्हे काय महाराज ?

**शिव**—शाबास **तारे** ! बरोबर आहे. ही **सहावी** पायरी **तमो**गुणाची आहे हा **स्थूळ**देहाचा गुण, हा मागें पडला ना ?

**तिघे**—होय !

**शिव**—चढा तर वर !

**तिघे**—( सहावी पायरी चढतात )

**शिव**—तसेंच, या पहिल्या पांच पायऱ्यांचा **सूक्ष्मांश,** व ही **सा**तवी पायरी **रजो**गुण,मिळून हा **सूक्ष्म** देह! याचीच **स्वप्नावस्था,** व **मध्यमा** वाणी ! ही तुह्मी काय ?

**तिघे**—नाहीं महाराज !

**शिव**—चढा तर वर !

**तिघें**—( सातव्या पायरीवर चढतात. )

**शिव**—आतां, किती विषय **मागें** पडला ?

**तारा**—**पंचमहाभूतें**, व तज्जन्य **स्थूळसूक्ष्म देह मागें** पडले असून, त्याचे **तम** व **रज** हे दोन्ही गुणही **मागें** पडले !

**शिव**—आतां ही **आठवी पायरी** ! हाच **कारणदेह** ! **सत्वगूण, पश्या**गतिवाणी, व **सुषुप्त्यवस्था** ! यांतून तरी तुह्मी कोणी आहां काय ?

**तिघें**—नहीं महाराज !

**शिव**—चढा तर वर !

**तिघें**—( आठव्या पायरीवर चढतात )

**शिव**—(नवव्यापायरीवर नेऊन) आतां ही पहा **नववी** पायरी! हाच तो **महाका**रणदेह ! याचा गूण, शुद्ध **सत्व**. व अवस्था, **समाधी** असून " **परा** " नावांची जी वाणी, ती **याच** देहाची ! हाही देह, तुमच्या **मा**गें पडला काय ?

**तिघें**—( स्तब्ध )

**शिव**—हा महाकारणदेह **तुह्मी** काय ?

**तिघें**—( चूप )

**शिव**—समजलों ! आतां तुमची " **परा** " वाणी असल्या मुळें, " **वैखरी** " वाणी बंद केली आहे ! ह्मणून, त्याच वाणीनें माझ्या प्रश्नाचें उत्तर द्या पाहूं !

**तिघें**—( क्रमानें ) होय, मी **माहाकार**ण देह !

**शिव**—आतां ऐका ! ही नववी पायरी फारच महत्वाची आहे ! येथून आतां खालीं पहा, ह्मणजे तुह्मांस असें दिसेल !

१—**पंच**महाभूतें व **त्रिगुण** मिळून बनलेली, **अष्टधाप्रकृति**, **मागें** राहून मी तिच्या बाहेर, **शुद्ध**सत्वस्थ झालों !

२—मी **स्थूळ, सूक्ष्म कारण नसून, महाकारण देह**।

३—त्याच प्रमाणें या नऊ पायऱ्या ह्मणजे **१ श्रवण, २ कीर्तन, ३ स्मरण, ४ पादसेवन, ५ अर्चन, ६ वंदन, ७ दास्य, ८ सख्य,** व **९ आत्मनिवेदन,** या **नऊ** प्रकारच्या **भक्तिच** आहेत ! अर्थात्, आपण या खालच्या **आठ** पायऱ्या मागें टाकून, "**आत्मनिवेदन**" नामक नवव्या पायरीवर आलों आहों !

आणि ह्मणूनच तुमचा आतां अनुभव असा असला पाहिजे. कसा बरें सांगा तह्मीच !

**तिघे**—( क्रमानें ) **मी आत्मा, मी आत्मा, मी आत्मा.**

**शिव**—ठीक आहे ! आतां तुह्मांस सांगावयाची राहिलेली, **एक** गोष्ट सांगतों.

**तारा**—दिवसांची संख्या **तीसच** कां ठेवली, हीच ना ?

**शिव**—होय ऐका ! तुह्मांस ओलांडावयाचीं तत्वें, **तीस** आहेत, असा त्या संख्येचा **ध्वनितार्थ** !

**राणी**—तीं कशीं ?

**शिव**—**स्थूळ** असोत कीं **सूक्ष्म** असोत, पंचमहाभूतांचीं तत्वें किती ?

**तारा**—**पंचवीस** !

**शिव**—आाण **गुण** किती ?

**तारा**—हा **शुद्धसत्व** धरून **चार** !

**शिव**—ह्मणजे, ही **अकरावी** पायरी ह्मणजे, त्या दृष्टीनें एकूणतीसची संख्या झाली नाहीं का ?

**राणी**—होय महाराज ! **पंचवीस** आणि **चार**. मिळून **एकूणतीस**. बरोबर आहे ! पण, आणखी **एक** पाहिजे ना ?

**शिव**—होय ! त्याचाही **मेळ** आतांच देतों, फिरा, आणि इकडे आतां वर पहा !

**तिघे**—( त्या **नवव्या** पायरीवर फिरतात. तों फिरतां फिरतां **राजा**ची दृष्टि तेथें बसलेल्या **महामायेवर** जाते )

**राजा**—महाराज ! या पायरीवर बसलेल्या या कोण ?

**शिव**—अरे, या आपल्या **मातुश्री** ! व या उभयतांच्या **सासुबाई** !

**राजा**—असें काय ? ( साष्टांग नमस्कार घालतो. )

**दोघी**—( अनुक्रमानें नमस्कार करतात. )

**तारा**—महाराज ! हें असें विलक्षण रूप काय ?

**शिव**—मुलींनो ! तुह्मांस आतांच्याच नाटकांत जो **जीवेश्वर** ह्मणून राजा दाखविला, तो हाच ! मी **शिव** व तुमचा भ्रतार **जीव** हे हिचेच अंश ! **अर्धनारी नटेश्वर, प्रकृति पुरुष,** हीं इचीं पुरुषवाचक नांवें असून, महामाया, प्रकृति, महाशक्ति, शक्ति वगैरे हीं इचीं स्त्रीवाचक नांवें आहेत ! सगळी सृष्ट्युत्पत्ति येथूनच झाली आहे ! व तुह्मांस मागें सांगितलेलें आठवतच असेल कीं, प्रत्येक अणुरेणुमध्यें, हे प्रकृति पुरुष स्पष्ट आहेत !

**तारा**—होय महाराज ! दृश्य दगड, ही प्रकृति. पण त्याचें आधिष्टान तो पुरुष !

**राणी**—चोरी करणें वाईट, हें चोरास कळत नाहीं असें नाहीं कळतें. तें ज्यास कळतें, तोच **शिव,** व त्यास न जुमानतां, चोरीस प्रवृत्त होतो, तो **जीव** !

**शिव**—शाबास ! अर्थात्, हा आमचा मायबाप, ज्याप्रमाणें प्रकृति पुरुषरूप आहे. त्याचप्रमाणें, सृष्टींतील यच्चयावत् अणुरेणु प्रकृति पुरुषरूप आहेत. आणि ह्मणूनच, ही आमची **मातुश्री,** व हेच आमचे **तीर्थरूप** ! ( तिला नमस्कार करितो. ) करा, पुन्हा हिला नमस्कार ! ( आपणही करितो. )

**तिघे**—( पुनः नमस्कार करितात. )

**महामाया** ( ध्यानधारणा उतरून ) कोण आहे ?

**शिव**—आई ! मी **शिव,** आपला बालक करद्वय जोडून उभा आहें.

**म०मा०**—कोण ! माझा **शिवबा** ? येरे माझ्या लाडक्या !

( त्यास जवळ घेते ) अरे ! **आतां येतो.** ह्मणून सांगून गेलास, त्यास किती वेळ होऊन गेला ? बरें, माझा **जीवबा** कोठें आहे ? त्यास संभाळून आणलेंस ना ?

**जीव**—( पुनः नमन करून ) आई ! हा मीही आलों !

**म०मा०**—ये माझ्या बाळा ! मला तुझी काळजी जास्त ! तूं काय ! गेलास तिकडे गेलास !

**शिव**—आई ! तें कांहीं विचारूं नको ! तुझें सर्व **क्रीडाभुवन** पाहून आलों !

**म०मा**—कसें काय आहे ?

**शिव**—फारच मजेदार खरें आई ! इतकें मनोहर कीं, हा तर शुद्ध वेडावूनच गेला !

**म०मा**—काय ह्मणतोस !

**शिव**—आणि इतका विलंब लागण्याचें **कारण** काय तर ?

**म०मा**—असें का ? अज्ञानच तो ! त्याला समजावून पुनः घरच्या घरीं आणलेंस, फार चांगलें केलें ! पण बाळांनों ! या **दोघी** कोण ?

**शिव**—आई ! मी तेच सांगतों आहें ! पण तूं आपली मुलाचेच मुके घेत सुटली आहेस ! यांच्याकडे तुझी नजरच जाईना!

**म०मा०**—होय बाळांनो ! असें झालें खरें ! पुष्कळ वेळ तुमचें सान्निध्य नसल्यामुळें, एकसारखी काळजी करीत बसल्यें होत्यें, पण तुम्ही आलां यामुळें जो आनंद झाला, त्याच्या नादांत मला कांहींच दिसेना ! बरें, कोण ह्या ?

**दोघी**—( तिला नमन करितात. )

**शिव**—आई ! या तुझ्या **सुना** !

**म०मा०**—( हंसत्ये ) खरें कीं काय ? ( उठून त्यांस कुरवाळते ) पण, यांत **थोर**ली कुठली व **धाक**टी कुठली ?

**शिव**—दोघी **धाक**ट्याच !

**म०मा०**—ह्मणजे ? **जी**वबाच्याच का ह्या दोघी स्त्रिया ! आणि तूं आपला कोराच !

**शिव**—आई ! त्यांत काय अर्थ ! हेंच पाहिनास ! तुझ्या दर्शनास इतका उशीर लागण्याचें कारण तरी ह्याचें ! या जिवाजीने फारच घोटाळा केला होता ! पण शेवटीं तुझ्या आशीर्वादानें आला शुद्धीवर ! आणि मीही याचेंच अनुकरण केलें असतें. तर आह्मां दोघांस धुंडून आणण्यास तुला तिसरा एक जासूद तयार करावा लागला असता !

**म०मा०**—खरें रे बाबा ! असो. पण ह्यांना येथपर्यंत बरोबर काय ह्मणून आणिलें ?

**शिव**—आई ! मी उगीच नाहीं आणणार, या नऊ पायऱ्या ओलांडून तुझ्यापर्यंत येण्यास जो अधिकार असावा लागतो. तो यांच्या ठिकाणीं पूर्णत्वानें वास्तव्य करीत आहे, अशी खात्री करून घेतल्यावर मी त्यांस येथें आणलें आहे !

**म०मा०**—वः इतका का यांचा अधिकार आहे ?

**शिव**—होय आई ! त्या फारच योग्य अधिकारी आहेत !

**म०मा**—त्यांस ( कुरवाळून ) शाबास ! मुलींनो तुह्मी भर तारुण्यांत असतां, संसार वैभवाचा मोहपाश साफ सोडला, यावरून तुह्मी खचीत महा भाग्यशालिनी आहां.

**राणी**—( हात जोडून ) सासूबाई ! ही सर्व आपली कृपा आहे !

**तारा**—( हात जोडून ) सासुबाई ! वडिलांचा आशीर्वाद असल्यास, काय अशक्य आहे ? संपूर्ण ब्रह्मांडावर आपलीच सत्ता आहे, सासुबाई !

**म०मा०**—मुलींनो ! तुह्मी अधिकारी आहां यांत संशय नाहीं ! तुह्मांस अक्षय सौख्य प्राप्त होवो !

**दोघे**—तथास्तु ! ( दोघी पुनः नमन करितात. )

**म०मा०**—बरें शिवबा ! आतां येथें राहून काय करतोस ?

**शिव**—नाहीं आई ! तुझी परवानगी मिळाली कीं, चाललो पुढें !

**म०मा०**—बरें आहे ! बाळांनो ! तुह्मां सर्वांस पूर्ण सौख्य प्राप्त होवो !

**सर्व—तथास्तु !** ( ह्मणून चरणीं लागतात. )

**शिव**—उठा ! माझ्या जिवलगानो ! मातुश्रीचा **कृपाप्रसाद** झाला ! आतां सर्वतोपरी आपण **निर्भय** झालों ! उठा !

**दोघी**—येतों **सासु**बाई !

**म०मा०**—या बरें मुलींनो ! **देव तुमचें कल्याण करो !**

( चौघें नवव्या पायरीवर उभीं राहतात. )

**शिव**—मुलींनो ! आतां तुह्मांस कसा काय अनुभव येतो आहे, सांगा पाहूं !

**तिघें**—मी इतर कोणीही नाहीं, फक्त **आत्मा** एवढाच अनुभव आहे.

**शिव**—बरें तुमच्या त्या अनुभूत **आत्म्याचें आकारमान** केवढें आहे ?

**तारा**—महाराज ! फारच **सूक्ष्म** !

**शिव**—बरें, हा **सूक्ष्मआत्मा** तुमच्या पुरताच आहे, कीं आणखी कोठें आहे ?

**राणी**—नाहीं महाराज ! या विश्वांतील अणुरेणुपरमाणुमध्येंही तो आहे !

**शिव**—कशावरून ?

**जीव**—महाराज ! **साखर** नसल्यास, साखरेचे **पदार्थ** होणें नाहींत, त्याचप्रमाणें **आत्मा** नसल्यास विश्वांतील **अणुरेणु परमाणूही अस्तित्वांत** येणेंच **शक्य** नव्हतें. कारण **परब्रह्म** वस्तूंवांचून, **मूळ** ह्मणून कांहींच नाहीं.

**शिव**—यावरून काय ठरलें?

**राणी**—विश्वांतील अणुरेणु परमाणूमध्येंही **परमात्मा** आहे.

**शिव**—बरें तुमच्या ठायीं असणारी **परब्रह्म** वस्तु यांची जात एकच कीं भिन्न ?

**तारा**—महाराज ! भिन्न कोठून असणार ? समुद्रांतून लहान मोठ्या आकाराचीं हजारों भांडीं आणलीं तरी सर्व भांड्यांतील पाणी एकच !

**शिव**—शाबास ! बरें, तें सर्व पाणी, दुसऱ्या एका फार मोठ्या भांड्यांत एकत्र केलें, तर तें **एकरूप** होईल काय ?

**तारा**—हो हो ! कां नाहीं होणार ? तें मूळचेंच **एकरूप** आहे. !

**शिव**—पण तें **एकरूप** होईल ना ?

**राणी**—हो **अलबत** होईल !

**शिव**—तर मग, तुमचा प्रत्येकाचा **आत्मा**, माझा **आत्मा,** व या आमच्या मातुश्रीचा **आत्मा**, मिळून हे **पांच**ही आत्मे, एकरूप होतील कीं नाहीं ?

**तारा**—अहाहा ! महाराज ! हे **पांचच** काय ? पण या ब्रम्हांडांतील **अनंत** अणुरेणुपरमाणूंमधील **अनंत आत्मवस्तु,** **एकरूप**च आहेत. !

**शिव**—हें खरें ना पण ?

**तारा**—हो महाराज ! अगदीं खरें !

**शिव**—पण, एखाद्या **अस्पर्श चांडाळा**दिकांचा व तुमचा ?

**तारा**—**आत्मा एकच** !

**शिव**—**पशु, पक्षी, कीड, मुंगी, वृक्षपाषाणाचा**ही ?

**राणी**—**एकच** !

**शिव**—हा तुमचा सिद्धांत अगदीं दृढ आहे ?

**राणी**—हो महाराज ! अगदीं **दृढ** आहे !

**शिव**—कशावरून ?

**तिघें**—( समाधिस्थ )

**शिव**—( मस्तकास हस्त स्पर्श करून ) शाबास ! आतां सांगा पाहूं तुमच्या आत्म्याचें आकार—मान किती ?

**तिघें**—( डोळे मिटून डुलत राहतात )

**शिव**—त्या **सर्वांतरवासी आत्म्याचें** आकार मान किती ?

**तारा**—महाराज काय सांगूं ? अबबब ! हा सर्व **परमात्माच** विस्तारला आहे ! महाराज याचें आकारमान **अपरंपार** ! !

**शिव**—हा तुमचा अनुभव खरा आहे ?

**तिघें**—हो अगदीं **खरा**, व शिवाय **अनुभूत** आहे !

**शिव**—याचा अनुभव ?

**तिघे**—( पुनः ध्यानस्थ ! )

**शिव**—वाहवा ! ( हस्त स्पर्शानें पुनः शुद्धीवर आणतो. ) आत तुमचा अनुभव काय ?

**तिघे**—**मी अपरंपार आत्मा आहें !**

**शिव**—या **चार** शब्दां पैकीं:—

१—**अपरं**पार हा शब्द फक्त **विस्तार** दाखवीत असून,

२—**आत्मा** ,, ,, ,, **अमुक** पणा, व

३—**आहे** ,, ,, ,, **अस्तित्व,**

दाखवित आहे ! पण ह्या तिन्ही **काय** आहेत ?

**राणी**—ह्यां फक्त स्फूर्ति ह्म० **कल्पना** आहेत !

**शिव**—कशावरून ?

**तारा**—महाराज ! **बरेंवाईट,** लहान**मोठा, अमुकतमुक** वगैरे ह्या सर्व गोष्टी **क**ल्पनामयच आहेत !

**शिव—बरें,** वरील वाक्यांतून, तिन्ही कल्पना **व**जा केल्यास, बाकी काय शिल्लक राहतें ?

**राणी**—फक्त "**मी**" एवढें राहतें !

**शिव**—बरें, "**मी**" हें तरी काय आहे ?

**तारा**—हीही एक **स्फूर्तिच** आहे !

**शिव**—"**मी**" हें **एक** अक्षर जर **स्फूर्ति,** तर "**मी अपरंपार आत्मा आहें,**" हा कोण ?

**तारा**—हा **स्फूर्तिजाल** !

**शिव**—आणि, वरील एकार्थी वाक्य जर **स्फू**र्तिजाल, तर **सु**खदुःख, लहान थोर, **बरें वाईट, राजा**रंक, **जन्म**मृत्यु, **दिवस**रात्र, **जया**पजय, **ज्ञाना**ज्ञान, **शु**भाशुभ इत्याद्यनेक **द्वं**द्वजालयुक्त **बडबड,** हें काय ?

**तारा**—महाराज ! **हा** तर **स्फू**र्तींचा **महा**जाळ आहे !

**शिव**—काय ? **जन्म** व **मरण** ही ही कल्पनाच ?

**तारा**—तर दुसरें काय ? **पंच**महाभूतात्मक देहांतील, **कारभार**

तत्वें सप्रमाण असलीं ह्मणजे, आत्मरवीच्या किरणजन्य शक्तीनें देह चलनवलन पावतो! त्याचें नांव जन्म! व कारभारीतत्वें देहांतून नष्ट झालीं तर, तोच देह, पारा वगैरे गेलेल्या आरशाप्रमाणें, कुचकामी होतो, ! त्याचेंच नांव मरण! मग ती कल्पना तर दुसरें काय !

शिव—शाबास ! ओल्या जमिनीवर, सूर्यकिरणानें जशा वाफा उद्भवतात, त्याचप्रमाणें, प्रमाणबद्ध पंचमहाभूतात्मक देहावर, आत्मरवीचा प्रकाश पडतांच, वरील अनंत जातीच्या अनंत स्फूर्ति उद्भवतात. वास्तविक त्या सर्व स्फूर्ति वाफेप्रमाणेंच नाशवंत आहेत !

तिघे—महाराज ! बरोबर आहे. आलें लक्षांत !

शिव—आतां, त्या सर्व स्फूर्ति वजा करून, बाकी तुमचेठायीं काय राहिलें ?

तिघे—मी !

शिव—या शिवाय ?

तिघे—कांहीं नाहीं !

शिव—पहा ! आपण आतां अगदीं नजीक आलों ! एखाद्या राजानें गळ्यांत ढोल बांधून " मी राजा " " मी राजा " ह्मणून दवंडी पिटविली पाहिजे काय ?

तारा—छे ! छे ! राजा, तो राजाच ! वरील प्रकार केल्यास त्यास उलट हीनत्व येईल.

शिव—तर मग, त्यानें कसें असावें ?

राजा—त्यानें आपला राजेपणा, आपल्याठायीं अनुभवून, स्वस्वरूपानें स्वस्थ असावें !

शिव—शाबास ! त्याचप्रमाणें, माझ्या जिवलगांनो ! ही नववी पायरी, व ती वरची अकरावी पायरी या दोन्ही एकच आहेत !

तारा—पण महाराज ! आपण असें कसें ह्मणतां ? ही नववी पायरी, व ती वरची अकरावी पायरी, यांच्यामध्यें, ही एक दहावी पायरी आहेना ? व तिजवर ही कोणीशी एक स्त्री बसलेली दिसते आहे !

**शिव**—तुमच्याठायीं आतां शिल्लक राहिलेली **स्फूर्ति**, जी फक्त "**मी**" तीच ती **दहावी** पायरी ! व तिजवर बसलेली जी **स्त्री**, तीच ती **आनंदरूपिणी आदिमाया** ! जोंपर्यंत तुमच्याठायीं "**मी**" आहे, तोंपर्यंत ही **दहावी** पायरी, "**आदिमाया**" आहे; तो तुमचा "**मी**" गेला कीं ही **आदिमायेसह दहावी** पायरी, नाहींशी होऊन, तें **अकराव्या** पायरीवरील **परब्रह्मरूप** व **तुम्ही**, अगदीं **एक** होणार ! आणि अशाप्रकारें अकराव्या पायरीशीं **तादात्म्य** होणें, याचेंच नांव **एकादशी** ! कंदमूळ व दूधपुरी **यथेच्छ** खाऊन, डरडरावून निजणें, ही नव्हे !

**तिघे**—( डुलत राहतात. )

**तारा**—पण महाराज ! आमचा "**मी**" गेला, यास **अनुभव** काय ?

**शिव**—जोंपर्यंत, तुह्मांस ही पुढील **दहावी** पायरी, व तिजवर बसलेली **आदिमाया** दिसत आहे, तोंपर्यंत तुमच्याठायीं "**मी**" आहे, ह्मणून समजा ! हाच **अनुभव** ! ज्या ज्या प्रमाणें तुमचा "**मी**" इकडे विरत जाईल. त्या त्या प्रमाणें, पुढील पायरीही **विरत जाणार** ! तो साफ विरतांच, **मिठाचा** कण, **महासागरांत** पडल्याप्रमाणें, अगदीं **तंतोतंत** होईल ! आलें लक्षांत ?

**तिघे**—होय महाराज आलें !

**शिव**—लागा तर कामास ! हा मीही आलों !

**चौघे**—( ध्यानस्थ )

( तोंच, **नववी** पायरी, आस्ते आस्ते **वरवर**, व **दहावी** पायरी त्याच प्रमाणानें **खालीं खालीं** जाऊन, **नववी** पायरी, अकराव्या पायरीस भिडते ! व **सर्व**, **परब्रह्मस्वरूपांत लीन** होतात ! )

श्रीसच्चिदानंदपरब्रह्मपरमेश्वराय नमः

ॐ तत्सत् परब्रह्मार्पणमस्तु.

# शुद्धीपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | १ | हही | हें ही |
| ५ | २ | सांपविली | सोंपविली |
| १० | ८ | आंज्यापासून | आंज्यांपासून |
| १३ | १६ | मातश्री | मातुश्री |
| १४ | १४ | आज्ञा आई | आज्ञा महाराज ! |
| १५ | १ | जरासां | जरासा |
| १६ | २३ | तिहरी | तिहेरी |
| १८ | खालून २ | वरितो | करितो |
| १८ | ५ | कंबरस | कंबरेस |
| १८ | ८ | आत | आतां |
| २० | २० | सृष्टयत्पन्न | सृष्टयुत्पन्न |
| २१ | ४ | दिला | दिली |
| २१ | ६ | गां | गांठ |
| २२ | १९ | तान | तीन |
| २३ | २२ | चालातर | चलातर. |
| २३ | २३ | महारा.ज | महाराज. |
| २४ | १० | माझे बोलण | माझें बोलणें |
| २४ | ११ | आपले | आपलें |
| २४ | २० | नुकता | नुकती |
| | | अंक २ रा. | |
| ३७ | १३ | कळोखा शिवाय | काळोखा शिवाय |
| ३८ | ७ | होत | होतें. |
| ४० | १२ | तांच | तोच |
| ४१ | ९ | ? | ! |
| ४१ | १३ | ! ? | ? ! |
| ४५ | १२ | याच्या | यांच्या |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४५ | २१ | सभामडप | सभामंडप |
| ४६ | ६ | आपण कोण ! | आपण कोण ? |
| ४८ | १७ | आहेकां | आहे कां ? |
| ४९ | ९ | संपलें. | संपलें ! |
| ५० | ६ | तिच्य | तिच्या |
| ५१ | ५ | कारणापासून | कृती पासून |
| | | **अंक ३ रा.** | |
| ५२ | १२ | काय हें | काय हें ? |
| ५७ | २६ | सनापतीस | सेनापतीस |
| ६१ | ३ | नव्हे | नव्हें |
| ६१ | ४ | चांडाळानो | चांडाळांनो |
| ६१ | ८ | मल्यानों | मेल्यांनो |
| ६३ | १ | टापलींत | टोपलींत |
| ६३ | ५ | आई. | आई ? |
| ६३ | ९ | कळली. | कळली ? |
| ६४ | ४ | मा | मी. |
| ६४ | १५ | मलही | मलाही |
| ६६ | १३ | ोतील ? | होतील ! |
| ६६ | २६ | कोणी | कोणीं |
| ६७ | ५ | होत | होतें. |
| ६९ | १ | इतक | इतके |
| ६९ | ५ | असामीस | असामींस |
| ६९ | २० | आहे ! | आहे ? |
| ७० | ३ | हा मी | हा मी. |
| ७० | १३ | आणि | नी |
| ७१ | १० | व्यपारी | व्यापारी |
| ७२ | १७ | चोरीचें | चोरीच्या |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७२ | १७ | खराब | खराब ! |
| ७४ | २३ | वारांगना | तारांगना |
| ७७ | १२ | आहे | आहें |
| ७९ | ३ | समजलें | समजत्यें |
| ८८ | १७ | हीं | हीं ! |
| ९५ | १४ | ब्रह्मचर्य व्रतच | ब्रह्मचर्य व्रतस्थच |
| १११ | २४ | कोणा | कोणीं |
| ११९ | २४ | काणा | कोणीं |
| १२० | १७ | आह्मीं | आह्मी |
| १२१ | ३ | मी | मीं |
| १२२ | १० | आपल्य | आपल्या |
| १२२ | १३ | मी | मीं |
| १२४ | २४ | मी | मीं |
| १२७ | २६ | उज्वळ | उज्ज्वल |
| १२८ | १ | इकड | इकडे |
| १३० | २८ | पाचवा | पाचवा हे |
| १३२ | १४ | राज्यात | राज्यांत |
| १४४ | २१ | प्रसूतिवदनांची | वेदनांची |
| १४५ | ५ | मिळल | मिळेल |
| १४५ | १० | आहे | आहें. |
| १६३ | ४ | हा हीं. | हीं |
| १६६ | १३ | भूतामध्यें | भूतांमध्यें |
| १७६ | २४ | पंचवास | पंचवीस |
| १८१ | २५ | त्यावळीं | त्यावेळीं |
| १९४ | २० | पाहिज | पाहिजे |
| २०३ | २ | दिसनासा | दिसेनासा |